प्रकाशक :
**श्री. शिवशंकर सुखदेव पाटील**
व्यवस्थापक – श्रीगजानन महाराज संस्थान, शेगांव
सेंट्रल रेल्वे ( विदर्भ ) महाराष्ट्र राज्य.

मुद्रक :
विदर्भ प्रिंटर्स
करमचंद थापर अॅन्ड ब्रदर्स ( सी. एस. ) लि.
नागपूर.



आवृत्ती १ ते ३० ] आषाढ शुद्ध १५ (गुरुपौर्णिमा) शके १९०८ मंगळवार दिनांक २१ जुलै १९८६ [ प्रती ५,५७,०००

आवृत्ती ३१ वी ] चैत्र शुद्ध ९ ( राम नवमी ) शके १९१० शनिवार दिनांक २६ मार्च १९८८ [ प्रती २५,०००

किमत रुपये १४–००

* * *



श्रीगजानन महाराज, शेगांव

## प्रस्तावना

संतचरणरज वंदुनी तत्त्वतां । सायुज्य मुक्ति माथां पाय देऊं ।।१।।
थोरीव थोरीव संतांची थोरीव । आणिक वैभव कांहीं नेणें ।।२।।
संतापरतें दैवत नाहीं ज्या चितीं । तीचि एक पूर्ण स्थिति ब्रह्मज्ञानी।।३।।
संत तेचि देव जयांची वासना । एका जनार्दनीं भावना नाहीं दुजी।।४।।

### संतमहिमा

जगाच्या पाठीवरील सर्वधर्मीय लोक संतांस मान देतात; त्यांच्या चरणकमलीं आपलीं मस्तकें नम्र करितात; एवढेंच नाहीं; तर सर्वश्रेष्ठ राजे लोक देखील बहुमानपुरस्सर त्यांना उच्चासनावर बसवून, त्यांच्या चरणारविंदी विलीन होतात; आणि ह्याला कारण हेंच कीं, **संत हे प्रति ईश्वर होत** ! हा प्रति ईश्वरासारखा मान त्यांना कशानें प्राप्त झाला बरें ? असे कोणते गुण त्यांनी संपादन केलें, कीं ज्यामुळे संतत्वाचा त्यांना लाभ झाला ? आणि कोणास संत म्हणता येईल, या विषयाकडे आतां आपण वळूं.

× × × × ×

काम, क्रोध, लोभ, मद आणि मत्सर, ह्या षड्रिपूंना ज्यांनी जिंकले आहे; सर्व भूतमात्रांविषयीं ज्यांच्या अंतः- करणांत निर्हेतुक प्रेम व दया वसत आहे; सर्वांच्या कल्याणाची सदिच्छा ज्यांच्या अंतःकरणांत ठाणें देऊन राहिली आहे; मनाची समता कायम ठेवून प्राप्त परिस्थितींत जे अखंड आनंदामध्यें निमग्न आहेत; ज्यांची अंतः- करणें ईश्वरप्रेमानें भरून गेली आहेत व त्यांचें नामस्मरण व चिंतन करण्यांत ज्यांचा अखंड काल व्यतीत होत आहे; ईश्वरी तत्त्वांत जे समरस झाले आहेत; त्या प्रेरणेनेंच जे सर्व भूतमात्रांचें कल्याण चिंतन करीत आहेत व आपलें मानवी

आयुष्य त्यांच्या उन्नतीकरिता घालवीत आहेत व आपला देह परोपकारांत झिजवीत आहेत, त्यांनाच संत म्हणतां येईल. ईश्वर ज्याप्रमाणें प्रत्येक प्राण्याचें धारण, पोषण व संवर्धन करितो, तेंच कृत्य संत करीत असतात, व म्हणूनच मानवांनी संतांना 'प्रति ईश्वराप्रमाणें' मानिल्यास त्यांत नवल कसलें ? ('संत आणि देव जाण। दोघांत नाहीं भेदभाव ॥ सूर्य आणि त्याचे किरण। नामाभिधानें भिन्न जैसी' –महिपती)

× × × × ×

आम्ही मानव ईश्वरास सर्वगुणसंपन्न मानितों. तसेच बऱ्याच सद्‌गुणांचे माहेरघर म्हणजे संत होत ! इच्छित वस्तु प्राप्त करून देणारी जशी कामधेनु, कल्पित वस्तु मिळवून देणारा ज्याप्रमाणें कल्पवृक्ष, लोहाचें सुवर्ण करून देणारा जसा परीस, चिंतीलेलें देणारा जसा चिंतामणि, तद्वतच जनतेचें सर्व इच्छित संत प्राप्त करून देतात; म्हणूनच आम्हीहि संतांना कामधेनूची, कल्पवृक्षाची, परिसाची व चिंतामणीची उपमा देतों ! संतांच्या सत्कृत्यांनीं लोकांचें इच्छित मनोरथ पूर्ण होतात. कल्पित वस्तु त्यांना मिळतात व त्यांच्या लोहरूपी दुर्वृत्ति मावळून त्या ठिकाणीं सुवर्णरूप सद्‌गुण झळकतात. मग वरील उपमा सार्थ नव्हेत काय ?

× × × × ×

संत हे सत्कृत्यांचे प्रेरक होत. ते अनाथांस साहय करण्याची प्रेरणा श्रीमंतांना करतात, कीं अनाथांचें संगोपन होऊं लागतें ! तृषितांची तृषा निवारणार्थं विहिरी, तलाव व पाणपोई बांधण्याची प्रेरणा ते धनवंताला करितात, कीं तेथें तशा सोई होऊ लागतात ! ते गरीब, भुकेलेल्यांची क्षुधा निवारण्यासाठीं सोय करण्याकरितां संपत्तिवानांना सांगता-क्षणींच, गरिबांना अन्नछत्रे, सदावर्तें उघडलीं जातात ! शीततात व वृष्टीपासून गोरगरिबांचें रक्षण करण्याकरितां सोय करण्यासाठीं ते धनिकांना अज्ञा करतांच, धर्मशाळा व मंदिरें उभारली जातात ! ईश्वरपूजन व भक्तिप्रसारार्थं मंदिरें बांधण्यासाठी ते आपली इच्छा प्रदर्शित करतांच देवालयें व भोजनालयें बांधिलीं जातात. त्यांच्या आज्ञेवरून





दरवर्षी पंढरपूरला जाणाऱ्या पालखीचा सोहळ

॥ श्रीगजाननमहाराज समर्थ ॥

# श्रीगजाननमहाराज संस्थानचा अल्प परिचय

श्रीसंत गजाननमहाराज हे महासंत माघ व. ७ शके १८०० दि. २३।२।१८७८ रोजी शेगांवी प्रगट झाले. त्यांच्यामुळें शेगांव हा गांव पुण्यभूमि बनला

'शगांव' हा गांव महाराष्ट्रांतील बुलढाणे जिल्ह्यांत मध्य रेल्वेच्या 'मुंबई–नागपूर' मार्गावरील 'ब' वर्गाचें स्टेशन आहे. येथे पॅसेंजर गाड्या १० मि., एक्सप्रेस गाड्या १० मि. व मेल गाड्या ८ मि. थांबतात. श्रीसंत गजाननमहाराजांच्या दर्शनाकरितां येथें उतरावें. स्टेशनच्या वाहेरील बाजूस रिक्षा, टांगे उपलब्ध असतात. स्टेशन ते मंदिर ५ फर्लांग अंतर आहे. स्टेशनवरून मंदिरांत जातांना रस्त्यातच मोटारस्टँड असून तेथे पुणे, औरंगाबाद, बुलढाणा, अमरावती, दर्यापूर, अकोट, तेल्हारा, खामगांव आदि ठिकाणांहून मोटारी येतात. मोटार–स्टँड ते मंदिर ४ फर्लांग अंतर आहे.

मंदिराला उत्तर व पश्चिम अशी दोन महाद्वारे असून तटाचे आंतील बाजूस मध्यभागी श्रीसंत गजाननमहाराजांचे समाधि-मंदिर आहे. भोंवताली मोकळी जागा असून तिच्या चारहि बाजूंस यात्रोंकरिता पाठशाळा आहेत. मंदिरात सर्वत्र नळातून पाणी नेले असून पिण्याच्या उपयोगाकरिता गोड्या पाण्याचे नळ आहेत.

रात्रीसुद्धा उत्तर महाद्वाराची खिडकी उघडी असते, त्यामुळे अवेळी येणाऱ्या यात्रीला आत येऊन झोपता येते. मंदिराद्वारा २४ तास पहारा चालू असतो. यात्रींच्या सोयीकरितां चौकशी, देणगी, ग्रंथविक्री वगैरे कार्यालयाच्या काहीं खात्यांचे कार्य २४ तास चालू असते. रात्रंभर मंदिरांत लख्ख विद्युत्-प्रकाश असतो. तटाला लागून आग्नेय कोपऱ्यात

एक मोठी विहीर असून तिला लागूनच पुरुषांकरिता व स्त्रियांकरितां अलगअलग स्नानगृहें आहेत. दररोज दुपारीं १२ ते २ पर्यंत, इच्छा असल्यास भोजनप्रसाद मिळतो. साधू, यति, पांथस्थ यांना लागोपाठ तीन दिवसांपर्यंत भोजनप्रसाद मिळू शकतो.

मंदिरातील दर्शनीय स्थळे–१. श्रीसंत गजाननमहाराजांचे समाधि-मंदिरातील गाभाऱ्यात श्रीमहाराजांची पदचिन्हे व मुखवटा. श्रीरामचंद्रप्रभु, श्रीसीतामाई, श्रीलक्ष्मण. २. खाली तळघरात श्रीसंत गजाननमहाराज. ३ समाधि-मंदिराच्या दक्षिण पाठशाळेमागील भागात श्रीसंत गजाननमहाराजांचे देहविसर्जन स्थळ. ४. जवळच श्रीमहाराजांची गादी. (ज्या पलंगावर ते नित्य बसावयाचे तो पलंग). ५. समाधि-मंदिराच्या पूर्व पाठशाळेच्या मागे ईशान्य भागी श्रीमहाराजांचे परमभक्त सेवाधारी श्रीनारायणमहाराज व श्री. बाळाभाऊमहाराज यांच्या समाध्या.

समाधि-मंदिर उघडे असण्याचा काल:–सकाळी ५ ते रात्रीं ९॥ वाजेपर्यंत समाधि-मंदिर उघडे असते. रात्री ९॥ ला शेजारती झाल्यावर समाधि-मंदिर बंद होतें पण इतर दर्शनीय स्थळी दर्शनास जातां येते.

संस्थानातील प्रमुख उत्सवप्रसंग :–(१) श्रीरामजन्मोत्सव यात्रा-चैत्र शु. ९ ला. (२) श्रीगजाननमहाराजांचे पुण्यतिथीप्रीत्यर्थ यात्रा-भाद्रपद शु ५ ला. (३) माघ व. ७ ला श्रीप्रगट-दिन उत्सव यात्रा. (४) दर गुरुवारी सायंकाळी श्रीमहाराजांचे पालखीचा सोहळा.

यात्रींकरितां खोल्या :– तीन किंवा त्यापेक्षा अधिक यात्रींना, शिल्लक असल्यास खोली मिळूं शकेल. त्याकरिता आकार द्यावा लागत नाहीं. कार्यालयात २ रु. अनामत ठेवून कुलूप, किल्ली मिळते. किल्ली परत करताना अनामत रक्कम परत मिळते. खोली ४८ तासांपेक्षा अधिक काळ मिळणार नाही.

देणग्या व दक्षिणेसंबंधी सूचना:– कोणालाही विशिष्ट सत्कार्याकरिता देणगी देणे असल्यास त्याच्या इच्छेप्रमाणे ते



कार्य करवून घेतले जाते–जसे अभिषेक, अन्नदान वगैरे. येथे प्रत्यक्ष कार्यालयात देणगी देताना पावती घेत जावी, किंवा रक्कम पाठविणे झाल्यास 'व्यवस्थापक, श्रीगजाननमहाराज संस्थान, शेगांव (मध्य रेल्वे), जि. बुलढाणा (महाराष्ट्र राज्य), या पत्त्यावर पाठवावी. येथील पुजारी व कर्मचारी वर्ग पगारी आहे. त्यामुळे कोणालाहि दक्षिणा म्हणून पैसे देण्याची आवश्यकता नाही.

सामान सुरक्षागृह:– यात्री आपले सामान २४ तासांपर्यंत सुरक्षिततेसाठी 'सुरक्षागृहात' ठेवू शकतात. यासंबंधीच्या नियमांची तेथच चौकशी करावी.

आयुर्वेद औषधालय, होमिओपॅथीक औषधालय व ॲलोपॅथीक औषधालय ही तीन औषधालये संस्थानतर्फे धमार्थ चालविली जातात.

भाविकांना नम्र विनंति:–संस्थानच्या असे निदर्शनास आले की काही लोक स्वतःला महाराजांचे पट्टशिष्य म्हणवून घेतात व श्रद्धाळू लोकांकडून पैसा उकळतात. श्रीसंत गजाननमहाराजांचा कोणीच पट्टशिष्य नसून संस्थानकडून वर्गणी गोळा करण्यास असा मनुष्यहि फिरतीवर नसतो, तरी असल्या प्रकारांपासून सावध रहावे.

श्रीगजाननमहाराज व संस्थानावर आधारित रंगीत लघुचित्रपट तयार केला आहे आणि श्रीसंतकवि दासगणूमहाराजरचित श्रीगजाननमहाराज यांची आरती, भजने व भूपाळ्या यांच्या ग्रामोफोन रेकॉर्डस् श्रीमती लता व उषा मंगेशकर यांच्या सुमधुर आवाजात मुद्दाम करवून घेतल्या आहेत. तरी याबाबत गरजूंनी संस्थानशी जरूर संपर्क साधावा.

**श्री. ग. म. संस्थान, शेगांव,**

**व्यवस्थापक**






परमभक्त कै. हरि कृष्णाजी पाटील (शेगांव)



**रोगनिवारणार्थ रुग्णालयें व कीर्तनालयें, ज्ञानसंपादनार्थ विद्यामंदिरें व पाठशाला आणि अनाथांस राहण्यासाठीं निवास मंदिरें ( Poor houses ) बांधली जातात !**

**संत हे काय करूं शकणार नाहीत ? ते निर्जल भूमींत जल उत्पन्न करूं शकतील ! ते नापीक जमिनींत पीक उत्पन्न करूं शकतील ! ते निर्जन वस्तींत शहरें वसवतील व ते झोपडींत राहून राजवाडे बांधतील !**

× × × × ×

**शरीरांत आत्म्याचें वास्तव्य असले म्हणजे शरीर कार्यक्षम असतें. आत्मा हा दिसत नाहीं; पण शरीराचें त्याच्याशिवाय चालावयाचें नाहीं !** तद्वत् मानवी जीवनांत संतांचें वास्तव्य होय. **समाजधारणेस** संत हे आत्म्याप्रमाणेंच होत ! ते ज्या समाजांत नसतील तेथ अव्यवस्था, अनाचार, अनीति, विपत्ति व दुर्दैव हमेशा ओढवलेंच म्हणून समजावे ! मग तो समाज पौर्वात्य अगर पाश्चिमात्य असो; उत्तरध्रुवीय अगर दक्षिणध्रुवीय असो !

या भरतखंडांत व विशेषतः महाराष्ट्रांत संतांची वाण मुळींच नव्हती व नाहीं; म्हणूनच हा देश धनधान्यांनीं विशेष समृद्ध नसला तरी साधुसंतांच्या सद्विचारांनीं पूर्ण भरलेला आहे ! रौप्य-सुवर्णादि धातूंनीं समृद्ध नसला तरी **अखिल जगाला ललामभूत असे पराक्रमी व थोर मानवी हिरे याच भूमींत पैदा झाल्यामुळें तो वैभवसंपन्न आहे !**

**श्रीगजाननमहाराज** (शेगांव–वऱ्हाड)

अशाच तऱ्हेचे **श्रीगजाननमहाराज** हे एक संतरत्न वऱ्हाडांत शेगांव (शिवगांव) येथें होऊन गेले. ते ता. २३ फेब्रुवारी १८७८ रोजी प्रथमतः ऐन तारुण्यदशेंत शेगांवीं दिसले. त्या वेळीं **श्रीगजाननमहाराज** तेथील **साधु देवीदास**

**पातुरकर** यांच्या मठाबाहेर पडलेल्या उष्टया पत्रावळीतील कण वेंचून खात होते ! गाईगुरांना पिण्यास ठेवलेल्या ठिकाणचें पाणी पिऊन ते निघून गेले ! पुढें बार्शी येथील ब्रह्मनिष्ठ **श्रीगोविंदमहाराज टाकळीकर** यांचे शेगांवीं महादेवाच्या देवालयांत कीर्तन झालें. त्या प्रसंगीं **टाकळीकरांच्या** बेफाम असलेल्या घोडयाच्या चौपायांत **श्रीगजाननमहाराज** हे ब्रह्मानंदीं निमग्न होऊन निजलेले आढळले ! घोडा शांत होता. **गोविंदमहाराजांनी** त्यांची योग्यता ओळखून पूजा केली व त्यांची महति शेगांवनिवासी लोकांस निवेदन केली. त्या वेळेपासून त्यांची प्रसिद्धी झाली. त्यांनी तेथें जे पुष्कळ अलौकिक चमत्कार केले, त्यांचे वर्णन सोबतच्या "**श्रीगजाननविजय**" या ग्रंथात वाचकांस वाचावयास मिळेलच.

**श्रीगजाननमहाराज** हे दिगंबरवृत्तीतील सिद्धकोटीला पोंचलेले साधु होते. वटेल तें खावें, कोठेंहि पडून रहावें व कोठेंहि संचार करावा, अशा रीतीने ते रहात. एके वेळीं तर एका स्त्रीनें अर्धा शेर मिरचीचा गोळा वाटून तो त्यांना खावयास दिला ! तो गोळा त्यांनीं मोठ्या आवडीनें जणूं काय पेढे–बर्फी खातात, त्या आनंदानें तसा खाल्ला व त्यावर एक गडवाभर पाणी पिऊन ते तृप्त झाले ! "गणिगण गणांत बोते" असें अहर्निश त्यांचें भजन चाले, म्हणून लोक त्यांना "**श्रीगजाननमहाराज**" असें संबोधूं लागले. त्यांना लोक बहुमोल वस्त्रें, अलंकार, पैसे, खाद्यपदार्थ अर्पण करीत; पण ते सर्व तेथेंच टाकून ते कोठेंहि निघून जात ! भक्तांना व जनतेस त्यांच्या सहवासानें मनःशांति मिळे व ईश्वरी लीला कळून येऊन उत्तम सदुपदेशाचा लाभ होई. ते ता. ८–९–१९१० रोजीं सकाळीं ८ वाजतां ईश्वरी नामस्मरणाच्या गजरांत समाधिस्थ झाले.

शगांव येथें ज्या ठिकाणीं **श्रीगजाननमहाराजांनी** देह ठेविला, तेथेंच **कै. हरि कुकाजी पाटील** प्रभृति मंडळींनीं एक स्मारक मंदिर उभारलें आहे. तसेंच तेथें एक "**श्रीगजाननमहाराज संस्था**" स्थापन झालेली आहे.



या "**श्रीगजाननमहाराज संस्थान**"चा कारभार श्री. **कै. हरि कुकाजी पाटील** यांच्या सांगण्यावरून रा. रा. **कै. रामचंद्र कृष्णाजी पाटील** यांनी सन १९१३ ते १९४८ या सालापर्यंत योग्य तऱ्हेने केला. या संस्थानचा कारभार करण्याचा संप्रदाय पाटील घराण्यांतच आहे.

ह. भ. प. संतकवी **श्रीदासगणूमहाराजविरचित "श्रीगजानन विजय"**

वर वणन केलेल्या साधुश्रेष्ठ **श्रीगजाननमहाराजांचे** सोबतचें ओवीबद्ध चरित्र **श्रीदासगणूमहाराजांनी** २१ अध्यायांत "**श्रीगजानन-विजय**" या नावाने रचले आहे.

हा ग्रंथ सर्वसाधारण जनसमूहाला सहज समजेल इतक्या सोप्या भाषेंत लिहिला आहे. **श्रीदासगणूमहाराजांची** वाणी ही अत्यंत ओघवती असल्यामुळें, प्रत्येक अध्याय प्रथमपासून शेवटपर्यंत वाचीत असतांना, असें वाटतें कीं, आपण नावेंत बसलों असून नदीचा प्रवाह उतरणीचा आहे ! हापूसचा आंबा परिपक्व झाला म्हणजे तो जसा लज्जतदार लागतो तसे **श्रीदासगणूमहाराजांचे** विचार हे वयोमानाने, धार्मिक तपश्चर्येमुळें व अनुभवानें परिपक्व झाल्यामुळे, हे फार भारदस्त व प्रमाण म्हणून उल्लेखनीय विचार (Quotations) देण्याच्या योग्यतेचे झाले आहेत; त्याचा अनुभव वाचकांना हा ग्रंथ वाचीत असतांना पदोपदी येईल.

शेवटी **श्रीदासगणूमहाजांच्या** भाषेतच संतांचा महिमा वर्णन करून मी वाचकांची रजा घेतों.

संत हेच भूमीवर । चालते बोलते परमेश्वर ॥
वैराग्याचे सागर । दाते मोक्षपदाचे ॥ १ ॥
संत हे सन्नीतीची । मूर्ति होय प्रत्यक्ष साची ॥
संत भव्य कल्याणाची । पेठ आहे विबुध हो ॥ २ ॥
त्या संतचरित्रांस । श्रवण करा सावकाश ॥
आजवरी ना कवणास । संतांनीं या दगा दिला ॥ ३ ॥
ईश्वरी तत्त्वांचे वाटाडे । संत हेचि रोकडे ॥
हे अमोघ ज्ञानाचे ते गाडे । भरले असती प्रत्यक्ष ॥ ४ ॥
संतचरणीं ज्यांचा हेत । त्यांचा ऋणी रुक्मिणीकांत ॥
आतां मलरहित करा चित्त । **गजानन–चरित्र** ऐकावया ॥ ५ ॥

मुंबई -दादर

सर्व संतांचा नम्र सेवक,

**विठ्ठल लक्ष्मण सुबंध**

ता. १९–१२–१९४८

प्रस्तावना-लेखक– **“ श्रीगजानन-विजय ”**

---

# अभिप्राय

**सदा सन्तोऽनुसर्तव्यो यद्यप्युपदिशन्ति नो ।**
**याश्च स्वैरकथास्तेषामुपदेशा भवन्ति ताः ॥**

आत्मसमाधानाकरितां जीवमात्राची धडपड चालू आहे. पण तें सहसा कोणाला लाभत नाहींच. याचें कारण असें कीं, मनुष्य आधिभौतिक पदार्थांनाच समाधानाचें साधन समजून तें मिळविण्याकरितां रात्रंदिवस झटत असतो, पण समाधान मिळत नाहीं तें नाहींच. वास्तविक खरें सुखसमाधान मिळण्याचें साधन वैषयिक पदार्थ नसून आध्यात्मिक विचार हेंच होय. आध्यात्मिक विचारानें मन मुळापासून निर्मळ होत असतें. त्या निर्मळ चित्तानें आनंदरूप आत्म्याचें दर्शन होऊन जीवदशा वितळते व ब्रह्मानुभव येऊन कायमचेंच सुखसमाधान प्राप्त होतें.

आध्यात्मविचाराकरितां शास्त्रानें अनेक साधनें सांगितलेलीं असलीं तरी शेवटी ‘ प्राप्य वरान् निबोधत । ’ ‘ संताकडे जाऊन आत्मस्वरूप समजून घ्या ’ असें श्रुतीला सांगावें लागलें. त्याचें कारण खरा संत आपल्या गोड व अधिकार–संपन्न वाणीनें उपदेश करून भक्ताच्या मनाला सांसारिक विषयविवंचनेपासून मोकळे करतो. हें सामर्थ्य तीर्थादिकांमध्ये नाहीं.

संत–चरित्रांनीं व त्यांच्या अनुभवाच्या बोलांनीं परमार्थाचें मार्गदर्शन जितकें लवकर व बिनचूक होतें तितकें शास्त्राध्ययनानें होत नाहीं. शास्त्र समजून घ्यावयाला पण गुरूची आवश्यकता लागतेच. त्याशिवाय शास्त्राचें हृद्गतहि समजत नाहीं. म्हणून परमार्थमार्गात पाऊल टाकू इच्छिणारानें प्रथम संत-चरित्रच वाचली पाहिजेत. ज्यांना संतांचा

सहवास झाला व प्रत्यक्ष त्यांच्यापासून आत्मसुखाचा लाभ झाला ते भाग्यवानच. पण ज्यांना तसा योग आला नाहीं
यांचें कार्य संतांचे चरित्रग्रंथ करीत असतात. परमार्थाची इच्छा मात्र उत्कट पाहिजे. एक वेळां असेहि म्हणता येईल
की प्रत्यक्ष संतांच्या सहवासापेक्षां संतांनी लिहिलेले ग्रंथ किंवा त्यांचे चरित्रग्रंथ यांचाच उपयोग जास्त होतो. संतांच्या
सहवासांत राहणारे अनेक अनधिकारी लोक संतांच्या अव्यावहारिक व अशास्त्रीय भासणाऱ्या गोष्टीच लक्षांत ठेवून
त्यांचेंच नुसतें अनुकरण करण्यात सार्थकता मानितात. शब्दांपेक्षा प्रात्यक्षिक जास्त परिणामकारक होत असते. चरित्र-
ग्रंथांनी चरित्र–लेखकाच्या चातुर्याने असले प्रसंग बहुधा टळत असतात. रामकृष्ण, शंकराचार्य, समर्थ, एकनाथ वगैरे
संतांच्या सहवासांत असणाऱ्या मंडळीपेक्षां त्यांचे ग्रंथ व चरित्र वाचून परमार्थी मार्गाच्या पांथस्थांची संख्या जास्त भरेल.
असें वाटतें.

आपल्या चरित्रानें लोकांना मार्गदर्शन करणाऱ्या संतांचें उपकार जितके मुमुक्षूंवर आहेत तितकेच किंबहुना जास्त उपकार चरित्र–लेखकांचे आहेत यात संशय नाहीं. वाल्मीकींनी ' रामायण ' लिहिलें नसतें तर या काळाच्या अंधारकोठडींत रामचंद्राचें नांवहि ऐकूं आलें नसतें. ओळख लांबच राहिली. असो.

श्रीगजाननमहाराज (शेगांव–विदर्भ) यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ आम्हाला झाला नाहीं हें आमचें दुर्दैव होय. परंतु सर्वतोमुखीं असलेली त्यांची कीर्ति ऐकली व ह. भ. प. संतकवि श्रीदासगणूमहाराजांनी लिहिलेलें त्यांचे प्रेमळ चरित्र नुकतेंच वाचलें.

श्रीदासगणू हे जन्मजात कवि आहेत व त्यांत भक्तिरसाचा प्रादुर्भाव झाल्यामुळे त्यांचे काव्य गंगेप्रमाणें उभय-
लोकी आनंद देणारें झालें आहे, त्यांच्या सिद्धलेखणींतून चित्रित झालेलें हें श्रीगजाननमहाराजांचे चरित्र वाचतांना चित्त



ह. भ. प. संतकवि श्रीदासगणू महाराज–पंढरपूर
(श्रीगजाननविजय ग्रंथाचे लेखक)

चित्राप्रमाणें निर्व्यापार होतें. दासगणूंच्या प्रेमळ व भक्तिरसपूर्ण कविताशक्तीची साक्ष त्यांनीं लिहिलेलीं अनेक संतचरित्रें देत आहेत. त्याबद्दल जास्त लिहिण्याचें कारणच नाहीं. ज्यांनीं श्रीगजाननमहाराजांचें दर्शन घेतलें नाहीं त्यांच्याहि डोळ्यांसमोर श्रीगजाननमहाराजांचीं मूर्ति प्रत्यक्ष उभी राहते इतकें हें स्वभावोक्तिपूर्ण चरित्र लिहिलें गेलें आहे.

असा हा अमूल्य चरित्रग्रंथ प्रकाशित झाला नसता तर होऊनहि न झाल्यासारखाच झाला असता. अनेक प्रसंगोचित चित्रें देऊन सुव्यवस्थित प्रकाशित केल्यामुळें श्रीगजाननमहाराजांचा भक्तगण प्रकाशकांचा ऋणी आहे.

श्रीक्षेत्र काशी
२१–१२–१९४६

भाऊशास्त्री वझे
ब्रह्मघाट, काशी.

**अभिप्राय–**

हरिभक्तिपरायण संतकवि श्रीदासणूगमहाराज यांनीं रचलेला श्रीगजानन–विजय नांवाचा ग्रंथ समग्र वाचला. शेगांवचे सुप्रसिद्ध सिद्धसंत श्रीगजाननमहाराज यांच्या या ग्रंथांत उपलब्ध चरित्रांचा संग्रह असून त्यांनीं केलेल्या अनेक चमत्कारांचीं रसभरित वर्णनें आहेत. श्रीदासगणूमहाराज यांची रसाळ वाणी आणि श्रीगजाननमहाराज यांचे अद्भूत चरित्र यांचा एकत्र संयोग झाल्यकारणानें "रत्नं समागच्छतु कांचनेन" ही कालिदासाची काव्योक्ति या ग्रंथास अक्षरशः लागू पडते. श्रीगजाननमहाराज शेगांवास उदय पावल्यापासून पुढील चरित्र या ग्रंथांत आहे. "शेगांवीं माघमासीं । वद्य सप्तमी या दिवशीं । हा उदय पावला ज्ञानाराशी । पदनताते ताराया ॥ ऐन तारुण्याभीतरी ॥ गजानन आले शेगांवनगरीं । शके अठराशाभीतरीं । माघ वद्य सप्तमीला ॥" असे या ग्रंथांत वर्णन केले आहे. यासंबंधीचा थोडासा इतिहास आमच्या स्वतःच्या माहितीप्रमाणे आम्हाला ठाऊक आहे तो थोडक्यांत येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

इ. स. १८८७–८८ चे सुमारास मला स्वतःला अकोट गांवीं अकोला जिल्ह्यांत बरेच दिवस जाऊन राहण्याचा प्रसंग आला होता. त्या वेळीं मी माझ्या लहान वयांत श्रीगजाननमहाराज अकोटांत प्रथम पाहिले. अकोट गांवीं नरसिंगमहाराज नांवाचे फार मोठे प्रसिद्ध सत्पुरुष होऊन गेले. ते दिवसभर रानावनांत राहात आणि संध्याकाळीं त्यांची गांवाजवळ एक झोपडी असे. तेथे वस्तीला येत असत व रात्री तेथेंच राहात. नरसिंगमहाराज सायंकाळीं झोपडीत वस्तीला आले म्हणजे त्यांचे समोर अंगणात बसून शेगांवचे श्रीगजाननमहाज (गिणगिणेबुवा) रात्र रात्र जागून भजन करीत असत. बोटांवर बोटें आपटून ताल धरून "रामेगिणांत गिणबोतें" आणि "येष्मिस्तंब वैदूही" या दोन मंत्रांचा ते अव्याहत मोठ्याने जप करीत असत आणि त्यांची वृत्ति भजनांत इतकी लीन होत असे कीं, बोटांवर बोटें आपटताना



नखांच्या आघातामुळें बोटांवर जखमा होऊन त्यांतून रक्ताच्या धारा गळत असत. परंतु त्याहीकडे त्याचें लक्ष असे. यात्रमाणें नरसिंगमहाराजांचे सहवासांत त्यांनीं कांहीं वर्षे घालविलीं अर्थात् किती हे मला सांगणें शक्य नाही.

तथापि योगारूढ होण्यापूर्वीं त्यांनीं जे कष्ट केले, तहान–भूक सहन केली, जननिंदा आणि छळ सोसला, त्यास खरोखरच सीमा नाहीं. हें वर्षानुवर्षं सहन करून त्यांनीं जी सिद्धि मिळविली तिचें खरें मोल त्यांच्या कष्टांची वास्तविक कल्पना आल्यावांचून कोणास करतां येणार नाहीं.

अन्नाकरितां अगर इतर कोणत्याहि शारीरिक गरजेकरितां त्यांनी कधी कोणाची याचना केली नाहीं आणि जसें ज्या वेळेस कोणी आपाततः देईल त्यावर निर्वाह करून त्यांनी योग साधला.

"यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः" आणि "आत्मन्यात्मना तृप्तः" या गीतावचनांचा प्रत्यक्ष पुरावा श्रीगजानन-महाराजांच्या ठिकाणीं जसा मूर्तिमंत दृष्टीस पडत असे, तसा इतरत्र क्वचितच दिसेल. श्रीसंत दासगणू यांनीं लिहिलेल्या या पुस्तकांत अनेक प्रसंगीं श्रीगजाननमहाराज लोकाचारानुरूप बोलल्याचे प्रसंग वर्णिले आहेत. अर्थात् महाराज त्या त्या प्रसंगी जे बोलले असतील त्याचा तो अनुवाद अगर सारांश आहे. श्रीगजाननमहाराज प्रत्यक्ष कधीच कोणाशीं कांहींच बोलत नसत. त्यांच्या वृत्तीस रुचेल ती स्वैरवाणी ते उच्चारीत असत. आणि त्यांनीं उच्चारलेल्या शब्दांचा संदर्भ आणि अर्थ ऐकणारे आपल्यापरीं लावून घेत असत. श्रीगजाननमहाराज अशा स्वैरवृत्तीनें जें कांहीं बोलत त्यांचा अर्थ ते बोलल्यानंतर कांहीं महिन्यांनीं अगर वर्षानीं अनुभवास आला असें सांगणारे त्यांचे भक्त होते व आहेत. अशा प्रसंगीं अंतरज्ञानानें जाणलेल्या गोष्टींचा जे लाक्षणिक शब्दांनीं उच्चार करून दाखवीत आणि ज्यास त्यांतून उपदेश अगर भविष्यकाळीं घडणाऱ्या गोष्टींचा इशारा घेतां येईल, त्यांनीं तो आपापल्या बुद्ध्यनुसार घ्यावा अशी सर्वत्रांची समजूत होती. इ. स. १९०९ अगर १९१० सालीं आम्ही व आमचे सर्व कुटुंब एलिचपुरास आमच्या बागेत राहात असतां सरकारकडून राजद्रोहाच्या आरोपावरून आमच्या घराची तपासणी म्हणजे झडती घेण्यात आली. हें झडती घेण्याचें

काम ४–५ तास चालू होतें. सदरहू झडतींत आमच्या कुटुंबावर जेणेंकरून दोषाराप येईल असें कांहींहि सांपडलें नाहीं. त्या वेळीं आमचे वडील श्रीमंत दादासाहेब हे इंग्लंडमध्ये होते. आणि आमच्या मातुःश्री ह्या शेगांवास श्रीगजानन-महाराजांच्या दर्शनास गेल्या होत्या. त्या महाराजांस गुरुस्थानीं मानीत असत. महाराजांच्या जवळ बसल्या असतां ज्या दिवशीं आमच्या एलिचपूर येथील घराची सरकारतपासणी झाली त्या दिवशीं महाराज त्यांच्याकडे पाहून म्हणाले, “पुष्कळ झडती झाली. बामणाचे पोटे बदमास आहेत. पत्ता लागूं दिला नाहीं. अशानें काय होतें?” हीं वाक्यें महाराज एकदोनदां पुनः पुन्हां बोलले. अर्थात् त्या वेळेस याचा अर्थ कोणालाहि कांहींच समजला नाहीं. पुढें आमच्या मातुःश्री घरीं आल्यानंतर त्यांना घराची झडती झाल्याची हकीकत समजली तेव्हां महाराज काय बोलले तें त्यांनीं आम्हांस सांगितले आणि वेळ ताडून पाहतां महाराजांनी हे उद्गार काढण्याची आणि आमच्या घरीं झडती चालू असल्याची वेळ एक होती असें स्पष्ट ठरलें.

महाराज अशा प्रकारें संदिग्ध बोलत आणि त्यांच्या शब्दांचा अर्थ कसा लावून घ्यावा लागत असे किंवा प्रसंगोपात लागत असे याचें हें उदाहरण म्हणून आम्ही येथें नमूद केलें आहे. अशीं उदाहरणें अनेक सांगता येतील, अनेक लोकांसहि माहीत असतील. महाराजांच्या तोंडीं जीं भाषणें घातलीं आहेत तीं, अर्थात् त्यांनीं तत्कालीन उच्चारलेल्या शब्दांचे गोषवारे अगर अर्थांतरें आहेत. ही गोष्ट महाराजांची वृत्ति माहीत असणाऱ्यास सहज पटण्यासारखी आहे आणि यात कांहीं वावगें आहे असेंहि नाहीं. श्रीसिद्धार्थ, बुद्ध, येशू ख्रिस्त अगर महंमद जे शब्द बोलले ते आज धर्मग्रंथांच्या रूपांनीं प्रसिद्ध आहेत. परंतु हे धर्मग्रंथ हे धर्मदाते इहलोक सोडून गेल्यानंतर अनेक वर्षांनीं आणि क्वचित् अनेक शतकांनीं लिहिले गेले हेंहि इतिहासप्रसिद्धच आहे.

धर्मद्रष्टे बोलत असतांना त्यांच्या भोवतीं हल्लींप्रमाणें लघुलिपि–लेखक नव्हते, कीं ज्यांनीं त्यांचा शब्द लघु-लिपीनें लिहून घेतला असेल. म्हणून सिद्ध–पुरुषांविषयीं लिहीत असतांना व त्यांच्या उपदेशाचें अगर त्यांनीं केलेल्या



चमत्कारांचें वर्णन करीत असतांना स्वबुद्धयनुसार त्याचा आशय प्रकट करणें अपरिहार्य असतें. हें कार्य श्रीदासगणू यांनी फार सुंदर रीतीने केलें यांत किमपीहि शंका नाहीं.

योगशास्त्राच्या परंपरेंत योग्याच्या उन्मत्त, पिशाच्च व बाल अशा तीन वृत्ति सांगितल्या आहेत. महाराजांच्या संगतींत राहून ज्यांनी त्यांच्या वृत्तीचें मनःपूर्वक अभ्यासून अवलोकन केलें असेल त्यांना महाराजांच्या ठिकाणीं शेवटीं शेवटीं बालवृत्ति कशी बाणली होती त्याची साक्ष पटल्यावांचून राहणार नाहीं. लेंकराच्या लहान देहाचें सर्वस्वी संगोपन जसें इतरांस करावें लागतें, त्याप्रमाणें महाराजांच्या देहाचें संगोपन व संरक्षण भोंवतालच्या लोकांस करावें लागत असे. महाराजांची स्वतःची वृत्ति लेंकराप्रमाणें इहलोकाच्या विकारापासून सर्वथैव निर्लेप झाली होती. इहपरलोकांची उभय जागृति त्यांचे ठिकाणीं एकसमयींच वास करीत होती, हे तज्ज्ञांस पटणें कठीण नव्हते. महाराजांच्या वृत्तीचे इतरत्रहि योगी आढळले.

शिर्डीचे साईबाबा हे त्यांपैकीं एक होते. श्रीसाईबाबांची व महाराजांची वृत्ति समसमान होती, ह बरवर पाहाणा-रांसहि पटण्यासारखें होतें. तें उभयतां एकमेकांस अंतःसाक्षीने आळखीत असत, असें मानण्यास जागा आहे. जे दिवशीं शेगांवीं महाराजांनी देह ठेविला ते दिवशीं साईबाबा दिवसभर शोक करीत होते. ज्या क्षणीं श्रीगजाननबुवा अथवा गजाननमहाराजांचें देहावसान झालें त्या वेळीं श्रीसाईबाबा गडबडा लोळले आणि माझा जीव चालला–मोठा जीव चालला असे विव्हळून अनेकवार ओरडले, असे आमचे वडील (श्री. कै. दादासाहेब) सांगत असत. त्यांचे म्हणणें असेंहि होतें कीं श्रीगजाननमहाराजांनी आपल्या परिवारांचें सर्व कल्याण, देहत्याग करतांना श्रीसाईबाबांवर सोंपविलें, म्हणून त्यानंतर तेव्हांपासून ते स्वतः व आमच्या मातुःश्री उभयतां श्रीसाईबाबांस गुरुस्थानीं मानू लागले. अर्थात् हा अंशतः श्रद्धेचाहि प्रश्न असेल.

आमच्या ऐकीव माहितीप्रमाणें श्रीगजाननमहाराज हे पूर्वाश्रमीं फार विद्वान् व वेदवेदांगवित् असे तैलंग ब्राह्मण होते अशी आख्यायिका आहे. त्यांस वेदमंत्र म्हणताना व तैलंग भाषेत बोलतांना ऐकल्याचेहि कांहीं लोक सांगत असत. मध्यंतरी श्रीगजाननमहाराज हयात असतानाच एक निस्संग तरुण साधु आपण त्यांचे शिष्य आहो असें सांगत असत. ते आमचे येत अनेक वेळा कित्येक आठवडे राहात असत. त्यांच्या तोंडून महाराजांच्या तारुण्यावस्थेची पुष्कळ हकीकत ऐकावयास मिळत असे. आता हे साधुमहाराज कोठे आहेत सांगता येत नाही. ते न कळविता यत व न विचारता निघून जात. एकदां जे गेले ते पुन्हां आले नाहींत. कदाचित् कालवशहि झाले असतील. काय सांगावे ?

या ग्रंथांत अनेक प्रसंगांचे व विशेषतः लोकमान्य टिळकांच्या व्याख्यानाचे प्रसंगीं महाराज उपस्थित असल्याचे व अन्य प्रसंगी महाराजांविरुद्ध कोर्टानें वॉरंट काढल्याचे वगैरे प्रसंग फार रसभरित, सुंदर वर्णन केलें आहेत. अनेक प्रसंगी उल्लेखिलेल्या व्यक्ति हल्लींच्या पिढींत पुष्कळांस परिचित असल्यामुळें हे प्रसंग वाचतांना ते डोळ्यांसमोर घडत असल्याचा भास होतो आणि ज्यांनी ते प्रसंग प्रत्यक्ष पाहिले आहेत, त्यानंतर आपण पुनरपि तो काळ प्रत्यक्ष पाहात आहों, असे वाटतें.

एकंदर ग्रंथ मोठा सुरेख, उद्बोधक व मुमुक्षूंस मार्गदर्शक असा झाला आहे. भक्तिमार्गाच्या प्रणालिकेत संतलीलामृतादि ग्रंथ जसे चिरस्मरणीय झाले आहेत, तसा हाहि ग्रंथ होईल असा भरंवसा वाटतो.

उमरावती, ता. २३–३–४७ बा. ग. खापर्डे

---

## ॥ श्रीगजानन विजय ग्रन्थः प्रारंभः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी उदारकीर्ती । जयजयाजी प्रतापज्योती । जयजयाजी हे गणपती ! । गौरीपुत्रा मयूरेश्वरा ! ॥ १ ॥ कार्यारंभीं तुझें स्मरण । करित आले जन । मोठमोठाले विद्वान । साधुसंत सत्पुरुष ॥ २ ॥ तुझ्या कृपेची अगाध शक्ती । विघ्ने अवघीं भस्म होतीं । कापुसाचा पाड किती । अग्नीपुढें दयाघना ! ॥ ३ ॥ म्हणून आदरें वंदना । करीतसे मी तुझ्या चरणा । सुरस करवी पद्यरचना । दासगणूच्या मुखानें ॥ ४ ॥ मी अज्ञान मंदमती । नाहीं काव्यव्युत्पत्ति । परी तूं वास केल्या चित्तीं । कार्य माझें होईल हें ॥ ५ ॥ आतां आदि माया सरस्वती । जी ब्रह्माची होय प्रकृती । जी कविवरांची ध्येयमूर्ती । ब्रह्मकुमारी शारदा ॥ ६ ॥ त्या जगदंबेकारण । असो माझें साष्टांग नमन । मी लेकरूं आहे अजाण । अभिमान माझा धरावा ॥ ७ ॥ तुझ्या कृपेची अगाध थोरी । पांगळाही चढे गिरी । मुका सभेमाझारीं । देई व्याख्यान अस्खलित ॥ ८ ॥ त्या तुझ्या कीर्तीला । कमीपणा न आणि भला । साह्य दासगणूला । ग्रंथरचनेस करी या ॥ ९ ॥ आतां पुराणपुरुषा । पाडुरंगा । पंढरीशा सच्चिदानंदा रमेशा । " पाहि माम् " दीनबंधो ॥ १० ॥ तूं सर्वसाक्षी जगदाधार । तूं व्यापक चराचर । कर्ता करविता सर्वेश्वर । अवघे कांहीं तूंच तू ॥ ११ ॥ जग, जन आणि जनार्दन । तूंच एक परिपूर्ण । सगुण आणि निर्गुण । तूंच कीं रे मायबापा ॥ १२ ॥ ऐसा तुझा अगाध महिमा । जो न कळे निगमागमा । तेथें काय पुरुषोत्तमा । या गणूचा पाड असे ॥ १३ ॥ रामकृपा जेव्हां झाली । तेव्हां माकडां शक्ति आली । गोप तेही बनले बली । यमुनातीरी गोकुळात ॥ १४ ॥ तुझी कृपा व्हावया जाण । नाहीं धनाचें प्रयोजन ।

चरणीं होतां अनन्य । तूं त्यातें साह्य करिशी ॥ १५ ॥ ऐसा संतांनी डांगोरा । तुझा पिटला रमावरा । म्हणून आलो तुझ्या द्वारां । आतां विन्मुख लावूं नको ॥ १६ ॥ हे संतचारित्र रचावया । साह्य करी पंढरीराया । माझ्या चित्तीं बसोनिया । ग्रंथ कळसा नेई हा ॥ १७ ॥ हे भवभवान्तक भवानीवरा । हे नीलकंठा गंगाधरा । ओंकाररूपा त्र्यंबकेश्वरा । वरदपाणी ठेवा शिरीं ॥ १८ ॥ तुझे साह्य असल्यावर । काळाचाही नाहीं दर । लोखंडासी भांगार । परीस करून ठेवीतसे ॥ १९ ॥ तुझी कृपा हाच परीस । लोखंड मी गणूदास । साह्य करी लेंकरास । परतें मजला लोटूं नको ॥ २० ॥ तुला अशक्य कांहीं नाहीं । अवघेंच आहे तुझ्या ठाईं । लेंकरासाठीं धांव घेई । ग्रंथ सुगम वदवावया ॥ २१ ॥ माझ्या कुळीची कुलदेवता । कोल्हापुरवासिनी जगन्माता । तिच्या पदीं ठेवितों माथा । मंगल व्हाया कारणें ॥ २२ ॥ हे दुर्गे तुळजे भवानी । हे अपर्णे अंबे मृडानी । ठेवी तुझा वरदपाणी । दासगणूच्या शिरावर ॥ २३ ॥ आतां वंदन दत्तात्रया । पाव वेगीं मसी सदया । गजाननचरित्र गाया । प्रसादासह स्फूर्ति दे ॥ २४ ॥ आतां शांडिल्यादि ऋषीश्वर । वसिष्ठ गौतम पाराशर । ज्ञाननभीं जो दिनकर । त्या शंकरचार्या नमन असो ॥ २५ ॥ आतां अवघ्या संतमहंतां । नमन माझें सर्वथा । दासगणूच्या धरून हाता । ग्रंथ करवा लेखन ॥ २६ ॥ गहिनी निवृत्ति ज्ञानेश्वर । श्रीतुकाराम देहूकर । हे भवाब्धीचें तारूं थोर । त्या श्रीरामदासा नमन असो ॥ २७ ॥ हे शिर्डीकर साई समर्था । वामनशास्त्री पुण्यवंता । दासगणूमी अभय आतां । तुमचें असो द्या संत हो ॥ २८ ॥ तुम्हां अवघ्यांच्या कृपेनें । मी हें करीन बोलणें । दासगणू मी तुमचें तान्हें । कठोर मजविषयीं होऊं नका ॥ २९ ॥ जी कां खरी माया असते । तीच बोलाया शिकविते । तुमचें माझे असें नातें । म यलेंकापरी हो ॥ ३० ॥ लेखणी काढी अक्षर । परी तो तिच्यांत नाही जोर । ती निमित्तकारण साचार । लेखनरूपी कार्याला ॥ ३१ ॥ दासगणू लेखणी येथ । तुम्ही धारण करा ती अवघे संत । ग्रंथरचना रसभरित । हीच आहे प्रार्थना ॥ ३२ ॥ आतां श्रोते सावधान । संतकथेचें करा श्रवण । करोनिया एकाग्र मन । निजकल्याण व्हावया ॥ ३३ ॥ संत हेच भूमित्र । चालते बोलते परमेश्वर । वैराग्याचे सागर । दाते मोक्षपदाचे ॥ ३४ ॥ संत हेच सन्नीतीची । मूर्ति होय प्रत्यक्ष साची । संत मठ्य कल्याणाची । पेठ आहे विबुध हो ॥ ३५ ॥ त्या संतचरित्रास । श्रवण करा सावकाश । आजवरी ना कवणास । संतांनीं या दगा दिला ॥ ३६ ॥ ईश्वरी तत्त्वाचे वाटाडे । संत हेचि रोकडे । अमोघ ज्ञानाचं ते गाडे । भरले अपती प्रत्यक्ष ॥ ३७ ॥ संतचरणीं ज्याचा हेत । त्यांचा ऋणी रुक्मिणीकांत । आतां मलरहित करा चित्त । गजाननचरित्र ऐकावया ॥ ३८ ॥ भरतखंडामाझारीं । संत झाले बहुतापरी । ही न पर्वणी आली खरी । अवांतर देशांकारणें ॥ ३९ ॥ जंबुद्वीप हें धन्य धन्य । आहे पहिल्यापासोन । कोणत्या सुखाची ही वाण । येथें न पडली आजवरी ॥ ४० ॥ याचें हेच कारण । या भूमीस संतचरण । अनादि कालापासोन । लागत आले आहेत कीं ॥ ४१ ॥ नारद, ध्रुव, कयाधूकुमर । उद्धव, सुदामा, सुभद्रावर । महाबली अंजनीकुमर । अजातशत्रू धर्मराजा ॥ ४२ ॥ शंकराचार्य जगद्गुरु । जे पदनतांचे कल्पतरु । जे अध्यात्मविद्येचे मेरु । याच देशीं झाले हो ॥ ४३ ॥ मध्व–वल्लभ–रामानुज ।

यांचा ऋणी अधोक्षज । ज्यानें धर्माची राखिली लाज । निज सामर्थ्य दावोनिया ॥ ४४ ॥ नरसी मेहता तुलसीदास । कबीर कमाल सुरदास । गौरंग-प्रभूच्या लीलेस । वर्णन करवें कोठवरी ? ॥ ४५ ॥ राजकन्या मिराबाई । तिच्या भक्तीस पार नाहीं । जिच्यासाठी शेषशायी । प्राशिता झाला विषातें ॥ ४६ ॥ गोरख-मच्छेंद्र जालंदर । जे कां योगयोगेश्वर । ज्यांचा नवनाथ भक्तिसार । ग्रंथ असे लीलेचा ॥४७॥ ज्यांनीं नुसतीच हरिभक्ति । करून साधिला श्रीपता । त नामा नरहरी सन्मति । जनीं कान्हो संतसखू ॥ ४८ ॥ चोखा-सावता-कूर्मदास । दामाजीपत पुण्यपुरुष । ज्यांच्या कारणें बेदरास । गेला महार होऊन हरी ॥ ४९ ॥ मुकुंदराज जनार्दन । बोधला निपट निरंजन । ज्यांचीं चरित्रें-गायन । केलीं मागें महिपतींनीं ॥ ५० ॥ म्हणून त्यांचा नांवें येथ । मी न साकल्यें आतां देत । नुसते सांगतों वाचा ग्रंथ । भक्तिविजय भक्तमाला ॥ ५१ ॥ त्यानंतर जे जे झाले । त्या त्या संता मी गाइले । ग्रंथ असती तीन केले । ते पहा म्हणजे कळेल कीं ॥ ५२ ॥ त्या संतांच्या तोडीचा । संत श्रीगजानन साचा । या अवतारी पुरुषाचा । प्रभाव क्वचित लोकोत्तर ॥ ५३ ॥ मी जीं मागें गाईलीं । संतचरित्रें असतीं भलीं । तीं सारांशरूपें सांगितली । त्रय ग्रंथांतून विबुध हो ॥ ५४ ॥ आता हें सांगोपांग । चारित्र कथितां ऐका चांग । मम सुदैवें आला योग । हें चरित्र रचण्याचा ॥ ५५ ॥ जो प्रथमतांच मी पाहिला । आकोटासन्निध संत भला । तोच मागे राहिला । त्याचें एका कारण ॥ ५६ ॥ माळा आधीं ओविती । मग मेरुमणी जोडिती । तीच आजी झाली स्थिति । ह्या चरित्र रचण्याची ॥ ५७ ॥ शेगांव नामें वऱ्हाडांत । ग्राम आहे



प्रख्यात । खामगांव नामें तालुक्यांत । व्यापार चालें जेथ मोठा ॥ ५८ ॥ ग्राम लहान साचार । परि वैभव त्याचें महाथोर । ज्याचें नांव अजरामर । झालें साधूमुळें जगत्रयीं ॥ ५९ ॥ त्या शेगांव सरोवरीं भलें । गजानन कमल उदया आलें । जें सौरभें वेधितें झालें । या अखिल ब्रह्मांडा ॥ ६० ॥ हा शेगांव खाणीचा । हिरा गजानन होय साचा । प्रभाव त्या अवलियाचा । अल्पमतीनें वानितो मी ॥ ६१ ॥ तें आतां अवधारा । गजाननचरणीं प्रेम धरा । येणें तुमचा उद्धार खरा । होईल हें विसरूं नका ॥ ६२ ॥ गजाननचारित्र मेघ थोर । तुम्ही श्रोते अवघे मोर । चरित्ररूपीं वर्षता नीर । नाचाल वाटे निःसंशय ॥ ६३ ॥ शेगांवचे पौरवासी । परम भाग्याचें निश्चयेसी । म्हणून लाधले तयांसी । गजानन हे संतरत्न ॥ ६४ ॥ जेव्हां करावे लागे पुण्य । तेव्हाच लाभती संतचरण । संतश्रेष्ठ देवाहुन । येविषयीं शंका नसे ॥ ६५ ॥ रामचंद्र पाटलानीं । केली माझी विनवणी । पंढरी क्षेत्रीं येऊनि । कार्तिकीच्या वारीला ॥ ६६ ॥ माझ्या मनीं हेत होता । गावें गजानन-चरित्रा । परी त्याची तत्त्वतां । संगत नाहीं लागली ॥ ६७ ॥ त्या माझ्या वासनेंची । पूर्तता करण्यासाठीं । केली रामचंद्राची । योजना या समर्थें ॥ ६८ ॥ खऱ्या संताचें धोरण । न कळे कोणालागोन । महापुरुष गजानन । आधुनिक संत चूडामणी ॥ ६९ ॥ या महापुरुषाचा । ठावठिकाण कोणचा । वा पत्ता त्यांच्या जातीचा । इतिहासदृष्ट्या न लागे कीं ॥ ७० ॥ जेवीं ब्रह्माचा ठावठिकाण । न कळे कोणा लागून । ते ब्रह्मास पाहून । निश्चय त्याचा करणें असे ॥ ७१ ॥ जो कां हिरा तेजमान पूर्णपणें असे जाण । तेज त्याचें पाहोन । ज्ञातं तल्लीन होती कीं ॥ ७२ ॥ तेथें त्या हिऱ्याची । खाण

आहे कोणची । हें विचारीं आणण्याची । गरज मुळीं रहात नसे ॥ ७३ ॥ ऐन तारुण्याभीतरीं । गजानन आले शेगांवनगरी । शके अठराशाभीतरी । माघ वद्य सप्तमीला ॥ ७४ ॥ कोणी कोणी म्हणती जन । श्रीसमर्थांचे जें का स्थान । त्या सज्जनगडाहून । या देशीं आले हे ॥ ७५ ॥ परि याला पुरावा । सबळ ऐसा नाहीं बरवा । परी कांहीं तरी असावा । अर्थ त्यांच्या म्हणण्यांत ॥ ७६ ॥ लोक अवघे भ्रष्ट झाले । नाना यातनें गांजले । त्यांच्यासाठीं वाटतें केलें । कौतुक ऐसें समर्थांनीं ॥ ७७ ॥ जगाचा करण्या उद्धार । गजाननरूपें अवतार । धरून आले महीवर । पुन्हां समर्थ सिद्धयोगी ॥ ७८ ॥ कोणत्याही कलेवरीं । योगीपुरुष प्रवेश करी । ऐसा प्रकार भूमीवरी । जगद्गुरूंनीं केला असे ॥ ७९ ॥ गोरख जन्मला उकिरड्यांत । कानीफा गजकर्णांत । चांगदेव नारायण डोहांत । योनींवांचून प्रगटले ॥ ८० ॥ तैसेच येथें कांहीतरी । झालें असावें निर्धारीं । गजाननासी अंगें सारीं । होतीं योगाची अवगत ॥ ८१ ॥ हें त्याच्या लीलेवरून । पुढे कळेल तुम्हांलागून । योगाचें अगाध महिमान । त्याची सरी न ये कोणा ॥ ८२ ॥ शेगांवी माघमासी । वद्य सप्तमी ज्या दिवशीं । हा उदय पावला ज्ञानराशी । पदनतातें तारावया ॥ ८३ ॥ त्या वेळची तुम्हां कथा । सांगतों मी ऐका आतां । एक भाविक गृहस्थ होता । नाम ज्याचें देविदास ॥ ८४ ॥ हा देविदास सज्जन पातूरकरांचा वंशज जाण । शाखा ज्यांची माध्यंदिन । मठाधिपती होता हो ॥ ८५ ॥ त्याच्या एका मुलाची । ऋतुशांति होती साची । त्यानिमित्त भोजनाची । तयारी होती त्याचे घरा ॥ ८६ ॥ उष्ट्या पत्रावळी रस्त्यावर । टाकिल्या होत्या साचार । घराचिया समोर । त्या



देविदास विप्राच्या ॥ ८७ ॥ तो गजानन समर्थसिद्धयोगी । बैसले होते तया जागीं । एक बंडी होती अंगीं । जुन्या पुराण्या कापडाची ॥ ८८ ॥ कोणत्याहि उपाधीचें । नांव नव्हतें जवळीं साचें । पात्र पाणी प्यावयाचें । होता एक भोपळा ॥ ८९ ॥ कच्ची चिलीम हातांत । जी होती तयांचीं स्वकृत । कुंभाराच्या भट्टीप्रत । जिनें नव्हतें पाहिलें ॥ ९० ॥ नासाग्र दृष्टि मुद्रा शांत । तपोबल अंगीं झळकत । प्राचीच्या बालरवीवत् । वर्णन किती करावें ॥ ९१ ॥ मूर्ति अवधी दिगंबर । भाव मावळला आपपर । आवडनिवड साचार । राहिली न जवळी जयाच्या ॥ ९२ ॥ ती समर्थांची स्वारी । बैसोनिया रस्त्यावरी । शोधन पत्रावळीचें करी । केवळ निजलीलेने ॥ ९३ ॥ शीत पडल्या दृष्टीप्रत । तें मुखीं उचलुनी घालीत । हेच करण्याचा हाच हेत । 'अन्नपरब्रह्म' कळवावया ॥ ९४ ॥ कां कीं गर्जोन सांगे श्रुती । अन्न हें ब्रह्म निगुती । "अन्नम् ब्रह्मेति" ऐसी उक्ती । उपनिषदांठायीं असे ॥ ९५ ॥ त्याची पटवावया खूण । शितें वेंचतीं दयाघन । त्याचा सामान्य जना लागून । भावार्थ तो कळला नसे ॥ ९६ ॥ बंकटलाल आगरवाला । होता रस्त्यानें चालला । त्याने हा प्रकार पाहिला । आपल्या त्या स्नेह्यासह ॥ ९७ ॥ दामोदरपंत कुलकर्णी । त्याच्या स्नेह्याचे नांव जाणी । दोघें तो प्रकार पाहोनी । आश्चर्यचकित जाहले ॥ ९८ ॥ आणि एकमेकांप्रत । बोलूं लागले ऐसें सत्य । कीं याची करणी विपरीत । वेड्यापरी दिसतसे ॥ ९९ ॥ हा अन्नार्थी जरी असतां । तरी पात्र मागून घेता । देविदासही यातें देता । कां की तोही सज्जन ॥ १०० ॥ द्वारीं आलेला याचक । लावीं ना सुज्ञ परत देख । कांहीं न चाले तर्क । कृतीवरूनी यांच्या ह्या ॥ १ ॥ बंकटलाल म्हणे पंतासी ।

ऐसें उभे रस्त्यासी । आपण राहूं यत्कृतीसी । अजमावयाकारणें ॥ २ ॥ खरे साधू पिशापरी । जगीं वागती वरवरी । ऐसी व्यासाची वैखरी । बोलली आहे भागवतात ॥ ३ ॥ कृतीनें हा दिसे वेडा । परी वाटे ज्ञानगाडा । वा विमल ज्ञानाचा हुडा । असावा कीं प्रत्यक्ष ॥ ४ ॥ ऐसा विचार परस्पर । करूं लागले साचार । रत्न असता समोर । पारखी तोच जाणे त्या ॥ ५ ॥ पंथें हजारो लोक गेले । परी न कोणी पाहिले । या दोघांवांचून भले । याचा विचार करा हो ! ॥ ६ ॥ हिरे गारा एक्या ठायीं । मिसळल्या असती जगा ठायीं । पारखी तो निवडून घेई । गार टाकून हिऱ्यातें ॥ ७ ॥ प्रथमता तो पुढें झाला । बंकटलाल आगरवाला । गजाननासी विचारण्याला । विनयानें येणें रीतीं ॥ ८ ॥ ह्या पत्रावळीच्या शोधना । कां हो करितां कळेना । क्षुधा असेल आपणां । तरी तरतूद करूं अन्नाची ॥ ९ ॥ त्यानें ऐसे विचारिलें । परि न उत्तर मिळालें । नुसतें वरी पाहिलें । उभयतांच्या मुखाकडे ॥ ११० ॥ तो सतेज कांती मनोहर । दंड गर्दन पिळदार । भव्य छाती दृष्टि स्थिर । भृकुटी ठायीं आली असे ॥ ११ ॥ निजानंदी रंगलेला । ऐसा योगी पाहिला । मौनेंच नमस्कार केला । चित्तीं संतोष पावोनिया ॥ १२ ॥ देविदासबुवासी । सांगू लागले प्रेमेंसी । तुम्ही पात्र वाढून वेगेंसी । आणा एक बाहेर ॥१३॥ देविदासें तैसें केलें । पक्वान्नांनीं भरलेलें । पात्र आणून ठेविलें । द्वारासमोर स्वामींपुढें ॥ १४ ॥ ठेविलेल्या पात्रावरी । भोजना बैसली समर्थस्वारी । चवी न कशाची अंतरी । अणुमात्र उरली असे ॥ १५ ॥ अनुपम ब्रह्मरसाला । जो पिऊन तृप्त झाला । तो कां मागतो गुळवण्याला । मिटक्या मारीत



बैसेल ? ॥ १६ ॥ जो सार्वभौम नृपवर । झाला असे साचार । अशा नरासी जहागीर । मिळाल्यासी प्रेम नुपजे ॥ १७ ॥ अवघीं पक्वान्नें एक केलीं । आवडनिवड नाहीं उरलीं । जठराग्नीची तृप्ति केली । दोन प्रहराच्या समयाला ॥ १८ ॥ बंकटलाल तें पाहून । पंतासी करी भाषण । ह्या वेडा म्हणालों आपण । ती निःसंशय झाली चुकी ॥ १९ ॥ सुभद्रेसाठीं द्वारकेला । अर्जुन ऐसाच वेडा झाला । व्यवहाराचा विसर पडला । करूं लागला भलभलतें ॥ १२० ॥ तैसाच हा ज्ञानजेठी । मुक्तिरूप सुभद्रेसाठीं । वेडा झाला कसवटी । याची आतां घेणे नको ॥ २१ ॥ धन्य आपुले शेगांव । दृष्टी पाहिला योगीराव । "निरिच्छा" हा जहागीरगांव । दिला हरीनें जयाला ॥ २२ ॥ सूर्य मध्यान्हीं आला । भाग भूमीचा तप्त झाला । पांखरेंही आश्रयाला । जाऊन बैसलीं वृक्षावरी ॥ २३ ॥ ऐशा भर उन्हांत । हा बैसला आनंदांत । हा ब्रह्मची होय साक्षात् । भय ना कशाचें उरलें या ॥ २४ ॥ हा जेवला यथेच्छपणीं । तुंब्यामध्यें नाहीं पाणी । तें पंता यालागुनी । आपण देऊं आणून ॥ २५ ॥ पुसूं लागले दामोदर । तुंब्यामध्यें नाहीं नीर । मर्जी असल्या हा चाकर । पाणी द्याया तयार असे ॥ २६ ॥ ऐसे शब्द ऐकिले । समर्थांनीं हास्य केलें । उभयतांसी पाहून वदले । तें ऐका सांगतो ॥ २७ ॥ तुम्हां गरज असेल जरी । तरी आणून घाला वारी । एक ब्रह्म जगदांतरीं । ओतप्रोत भरलें असें ॥ २८ ॥ तुम्ही आम्ही भेद तेथ । नाहीं उरला यत्किंचित । परी जगव्यवहार सत्य । आचारिला पाहिजे ॥ २९ ॥ अन्न भक्षिलें देहानीं । म्हणून त्या पाहिजे । पाणी हा व्यवहार चतुरांनीं । अवश्य पाहिजे जाणिला ॥ १३० ॥

म्हणून तुमच्या चातुर्यासी । गरज असल्या तुम्हां साची ।· तरतूद करा पाण्याची । म्हणजे अवघें संपलें ॥ ३१ ॥ हें भाषण ऐकतां । दोघे हर्षले तत्त्वतां । बंकटलाल म्हणे पंता । आपुलें आहे भाग्य धन्य ॥ ३२ ॥ पाणी आणण्या दामोदर । घरांत गेले साचार । तों इकडे प्रकार । काय घडला तो ऐका ॥ ३३ ॥ कूपाचिया शेजारीं । हाळ होता निर्धारी । जेथें जनावरें सारीं । पीत होतीं पाण्याला ॥ ३४ ॥ तेथें जाऊन पाणी प्याले । तृप्ततेचे ढेकर दिले । तों इतक्यांत घेऊन आले । पंत पाणी गडव्यांत ॥ ३५ ॥ हां हां तें गढूळ पाणी । समर्था न लावा वदनीं । तें जनावरालागुनी । योग्य आहे प्यावया ॥ ३६ ॥ मीं हें पहा आणिलें नीर । गोड निर्मळ थंडगार । वासित केलें साचार । वाळा घालून यामध्यें ॥ ३७ ॥ ऐसें भाषण ऐकतां । महाराज वदले तत्त्वतां । व्यावहारिक अवघ्या कथा । ह्या न सांगा आम्हां तुम्ही । ॥ ३८ ॥ हें अवघें चराचर । ब्रह्में व्याप्त साचार । तेथें गढुळ, निर्मळ, वासित नीर । हे न भेद राहिले ॥ ३९ ॥ पाणी तरी तोंच आहे । निर्मळ गडुळ तोच पाहे । सुवास कुवास दोन्ही हें । रूप त्याचें निःसंशय ॥ १४० ॥ पिणाराही वेगळा । त्यापासून ना निराळा । ईश्वराची अगाध लीला । ती कळे या नरजन्मीं ॥ ४१ ॥ तें दिलें टाकून । व्यवहारीं गोविलें मन । याचेंच करा सदा मनन । कशापासून जग झालें ॥ ४२ ॥ ऐसी ऐकतां समर्थवाणी । दोघे गेले गहिंवरोनि । अनन्यभावें समर्थचरणी । लोळावया तयार झाले ॥ ४३ ॥ तो त्यांचा जाणोन हेत । महाराज निघाले पळत पळत । वायूच्या त्या गतिप्रत । अडथळा जगीं कोण करी ? ॥ ४४ ॥ या पुढील कथा



पाही । निवेदन होईल द्वितीयाध्यायीं । अवधान द्यावें लवलाही । त्या श्रवण करावया ॥ ४५ ॥ हा श्रीगजाननविजय ग्रंथ । आल्हादावो भाविकांप्रत । हेच विनवी जोडोन हात । ईश्वरासी दासगणू ॥ १४६ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु । शुभं भवतु ॥

॥ इति प्रथमोऽध्यायः समाप्तः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ जयजय अज अजिता सर्वेश्वरा । हे चंद्रभागातटविहारा । पूर्णब्रह्मा रुक्मिणीवरा । दीनबंधो पाहि माम् ॥ १ ॥ तुझ्या वशिल्यावांचून । अवघेच देवा आहे शीण । कुडी-माजीं नसल्या प्राण । कोण विचारी मढ्यातें ॥ २ ॥ सरोवराची दिव्य शोभा । तोयामुळें पद्मनाभा । रसभरीत आंतला गाभा । टरफलातें महत्त्व आणी ॥ ३ ॥ तुझी कृपा त्याच परी । शरणागतातें समर्थ करी । पाप ताप दैन्य वारी । हेंच आहे मागणें ॥ ४ ॥ मागले अध्यायीं झालें कथन । समर्थ गेले निघून । तेणें बंकटलाला लागून । हुरहूर वाटूं लागली ॥ ५ ॥ गोड न लागे अन्नपाणी । समर्थांचा ध्यास मनीं । न हाले दृष्टीपासोनी । गजाननाचें रूप तें ॥ ६ ॥ जिकडे पहावे तिकडे भास । होवो लागला त्यांचा खास । याचें नांव श्रोते ध्यास । उग्या नसती पोरचेष्टा ॥ ७ ॥ चुकलेल्या धेनूची । वत्स शुद्धि करी साची । तैसी बंकटलालाची । स्थिती झाली विबुध हो । ॥ ८ ॥ हें हितगुज सांगावया । जागा नव्हती कोठे तया । वडिलांपासीं बोलावया । छाती त्याची होईना ॥ ९ ॥ ऐशा रीति चित्तीं भलें । विचाराचें काहूर झालें । शेगांव अवघें धुंडाळिले । परी न पत्ता लागला ॥ १० ॥ घरीं येतां वडील पुसती । भवानीराम सन्मती । बाळा तुझी आज वृत्ती । कां रे झाली चंचळ ॥ ११ ॥ चित्तीं उत्साह दिसेना । वदनीं दिसे म्लानपणा । ऐशा असह्य यातना । होती कशाच्या सांग मज ! ॥ १२ ॥ तूं पोऱ्या तरणा ज्वान । नाहीं कशाची तुला वाण । ऐसें साध असोन । चिंतातुर दिसतोसी ॥ १३ ॥ किंवा शरीरीं कांहीं व्यांधी । होतसे ती सांग आधीं । चोरून पुत्र ठेवी न कधीं । गोष्ट कोणती पित्याला ॥ १४ ॥ कांहीं तरी सांगून । केलें

पित्याचें समाधान । पुन्हा शोधाकारण । फिरूं लागला शेगांवीं ॥ १५ ॥ बंकटलालाचे शेजारीं । एक होते सदाचारी । घरीं होती जमेदारी । परी अभिमान नसे त्याचा ॥ १६ ॥ ते देशमुख रामाजीपंत । वयाने वृद्ध अत्यंत । बंकटलालानें इत्थंभूत । हकीकत त्याना निवेदिली ॥ १७ ॥ ते बोलले बंकटलाला । तुझा वृत्तान्त मी ऐकिला । तूं जो पुरुष कथिसी मला । तो योगी असावा कोणीतरी ॥ १८ ॥ योग्यावांचुनी ऐशा क्रिया । मिळती न कोठें पाहावया । पूर्वसुकृता-वांचोनियां । होणें न दर्शन अशाचें ॥ १९ ॥ तूं घेतलें दर्शन । जन्म तुझा धन्य धन्य । भेटता ते तुजलागून । ने मलाही दर्शना ॥ २० ॥ ऐशा स्थितांत दिवस चार । गेले निघून साचार । बंकटलालासी तीळभर । विसर न पडे तयाचा ॥ २१ ॥ गोविंदबुवा* टाकळीकर । होते एक कीर्तन-कार । ज्यांच्या कीर्तनीं शारंगधर । प्रसन्नचित्त होतसे ॥ २२ ॥ लौकिक त्यांचा वऱ्हाडांत । होता मोठ्या प्रमाणांत । ते आले फिरत फिरत । कीर्तन कराया शेगांवीं ॥ २३ ॥ शंकराच्या मंदिरीं । झाली कीर्तनाची तयारी । धांवो लागल्या नरनारी । कीर्तन ऐकायाकारणें ॥ २४ ॥ बंकटलालही तेथें आला । कीर्तन श्रवणासाठी भला । मध्यें शिंपी भेटला । पितांबर नाम ज्याचें ॥२५॥ हा शिंपी पितांबर । भोळा भाविक होता फार । त्यासी समर्थांचा समाचार । बंकटलालें कथन केला ॥२६॥ दोघे कीर्तना चालले । तों अवचित समर्थ पाहिले । मागल्या बाजूस बसलेले । फरसावरी तेधवां ॥२७॥ मग कशाचें कीर्तन । गेले उभयतां धांवून । जेवीं द्रव्य-घटातें पाहून । कृपण जाय हपापोनी ॥२८॥ वा चातकातें स्वातिघन । वा मोरासी मेघदर्शन । किंवा तो रोहिणीरमण । चकोर पाहातां आनंदें ॥ २९ ॥

* बार्शीटाकळी (अकोला) वऱ्हाड.



तैसें उभयतांसी झालें । दूर उभे राहिले । विनयानें बोलूं लागले । कांहीं आणूं का खावया ? ॥ ३० ॥ महाराज बोलले त्यावरी । तुला गरज असेल जरी । आण झुणकाभाकरी । माळणीच्या सदनांतून ॥ ३१ ॥ बंकटलालें सत्वरीं । चून[1] अर्धी भाकरी । आणोन ठेविली हातावरी । तया योगेश्वराच्या ॥ ३२ ॥ चून भाकरी खात खात । वदले पितांबरासी समर्थ । जा जावोनी ओढ्या-प्रत । तुंबा भरोनी आण पाणी ॥ ३३ ॥ पितांबर बोल गुरुराया । ओढ्यास पाणी अल्प सदया । पाण्यात तुंबा बुडावया । मुळीं नाहीं अवसर ॥ ३४ ॥ इतुकें असून तें पाणी । खराब केले गुरांनीं । तेवीं जाणाऱ्या येणाऱ्यांनीं । नाहीं पिण्याच्या योग्य तें ॥ ३५ ॥ मर्जी असल्या दुसरीकडून । पाणी आणितो तुंबा भरून । तैं बोलले गजानन । दुसरें पाणी आम्हा नको ॥ ३६ ॥ नाल्याचेंच आण पाणी । आंत तुंबा बुडवोनी । उगीच ओंजळी-ओंजळींनीं । तुंब्यांत पाणी भरूं नको ॥ ३७ ॥ तुंबा घेऊन पितांबर । तात्काळ गेला नाल्यावर । तुंबा भरेल ऐसें नीर । कोठें न त्यानें पाहिलें ॥ ३८ ॥ तळवे पदाचे भिजतील । इतुकेंच तेथें होते जल । करून हाताची ओंजळ । तुंब्यात पाणी भरणें नसे ॥ ३९ ॥ ऐसी झाली आड विहीर । चिंतावला पितांबर । हिय्या करून अखेर । तुंबें स्पर्श केला जला ॥ ४० ॥ तों ऐसें झालें अघटीत । तुंबा ठेवावा जेथ जेथ । तो बुडे तेथ तेथ । खळगा पडून ओढ्याला ॥ ४१ ॥ नाल्याचें घाण जीवन । तुंब्यात स्फटिकासमान । आलें तैसें पाहोन । शिंपी चित्तीं चकित झाला ॥ ४२ ॥ तो म्हणे ही ऐसी स्थिति । कीं आज

१. पिठले.

झाली निश्चिती । ती योगेश्वराची साच शक्ति । संशय येथें धरणें नको ॥ ४३ ॥ तुंबा आणून ठेविला । योगेश्वराचे सान्निध्याला । त्याचा समर्थें स्वीकार केला । झुणकाभाकर सेविल्यावर ॥ ४४ ॥ बंकटलालासी सुपारी । मागते झाले साक्षात्कारी । अरे माळीणीच्या भाकरीवरी । माझी सेवा करतोस कां ? ॥ ४५ ॥ काढ सुपारी खिशांतून । फोडोन देई मजकारण । तें ऐकतां समाधान । बंकटलालास झालें बहु ॥ ४६ ॥ सुपारीच्या बरोबरी । दोन पैसे हातावरी । ठेवितां झाला व्याघ्रांबरी । दुदंडी तांब्याचे ॥ ४७ ॥ खडक्कु दुदंडी व्याघ्रांबरी । ही मुसलमानी नाणीं सारी । चालत होतीं व्यवहारीं । तया वऱ्हाड प्रांतात ॥ ४८ ॥ पैशाप्रती पाहून । महाराज बोलले हांसोन । काय व्यापारी समजून । मजला तूं हें अर्पिसी ? ॥ ४९ ॥ हें नाणें तुमचें व्यवहारी । मला न त्याची जरूरी । भावभक्ति नाण्यावरी । संतुष्ट मी रहातसे ॥ ५० ॥ तें तुझ्याजवळ होतें । म्हणून भेटलों पुन्हां तूं तें । याचा विचार चित्तातें । करी म्हणजे कळेल ॥ ५१ ॥ जा आतां कीर्तन । दोघे जाऊन करा श्रवण । मी लिंबापाशीं बसोन । कथा त्याचो ऐकतो ॥ ५२ ॥ दोघे कीर्तनाप्रती आले । महाराज लिंबापाशीं बैसलें । गोविंदबुवाचें सुरू झालें । आरंभीचें निरूपण ॥ ५३ ॥ निरूपणासी भागवताचा । घेतला होता एक साचा । श्लोक एकादश स्कंधाचा । हंसगीतामधील ॥ ५४ ॥ बुवांनीं पूर्वार्धा विशद केलें । त्याचा उत्तरार्थ समर्थ वदले । तें ऐकोन घाटाळले । गोविंदबुवा मनांत ॥ ५५ ॥ हा उत्तरार्थ वदणारा । पुरुष अधिकारी दिसतो खरा । जा त्या घेऊन मंदिरा । या हो कीर्तनश्रवणास ॥ ५६ ॥ बंकटलाल पितांबर । आणिक मंडळी निघाली इतर । समर्थांसी



साचार । कीर्तनासी आणावया ॥ ५७ ॥ केली विनंती अवघ्यांनीं । श्रोते अती विनयांनीं । परी बसल्या जागेपासोनी । मुळीं न महाराज हलले हो ॥ ५८ ॥ गोविंदबुवा अखेर । येवोन जोडीते झाले कर । कृपा करावी एक वार । चला शिवाच्या मंदिरीं ॥ ५९ ॥ तुम्ही साक्षात् शंकर । बरें न बसण बाहेर । धन्यावांचून मंदिर । शून्य साच समर्था ॥ ६० ॥ पूर्वजन्मींचें पुण्य भलें । माझें आज उदेलें । म्हणून हे दृष्टी पडले । साक्षात् चरण शिवाचे ॥ ६१ ॥ कीर्तनाची फलप्राप्ती । झाली आज मजप्रती । वेळ न करा गुरुमूर्ती । चला मंदिरीं माझ्यासवें ॥ ६२ ॥ ऐसें गोविंदबुवा बोलतां । समर्थ वदले तत्त्वतां । ठेवी एकवाक्यता । भाषणीं गोविंदा लवमात्र ॥ ६३ ॥ तूं इतक्यांत प्रतिपादिलें । अवघें ईश्वरें व्यापिलें । आंत बाहेर कांहीं न उरलें । मग हा ऐसा हट्ट कां ? ॥ ६४ ॥ जें जें जयानें सांगावें । तें तें त्यानें आचरावें । शब्दच्छलासीं न करावें । साधकाने केव्हांही ! ॥ ६५ ॥ भागवताचा श्लोक सांगसीं । आणि त्याच्या विरुद्ध वागसी । कथेकऱ्याची रीत ऐसी । बरवी नव्हे गोविंदा ॥ ६६ ॥ पोटभऱ्या कथेकरी । तूं न व्हावे भूमीवरी । जा कीर्तन समाप्त करी । मी येथून ऐकतों ॥ ६७ ॥ बुवा कीर्तनीं परत आले । गर्जोन अवघ्यां बोलले । तुमच्या शेगांवीं अमोल आलें । रत्न हें त्या सांभाळा ॥ ६८ ॥ हें न शेगांव राहिलें । पंढरपूर खचीत झालें । चालते बोलते येथ आले । साक्षात् हे पांडुरंग ॥ ६९ ॥ यांची तरतूद ठेवावी । सेवा यांची करावी । यांची आज्ञा मानावी । वेदवाक्यापरी हो ॥ ७० ॥ तरीच तुमचें कल्याण । होईल निःसंशय करून । अनायासें हें विधान । जोडलें त्या दवडूं नका ॥ ७१ ॥ कीर्तन अवघें सांग झालें । लोक आपुल्या घरां गेले ।

बंकटलाल घरी आले । चित्तीं हर्ष मावेना ॥ ७२ ॥ आपुल्या सन्माननीय पित्यासी । हकीकत कथिली प्रेमेंसी । बाबा आपुल्या घरासीं । गजानन आणा हो ! ॥ ७३ ॥ पुत्रानें जें कथन केलें । तें भवानीरामें ऐकिलें । आणि प्रेमें ऐसें वदले । तूंच ये त्या घेऊन ॥ ७४ ॥ पित्याची मिळाली संमती । बंकटलाल हर्षे अती । म्हणे कधीं भेटेल गुरुमूर्ती । मजला सदनीं आणावया ॥ ७५ ॥ पुढें माणिक चौकांत । चौथे दिवशीं सद्गुरुनाथ । भेटले बंकटलाला प्रत । अस्तमानाचें समयाला ॥ ७६ ॥ दिनपति अस्ता गेला । इकडे बोधसूर्य उदेला । माणिक चौक प्राचीला । बंकटलालाच्या भाग्यानें ॥ ७७ ॥ गुराखी घेऊन धेनूंस । येऊं लागले ग्रामास । समर्थांच्या आसपास । गाई जमूं लागल्या ॥ ७८ ॥ त्या वाटले नंदसुत । आला येथें साक्षात् । वृक्षावरी करितात । पक्षी किलकिलाट आनंदे ॥ ७९ ॥ दिवाबत्तीची तयारी । दुकानदार करिती खरी । अशा वेळी आला घरीं । घेऊन बंकट, महाराजा ॥ ८० ॥ पित्यानें मूर्ति पाहतां क्षणीं । अति आनंद झाला मनीं । नमन साष्टांग केलें चरणीं । पाटावरीं बैसविलें ॥ ८१ ॥ आणि विनविलें जोडोन हात । कांहीं भोजन करा येथ । तुम्हीं साक्षात् पार्वतीकांत । प्रदोष वेळीं आला या ॥ ८२ ॥ शिव आराधन प्रदोषकालीं । घडेल तो भाग्यशाली । ऐसी आहे ऐकिली । स्कंदपुराणी गोष्ट म्यां ॥ ८३ ॥ ऐसें म्हणोनि आणिलें । बिल्वपत्र तात्काळ भलें । समर्थांच्या ठेविलें । परमभक्तीनें मस्तकीं ॥ ८४ ॥ करा येथें भोजन । ऐसें गेलों बोलून । परी स्वयंपाकाकारण । अवधी आहे कांहींसा ॥ ८५ ॥ स्वयंपाक होईपर्यंत । हे न थांबले जरी येथ । तरी प्रदोषकालीं पार्वतीकांत । गेला उपासी





घरांतूनी ॥ ८६ ॥ त्यास करूं कैसी तोड । ऐसें संकट पडलें जड । जनसमुदाय प्रचंड । जमला मौज पाहावया ॥ ८७ ॥ विचार केला अखेरी । दुपारच्या पुऱ्या आहेत घरीं । त्याच ठेवोन तबकांतरीं । पुढें ठेवूं समर्थांच्या ॥ ८८ ॥ ते अवघेच जाणती । कपट नाहीं माझ्या चित्तीं । भावे भेटतो उमापती । ऐसा आहे सिद्धान्त ॥ ८९ ॥ मी शिळें अवर्जुन । यांस घालीत नाहीं अन्न । शिवाय पक्क्या रसोईकारण । शिळें म्हणणें उचित नसे ॥ ९० ॥ चिंतिल्याप्रमाणें तयारी । तात्काळ त्यानें केली खरी । आणून ठेविलें समोरी । तबक एक समर्थांच्या ॥ ९१ ॥ पुऱ्या बदाम खारका । केळीं मोसंबी मुळे देखा । भाळाप्रती लाविला बुक्का । कंठीं घातला पुष्पहार ॥ ९२ ॥ गुरुमूर्ति प्रसन्न चित्तें । अवघें झाले सेवितें । जें जें पडेल पात्रातें । तें तें खातीं भराभर ॥ ९३ ॥ उदरीं सुमारें तीन शेर । अन्न सांठविलें साचार । तेथेंच राहिलें रात्रभर । श्रीगजानन महाराज ॥ ९४ ॥ बंकटलालें दुसरें दिवशी । मंगल-स्नान समर्थांसी । घातलें असे अतिहर्षी । तो न थाट वर्णवे ॥ ९५ ॥ घागरी सुमारे शंभर । उष्णोदकाच्या साचार । पाणी घालती नारीनर । मन मानेल ऐशा रीतीं ॥ ९६ ॥ कुणी शिकेकाई लाविती । कुणी साबण घेऊन हातीं । समर्थांतें घासीती । पदकमळ आवडीनें ॥ ९७ ॥ कोणी दवना कोणी हीना । कोणी चमेली तेल जाणा । कोणी बेलियाच्या मर्दना । करूं लागले निजहस्तें ॥ ९८ ॥ अंगराग नानापरी । त्यांचें वर्णन कोण करी । बंकटलालाचिया घरीं । उणे नव्हतें कशाचें तें ॥ ९९ ॥ स्नानविधि संपला । पितांबर तो नेसविला । अति सन्मानें बैसविला । योगीराज गादीवरी ॥ १०० ॥ भालीं गंध केशरी । गळ्यांत हार नानापरी । कोणी तुळशीमंजरी ।

वाहूं लागले शिरावर ॥ १ ॥ नैवेद्य नानापरींचे । झाले समर्थार्पण साचे । भाग्य त्या बंकट-लालाचें । खचित आलें उदयाला ॥ २ ॥ तें बंकटलालाचे घर । झालें द्वारका साचार । तया दिनीं सोमवार । वार शिवाचा होता हो ॥ ३ ॥ अवघ्या मंडळींनीं आपुले । मनोरथ ते पूर्ण केले । एक मात्र त्यांतून उरले । इच्छाराम शेटजी ॥ ४ ॥ हा चुलत बंधु बंकटाचा । होता भाविक मनाचा । भक्त असे शंकराचा । त्यासी ऐसें वाटले ॥ ५ ॥ आज आहे सोमवार । मसी उपास साचार । घरां प्रत्यक्ष शंकर । चालते बोलते आलेच कीं ॥ ६ ॥ त्यांची पूजा अस्तमानीं । यथासांग करोनि । करूं पारणा ऐसी मनीं । इच्छा त्यानें धरली असे ॥ ७ ॥ तों झाला अस्तमान । मावळलासे नारायण । इच्छारामें केलें स्नान । प्रदोष वेळा लक्षुनी ॥ ८ ॥ पूजासाहित्य घेऊन । साधु जे कां गजानन । त्यांचें केलें पूजन । परम प्रेमें करोनि ॥ ९ ॥ आणि विनंती केली वरी । झालें आहे दुपारीं । आपुलें तें भोजन जरी । परी आतां कांहीं खावें ॥ ११० ॥ आपण जेवल्यावांचून । मी नाही घेणार अन्न । आहे मजला उपोषण । सोमवारचें गुरुराया ! ॥ ११ ॥ अवघ्या भक्तांचा हेत पुरला । माझा मात्र राहिला । तो पाहिजे पुरविला । तुम्ही कृपा करून ॥ १२ ॥ जन कुतूहल दृष्टींनीं । पाहूं लागले तया स्थानीं । इच्छाराम तो घेवोनी । नैवेद्य आला परातींत ॥ १३ ॥ आंबेमोहर तांदळाचा । दोन मुदी भात साचा । नानाविध पक्वान्नांचा । थाट केला तयानें ॥ १४ ॥ जिलबी रायवदास मोतींचूर । करंज्या अनारसे घीवर । शाखांचे नाना प्रकार । वर्णन करावे कोठवरी ? ॥ १५ ॥ अगणित चटण्या



कोशिंबिरी । वाडगा दह्याचा शेजारीं । तुपाची ती वाटी खरी । ओदनाच्या सव्य भागा ॥ १६ ॥ चार मनुष्यांचें अन्न । ऐसा नैवेद्य परिपूर्ण । समर्थांपुढें आणून । ठेवला इच्छारामानें ॥ १७ ॥ पाहोन त्या नैवेद्यासी । महाराज बोलले आपणासी । खातो खातो अहर्निशीं । ऐसें बोलसी गणप्या ॥ १८ ॥ खा हें आतां अवघें अन्न । अघोऱ्या न करी अवमान । पाहों आलें अवघे जन । तुझ्या अघोर वृत्तीला ॥ १९ ॥ महाराज भोजना बैसले । अन्न अवघें पार केलें । पात्रीं न कांहीं ठेविलें । मीठ लिंबू तेंही पाहा ॥ १२० ॥ आग्रहाचा प्रकार । काय होतो अखेर । हें दावण्या साचार । कौतुक केलें गुरुवरें ॥ २१ ॥ म्हणूनून उलटी झाली । खाल्ल्या अन्नाची ती भली । ऐसीच गोष्ट होती केली । श्रीरामदासें एकदां ॥२२॥ खिरीची झाली वासना । रामदासाचीया मना । तिची खोड मोडण्या जाणा । आकंठ खीर प्याले कीं ॥ २३ ॥ उलटी होतां परत । ती भक्षूं लागले सद्गुरुनाथ । श्रीरामदासस्वामी समर्थ । वासनेसी जिंकावया ॥ २४ ॥ तैसें लोकाग्रहाला । घालावयासी शीघ्र आळा । हा उलटीचा प्रकार केला । अंगीं बळ असूनिया ॥ २५ ॥ सत्पुरुषाचें आचरण । पुढील पिढीला साधन । होतें कराया संरक्षण । निसर्गाच्या धर्माचें ॥ २६ ॥ तेंच समर्थें येथें केलें । लोकांलागीं सुचविलें । आग्रह करणें न चांगलें । तो विपरीत फळ देई ॥ २७ ॥ असो उलटी झाल्यावरी । जागा केली साफ सारी । नेवोन बैसविले पहिल्या परी । स्नान घालोन महाराजा ॥ २८ ॥ नरनारी दर्शनें घेती । महाराजांची आनंदवृत्ती । तो भजन करण्याप्रती । दिंड्या आल्या दोन तेथे ॥ २९ ॥ आवाज ज्यांचे सुस्वर । खडे पहाडी

मनोहर । विठ्ठलाचा नामगजर । करूं लागले आवडीनें ॥ १३० ॥ इकडे महाराज आसनीं । होते ते वद्ले वदनीं । भजनाचिया मिषांनीं । "गणगण गणांत बोते" ॥ ३१ ॥ हेंच सर्वदा त्यांचें भजन । करिती टिचक्या वाजवून । ऐसा झाला आनंद जाण । रात्रभरीं ते ठार्यां ॥ ३२ ॥ 'गण गण' हें त्यांचें भजन । हमेशा चाले म्हणून । लोकांनीं दिलें अभिधान । गजानन हें तयाला ॥ ३३ ॥ जो स्वयंमेव ब्रह्म झाला । नांवरूप कोठून त्याला ? । नामरूपाचा गलबला । प्रकृतीच्या आश्रयास ॥ ३४ ॥ आस्ति–भाति–प्रिया ठार्यीं । योगेश्वर निमग्न राही । त्या आनंदा न वर्णवे कांहीं । त्याची उपमा त्यालाच असे ॥ ३५ ॥ आषाढीसी पंढरपूर । वा सिंहस्थी गोदातीर । वा कुंभ-मेळ्यासीं साचार । गर्दी होते हरिद्वारीं ॥ ३६ ॥ त्यापरी शेगांवांत । बंकटलालाच्या घरांत । लांबलांबून असंख्यात । जन येती दर्शना ॥ ३७ ॥ स्वामी समर्थ गजानन । हेच विठ्ठल नारायण । निश्चिय विटेस ठेवून । पाय उभे राहिले ॥ ३८ ॥ त्यांचें वचन गोदातीर । आनंद हा हरिद्वार । गजबजले शेगांव नगर । सदन राऊळ बंकटाचें ॥ ३९ ॥ जो ब्रह्मपदा पोंचला । जात कोठून उरली त्याला ? । सूर्याचिया प्रकाशाला । अवघेंच आहे सारखे ॥ १४० ॥ नित्य यात्रा नवी येई । समाराधना होती पाही । त्यांतें वाणितां शेषही । थकून जाईल निःसंशय ॥ ४१ ॥ तेथें माझा पाड कोण । मी कीटकासमान । अवघें वदे गजानन । निमित्त करून माझ्या मुखा ॥ ४२ ॥ समर्थांची दिनचर्या । सांगतों थोडी या ठार्यां । अगाध त्यांचें चरित्र गाया । मज पामरा मतीं नसे ॥ ४३ ॥ कधीं करावें मंगलस्नान ।



कधीं हाळांत जाऊन । कधीं कधीं प्राशन । करावें गढूळ जलाचें ॥ ४४ ॥ त्यांच्या दिनचर्येचा । नियम नव्हता एक साचा । प्रकार वायूच्या गतीचा । न ये ठरवितां कोणासी ॥ ४५ ॥ चिलमी-वरी प्रेम भारी । ती लागे वरच्यावरी । नव्हती आसक्ति तिच्यावरी । तें केवळ कौतुक ॥ ४६ ॥ असो आतां पुढीलाध्याया । भाव ठेवा ऐकावया । आली पर्वणी साधावया । वेळ करूं नका हो ! ॥ ४७ ॥ हें श्रीगजाननचरित्र । आदर्श होवो भाविकांप्रत । हेंच विनंवी जोडोन हात । दासगणू ईशातें ॥ १४८ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

॥ इति द्वितीयोऽध्यायः समाप्तः ॥

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य द्वितीयोऽध्यायः समाप्तः ॥







श्रीगजानन महाराजांच्या तीर्थाने जानराव देशमुख मरणोन्मुख स्थितीतून बरे झाले.

श्रीगणेशाय नमः ॥ जय जय सच्चिदानंदा श्रीहरी । कृपा करावी लौकरी । तुम्ही पदनताच्या वरी । कधीं न कठोर झालात ॥१॥ तूं करुणेचा सागर । तूं दीन जनांचें माहेर । तूं भक्तासी साचार । कल्पतरु वा चिंतामणी ॥ २ ॥ ऐसा तुझा अगाध महिमा । संत गाती राघवा रामा । दासगणूसी पुरुषोत्तमा । पावा वेळ करूं नका ॥ ३ ॥ असो बंकटलाला घरीं । राहाते झाले साक्षात्कारी । दीन-दुबळ्यांचे कैवारी । श्रीगजानन महाराज ॥ ४ ॥ लांबलांबोनि भक्त येती । समर्थांतें वंदिती । मधु तेथें माश्या जमती । न लगे करणें आमंत्रण ॥ ५ ॥ एके दिनीं काय झालें । तें आतां सांगतां पहिलें । महाराज होते बसलेले । निजासनीं आनंदांत ॥ ६ ॥ ती प्रभातीची होती वेळा । प्राची-प्रांत ताम्र झाला । पक्षी किलाकिलाटाला । करूं लागलें वृक्षावर ॥ ७ ॥ कुक्कुटाचे होती स्वन । मंद शीत वाहे पवन । वृद्ध करिती नामस्मरण । शय्येवरी बैसोनिया ॥ ८ ॥ उदयाचलीं नारायण । येऊं पाहे हर्षें करून । तेणें तम पलायन । करूं लागला कंदरीसी ॥ ९ ॥ परम भाविक सुवासिनी । रत सडासंमार्जनीं । वत्स धेनूस पाहोनी । तोडूं लागलीं चन्हाटें ॥ १० ॥ ऐशा त्या रम्य वेळेस । एक साधु शेगांवास । येतां झाला दर्शनास । श्रीगजानन साधूंच्या ॥ ११ ॥ तो भिकार गोसावी । मानमान्यता त्याची राहावी । कोठोनिया सांगा बरवी । श्रीमंतांच्या मंडळींत ? ॥१२॥ भगवी चिंधी डोक्यास । झोळी वाम बगलेस । होती नेसण्यास । फाटकीसी लंगोटी ॥ १३ ॥ मृगाजिनाचा गुंडाळा । पाठीवरी होता भला । ऐसा गोसावी बैसला । कोपऱ्यांत एकीकडे ॥ १४ ॥ दर्शनासी भीड फार । होवो लागली साचार । अशा स्थितींत मिळणार । सवड कशी त्या गोसाव्यास ? ॥१५॥

तो ठायींच बैसोन । करूं लागला चिंतन । म्हणे समर्थांचें चरण । दृष्टि पडणें कठीण मला ॥ १६ ॥
समर्थांचा लौकिक भला । मी काशींत ऐकला । आवडीनें नवस केला । भांग स्वामींस अर्पिण्याचा
॥ १७ ॥ तो मम हेतु मनांत । जिरून जाया पाहे येथ । या श्रीमान मंडळींत । माझ्या नवसास
कोण पुसे ? ॥ १८ ॥ गांजाचे नांव काढितां । लोक मजला देतील लाथा । मी तो आलों फेडण्या-
करितां । नवस गांजाचा शेगांवी ॥ १९ ॥ माझ्या नवसाची ती मात । सांगूं तरी कवणाप्रत ? ।
येथें एकही ना दिसत । प्रेमी या शांभवीचा ॥ २० ॥ जी वस्तु ज्या आवडे खरी । तिचाच तो
नवस करी । आणि मानी सर्वतोपरी । हीच वस्तु उत्तम ॥ २१ ॥ ऐसे नाना विचार । गोसावी
करी साचार । झाला होता परम आतुर । दर्शन घ्याया समर्थांचें ॥ २२ ॥ तें त्याचें मनोगत ।
जाणते झालें समर्थ । बोलतें झालें इतरांप्रत । आणा काशीचा गोसावी ॥ २३ ॥ तो पहा त्या
कोपऱ्याला । आहे बिचारा दडून बसला । हे ऐकता आनंद झाला । गोसाव्यास परमावधी
॥ २४ ॥ आणि बोलला मनांत । त्रिकालज्ञ हे खरेच संत । मी जें बोललों मनांत । तें सर्व यांनीं
जाणलें ॥ २५ ॥ ज्ञानेश्वरींत षष्ठाध्यायीं । जी गोष्ट कथिली पाही । कीं स्वर्गलोकीच्या कथा
त्याही । समजतात योगीवरा ॥ २६ ॥ त्याचें आलें प्रत्यंतर । मला येथें साचार । धन्य धन्य हा
साधुवर । त्रिकालज्ञ महात्मा ॥ २७ ॥ न बोलता माझा नवस । जाणतील हें पुण्य पुरुष । त्याचें
प्रत्यंतर यावयास । अवधी उरला थोडका ॥ २८ ॥ मंडळींनीं गोसाव्याला । पुढें आणोन उभा
केला । तो महाराज वदले तयाला । काढ झोळीची पोटळी ॥ २९ ॥ जी तीन महिनेपर्यंत । रक्षण



केलीस झोळींत । त्या पोटळीचें आज येथ । होवो दे गा पारणें ॥ ३० ॥ गोसावी पदीं लागला ।
गहिंवर त्यासी दाटला । गडाबडा लोळूं लागला । बालकापरी स्वामींपुढें ॥ ३१ ॥ महाराज
म्हणती गोसाव्यास । पुरे आतां उठोन बैस । पोटळीच्या बुटीस । काढ बाहेर झोळीच्या ॥ ३२ ॥
नवस केला ते वेळीं । नाहीं लाज वाटली । आणि आतां कां ही लाविली । चाळवाचाळवी निरर्थक
॥ ३३ ॥ गोसावी होता महा धूर्त । तो बोलला भीत भीत । जोडोनिया दोन्हीं हात । ऐसें नम्र
वाणीनें ॥ ३४ ॥ मी बुटी काढितों । नवस आपुला फेडितों । परि मागणें मागतो । एक तें द्या
दीनाला ॥ ३५ ॥ आठवण माझ्या बुटीची । नित्य राहावी आपणा साची । हीच इच्छा
मानसींची । आहे ती पूर्ण करा ॥ ३६ ॥ तुम्हां बुटीचें प्रयोजन । नाहीं हें मी जाणतो पूर्ण । परी
बालकाची आठवण । रहावया बुटी स्वीकारा ॥ ३७ ॥ भक्त जी जी इच्छा करीत । ती ती ज्ञाता
पुरवीत । अंजनीचा वृत्तान्त । आणा मनीं आपल्या ॥ ३८ ॥ अंजनी होती वानरी । तिनें प्रार्थिला
त्रिपुरारी । कीं तुम्हीं यावें माझ्या उदरीं । वानर होऊन शंकरा ! ॥ ३९ ॥ तें हराने मानिलें । महारुद्र
पोटीं आले । अंजनीचे पुरविले । मनोरथ चंद्रमौळींनीं ॥ ४० ॥ तेथें शंकराकारण । आड ना आलें
वानरपण । तेवी माझ्या बुटीची आठवण । राहाया तीतें स्वीकारा ॥ ४१ ॥ त्यांतून तुम्ही कर्पूरगौर ।
साक्षात आम्हां शंकर । म्हणून बुटीचा अव्हेर । करू नको दयाळा ! ॥ ४२ ॥ ज्ञानवल्ली शंकरानें । म्हटलें
आहे इजकारणें । ही इतरा आणील उणे । परि भूषण तुम्हांला ॥ ४३ ॥ महाराज किंचित् घोटाळले ।
परि अखेर होय म्हणाले । माय पुरवी बालक-लळे । वेडेवांकुडे असले जरी ॥ ४४ ॥ गोसाव्याने बुटी

काढिली । हातावरी घेवोन घुतली । चिलमींत घालून पाजिली । पुण्यपुरुष गजानना ॥ ४५ ॥ ऐसा बुटीचा वृत्तान्त । कथिलासे कारणासहित । तो आणून ध्यानांत । विचार करणें प्रत्येकीं ॥ ४६ ॥ कांहीं दिवस राहोन । गेला गोसावी निघोन । आपणा धन्य मानोन । रामेश्वराकारणें ॥ ४७ ॥ ऐसी गांजाची पडली प्रथा । ते ठायीं तत्त्वतां । परी व्यसनाधीनता । नच आली समर्थांतें ॥ ४८ ॥ पद्मपत्राचिये परी । ते अलिप्त होते निर्धारीं । नये कोणास त्यांची सरी । खरेंच अती थोर ते ॥ ४९ ॥ वेदऋचा अस्खलित । उदात्त-अनुदात्त स्वरांसहित । कधीं म्हणाव्या मुखीं सत्य । कधीं त्यांचें नांव नसे ॥ ५० ॥ वेदाक्षरें पडतां श्रवणीं । साशंक व्हावें वैदिकांनीं । याच एका अनुमानीं । गजानन होते ब्राह्मण ॥ ५१ ॥ कधीं गवयासमान । अन्य अन्य रागांतून । एकाच पदातें गाऊन । दाखवावें निजलीलें ॥ ५२ ॥ चंदन चावल बेलकी पतीया । प्रेम भारी या पदा ठाया । ते आनंदांत येवोनिया । वरच्यावरी म्हणावें ॥ ५३ ॥ कधीं गणगणाचें भजन । कधीं धरावें नुसतें मौन । कधीं राहावें पडून । शय्येवरी निचेष्टित ॥ ५४ ॥ कधीं वागावें पिशापरी । कधीं भटकावें कांतारीं । कधीं शिरावें जाऊन घरीं । एखाद्याच्या अवचीत ॥ ५५ ॥ असो त्या शेगांवांत । जानराव देशमुख विख्यात । होता त्याचा प्राणान्त । व्हावयाचा समय आला ॥ ५६ ॥ व्याधी शरीरीं बळावली । शक्ति पार निघून गेली । प्रयत्नांची कमाल केली । वैद्यांनीं ती आपुल्या ॥ ५७ ॥ नाडी पाहोन अखेर । आप्ता कळविला समाचार । प्रसंग आहे कठीण फार । नसे आशा वांचण्याची ॥ ५८ ॥ आम्ही प्रयत्न केले अती । परी यश ना आले तिळरती । यांना आतां घोंगड्यावरती ।



काढोन ठेवा हेंच बरें ॥ ५९ ॥ तें ऐकता अवघे आप्त । दुःख करिती अत्यंत । जानरावा आम्हांप्रत । सोडून तूं जाऊं नको ॥ ६० ॥ तुझ्याप्रीत्यर्थ नवस केले । नाना दैवतालागीं भले । परी न कोणी पावले । हाय हाय रे दुर्दैवा ॥ ६१ ॥ वैद्यानें टेकिले हात । प्रयत्न झाले कुंठित । आतां अखेरच्या यत्नाप्रत । करोन पाहूं एक वेळां ॥ ६२ ॥ बंकटलालाचिये घरीं । आहेत एक साक्षात्कारी । त्यांच्या योगें शेगांव नगरी । झाली प्रती पंढरपूर ॥ ६३ ॥ साधूने आणिल्या मनांत । काय एक नाहीं होत । सच्चिदानंदबाबाप्रत । ज्ञानेश्वरांनी उठविलें ॥ ६४ ॥ त्याचें पाहूं प्रत्यंतर । जा जा कोणी जोडा कर । नका करूं रे उगा उशीर । वेळ अंतसमयाची ॥ ६५ ॥ तें ऐकोन एक आप्त । आला बंकटसदनाप्रत । जानरावाची हकीकत । बंकटलाला कथन केली ॥ ६६ ॥ जानराव देशमुखाचा । समय अंतकाळाचा । आला आहे जवळी साचा । म्हणून आलों तुम्हांकडे ॥ ६७ ॥ महाराजांचें चरणतीर्थ । द्या कृपा करोनी मजप्रत । तें तीर्थ नोहे अमृत । होईल वाटे जानरावा ॥ ६८ ॥ बंकटलाल म्हणे त्यावरी । ही गोष्ट न माझ्या करीं । तुम्ही करावी अत्यादरीं । विनवणी आमुच्या वडिलाला ॥ ६९ ॥ जैसें त्यानें सुचविलें । तैसें आप्तें तात्काळ केलें । भवनीरामा विनविलें । द्याया तीर्थ समर्थाचें ॥ ७० ॥ भवानीराम सज्जन । होता मनाचा दयाळु पूर्ण । दुसऱ्याचें दुःख ऐकून । सज्जन तेच विव्हळ होती ॥ ७१ ॥ प्याल्यामध्यें भरून पाणी । समर्थांच्या लाविलें चरणीं । आणि केली विनवणी । तीर्थ देतो जानरावा ॥ ७२ ॥ समर्थें तुकाविली मान । तीर्थ पाजिलें नेऊन । जानरावाकारण । घरघर घशाची बंद झाली ॥ ७३ ॥ हात हालवूं

लागला । किंचित् डोळा उघडिला । उतार पडूं लागला । तीर्थप्रभावें देशमुखासी ॥ ७४ ॥ तो पाहतां प्रकार । आनंदले नारीनर । सत्पुरुषाचा अधिकार । आला कळून सर्वांसी ॥ ७५ ॥ औषधी बंद केली । तीर्थी भिस्त ठेविली । ज्या--योगें लाभती झाली । आरोग्यता जानरावा ॥ ७६ ॥ आठ दिवसांमाझारीं । जानराव झाला पहिल्यापरी । भवानीरामाचिये घरीं । आला दर्शना समर्थांच्या ॥ ७७ ॥ पहा संतांचें चरणतीर्थ । साधनांत झाले अमृत । संत न ते साक्षात् देव कलीयुगीचें ॥ ७८ ॥ येथें एक ऐसी शंका । उत्थान पावे सहज देखा । श्रीगजाननासारिखा । संत होता शेगांवीं ॥ ७९ ॥ मग तो तेथें असतांना । गेलें न पाहिजे कोणी जाणा । यमाजी पंताचिया सदना । परि हाच आहे कूतर्क ॥ ८० ॥ संत मृत्यू ना टाळिती । निसर्गाप्रमाणें वागती । परि संकटातें वारिती । अगांतुक असल्यास ते ॥ ८१ ॥ सच्चिदानंद-बाबासी । ज्ञानेशें उठविलें नेवाशासी । परि ते अखेर आळंदीसी । देह ठेविते झाले हो ॥ ८२ ॥ याचें रहस्य इतुकेंचि आहे । हें गडांतर टाळिती पाहे । तें टाळणें कांहींच नोहे । अशक्य संत पुरुषाला ॥ ८३ ॥ मृत्यूचें तीन प्रकार । आहेत जगीं साचार । त्यांची नांवें क्रमवार । देतो तुम्हा कारणें ॥ ८४ ॥ आध्यात्मिक, आधिभौतिक । आणि तिसरा तो आधिदैविक । त्या तिघांमाजी बलिष्ठ देख । आध्यात्मिक मृत्यु असे ॥ ८५ ॥ आधिभौतिकाची तयारी । कुपथ्यानें होते खरी । नाना प्रकारच्या शरीरीं । व्याधि निर्माण होतात ॥ ८६ ॥ त्यांचा जोर झाल्यावर । मृत्यु येतो अखेर । त्या मृत्यूचा परिहार । करितां येतो औषधींनें ॥ ८७ ॥ मात्र औषधी देणारा । शास्त्रज्ञ असला





पाहिजे पुरा । औषधीचा पसारा । आहे अवगत जयासी ॥ ८८ ॥ ऐसा वैद्य भेटल्यास । आधिभौतिकाचा होय नाश । तैसे आधिदैविकास । नवस सायास घालविती ॥ ८९ ॥ हें गंडांतर रूपाचें । मृत्यु दोन प्रकारचे । भौतिक आणि दैविक साचे । हे आहेत रूयात जगीं ॥ ९० ॥ मृत्यु जो कां आध्यात्मिक । तो कवणाच्यानें न टळे देख । पाहा अर्जुनाचा बालक । कृष्णासमक्ष पडला रणीं ॥ ९१ ॥ तैसा जानरावाचा । मृत्यु गंडांतर स्वरूपाचा । होता तो टाळिला साचा । समर्थतीर्थ देवोनिया ॥ ९२ ॥ म्हणजे गंडांतरा कारण । निवारिती साधुचरण । तेंच आलें घडोन । शेगांवामाझारीं ॥ ९३ ॥ कांहीं मृत्यु नवसांनीं । टाळिता येती या जनीं । तो नवस श्रद्धेनीं । केला पाहिजे विबुध हो ! ॥ ९४ ॥ श्रद्धा पूर्ण असल्यावरी । तोच मृत्यु टाळी खरी । श्रद्धाच अवघ्या माझारीं । सर्व बाजूंनीं श्रेष्ठ असे ॥ ९५ ॥ चरणतीर्थ साधूचें । तेही टाळी मृत्यु साचे । वरील दोन प्रकारचे । परी तो साधु पाहिजे ॥ ९६ ॥ साधु असल्या वेषधारी । ऐसी न होय गोष्ट खरी । माती न होय कस्तुरी । हें ध्यानी असूं द्या ॥ ९७ ॥ षड्विकार धुतल्याविना । अंगीं साधुत्व येईना । आणि साधूविण होईना । अघटित कृत्य केव्हांही ॥ ९८ ॥ म्हणून बहुरूप्याकारण । जपणे आहे अवश्य जाण । उगीच पाहून पिवळेपण । सोनें पितळेस मानूं नका ॥ ९९ ॥ गजानन नव्हते वेषधारी । ते पूर्ण साक्षात्कारी । म्हणून तीर्थानें झाली बरी । व्याधि जानरावाची ॥ १०० ॥ देशमुख बरा झाल्यावर । भंडारा घातिला थोर । साधुप्रीत्यर्थ साचार । बंकटलालाचिये घरीं ॥ १ ॥ तीर्थें देशमुख बरा झाला । परी स्वामींशीं पेच पडला । त्यांनीं मनासी

विचार केला । तो ऐका येणें रितीं ॥ २ ॥ कडकपणा धरल्याविना । ही उपाधी टळेना । स्वार्थसाधु प्रापंचिकांना । साधुत्वाची चाड नसे ॥ ३ ॥ त्या दिवसापासून । आणूं लागले अवसान । स्वामी महाराज दयाघन । वरपांगी कडक झाले ॥ ४ ॥ हा त्यांचा कडकपणा । असह्य झाला इतरांना । परी त्यांच्या भक्तांना । कांहीं न त्याचे वाटलें ॥ ५ ॥ जेवीं नरसिंह अवतार । इतरांसी वाटला क्रूर । परी कयाधूचा कुमार । मुळीं न भ्याला त्या रूपा ॥ ६ ॥ वाघीण इतरा भयंकर । परी तिचें जें का असेल पोर । तें तिच्याच अंगावर । निर्भयपणें क्रीडा करी ॥ ७ ॥ असो आतां गोष्ट दुसरी । सांगतों मी तुम्हां खरी । कस्तुरीच्या शेजारी । बसल्या माती मोल पावे ॥ ८ ॥ चंदनाचा शेजार । असला थोडा बहुत हिवर । वासित होतो साचार । हा न्याय निसर्गाचा ॥ ९ ॥ वासित हिवर झालेला । चंदन मानील आपणाला । तरी त्याच्या फजितीला । पारावर न राही पुढे ॥ ११० ॥ जेथें ऊंस निपजतो । तेथेंच निवडुंग उगवतो । जेथें मोगरा वाढतो । तेथेंच येतो पिंगूळ ॥ ११ ॥ जेथें साधु सज्जन । तेथेंच मैंद निर्माण । हिरे गारा एकवटून । खाणीमाजी राहाती ॥ १२ ॥ स्थान एक म्हणून । किंमत नाहीं समान । तेज हिऱ्याचे हिऱ्यालागून । भूषवी न गारेला ॥ १३ ॥ गार ती गारच राही । पायाखाली तुडविली जाई । ऐसी स्थितीं कधीं न येई । अमोलिक हिऱ्याला ॥ १४ ॥ श्रीगजाननाचें सान्निध । ऐसाच होता एक मैंद । संतसेवा हाच मद । अंगीं ज्याच्या भरला असे ॥ १५ ॥ तो सेवा करी वरी वरी । भाव निराळा अंतरीं । मिठाई पेढे सावरी । समर्थांच्या नांवावरी ॥ १६ ॥ भक्तगणांस ऐसे म्हणे ।

॥ १६ ॥

मी समर्थकृपेचें पोसणें । प्रत्येक काम माझ्याविणें । होत नाहीं ये ठायां ॥ १७ ॥ मी कल्याण समर्थांचा । अत्यंत आहे आवडीचा । कधीं न खाली जावयाचा । शब्द माझा त्यांच्यापुढें ॥ १८ ॥ चिलीम त्यांची मीच भरी । खाण्यापिण्याची तयारी । निजांगें मीच करी । अत्यंत मी आवडीचा ॥ १९ ॥ ऐसें लोकांस सांगतसे । आपला सवरात करीतसे । त्या अधमाचें नांव असे । माळी विठोबा घाटोळ ॥ १२० ॥ महाराज स्वयंमेव शंकर । हा नंदिकेश्वर । हमेशा करी गुरगुर । आल्या गेल्या भक्तांवरी ॥ २१ ॥ ते अंतर्ज्ञानांनीं । जाणिले सर्व समर्थांनी । कौतुक केलें एके दिनीं । तें ऐका बिबुध हो ॥ २२ ॥ परस्थ कांहीं मंडळी । शेगांवीं दर्शना आली । तों मूर्ति होती निजलेली । समर्थांची शय्येवर ॥ २३ ॥ हिय्या कुणाचा होईना । जागे करण्या समर्थांना । मंडळीस होती जाणा । त्वरा पुढें जाण्याची ॥ २४ ॥ ते कुजबुज करूं लागले । विठोबाला विनवते झाले । विठोबा आम्हां पाहिजे गेलें । येथून आतांच परगांवा ॥ २५ ॥ काम निकडीचें आहे फार । कैसा करावा विचार । महाराज तों शय्येवर । असती निद्रिस्त जाहले ॥ २६ ॥ त्यांचे दर्शन घेतल्याविना । आमचा पाय निघेना । हें अवघड काम होईना । तुझ्यावांचून ये ठायीं ॥ २७ ॥ तूं समर्थांच्या शिष्यांत । मुख्य धोरणी महाधूर्त । तुला आम्ही जोडितों हात । एवढें काम करावें ॥ २८ ॥ ऐशा त्या स्तुतींनीं । विठोबा फुगून गेला मनीं । त्यानें जाऊन तत्क्षणीं । महाराजांसी उठविलें ॥ २९ ॥ मंडळीचें काम झालें । परी संकट ओढवलें । घाटोळ विठोबावरी भले । कर्म जैसें तैसें फल ॥ १३० ॥ समर्थांच्या हातीं काठी । एक होती मली मोठी । तीच त्यांनी घातली पाठीं ।

त्या विठोबा माळ्याच्या ॥३१॥ म्हणती बेटा माजून गेला । आपुली स्थिती विसरला । या लुच्च्याने आरंभीला । उत्तड उघड व्यापार कीं ॥ ३२ ॥ मला लावितो उपाधी । घंटे आणून बांधितो मठीं । घुमारे घाली कधीं कधीं । ऐसा अती नीच हा ॥ ३३ ॥ त्या घुमाऱ्याचें बक्षीस । घे मी देतों तुला खास । तुजवरी केल्या कृपेस । होईन प्रभुचा अपराधी ॥ ३४ ॥ सोमला साखर मानूं नये । विषा जवळ करूं नये । तस्करांसी लेखूं नये । निज कंठींचा ताईत ॥ ३५ ॥ ऐशा रीतीं ठोकला । छड्या खालीं घाटोळाला । विठोबा तो पळाला । पुनः न आला मागुती ॥ ३६ ॥ खरे जे का असती संत । ते ते ऐसेंच करितात । ढोंगी मात्र जातात । अज्ञाचिया करांमध्यें ॥ ३७ ॥ म्हणजे अधिकारावांचून । ढोंगी बैसती होऊन । संत, नादीं लावण्या जन । ऐसे प्रकार किती तरी ॥ ३८ ॥ मतलबी त्यांना साथ देती । उदोउदो त्यांचा करिती । मलभलते सांगताती । साक्षात्कार ढोंग्यांचे ॥ ३९ ॥ तेणें दोघांचें काम होई । अपार पैसा मिळविला जाई । परी ही प्रथा बरी नाही । समाज जाईल रसातळा ॥ १४० ॥ खरे जे कां असती संत । ईश्वराचे निःसीम भक्त । त्यांना न मुळी आवडत । सान्निध्य त्या धंढाचें ॥ ४१ ॥ पतिव्रतेसी शेजार । कसबिणीचा कां पटणार ? । सोन्याप्रती अलंकार । काय शोभती कथलाचे ? ॥ ४२ ॥ संत शठातें राखिती । परी न त्याला महत्त्व देती । ती जगांतील एक व्यक्ति । कृतकर्म भोगण्या आली असे ॥ ४३ ॥ ऐसे मानसीं समजून । त्याविषयीं धारिती मौन । जेवी निवडुंगालागून । स्थान भूमी देते हो ॥ ४४ ॥ मोगरा, निवडुंग आणि शेर । हीं जमिनीचीं लेकरं । परि किंमतीचा प्रकार । निरनिराळा तो तिघांचा ॥ ४५ ॥ मोगऱ्याचें संरक्षण ।



करिती निवडुंगाचें दहन । चिलटांसाठीं बांधून । शेर ठेविती दारावरी ॥ ४६ ॥ तेवीं संत भूमिवरी । रक्षण अवघ्यांचें करिती जरी । किंमतीमाजीं ठेविती परी । गुणांप्रमाणें भेद पहा ॥ ४७ ॥ नशीब विठोबा घाटोळाचें । अति खडतर होतें साचें । पाय लाभून साधूचें । दैवें दूर झालें कीं ॥ ४८ ॥ जरी तो ना ढोंग करितां । तरी योग्यतेप्रती चढता । संतांची ती योग्यता । त्यानें मुळीं ना जाणिली ॥ ४९ ॥ कल्पवृक्षाच्या तळवटीं । बसून इच्छिली गारगोटी । वा मागितली करवंटी । कामधेनूपासून ॥ १५० ॥ ऐसें न कोणी करावें । संतापासीं राहून बरवें । तेथें विचारा ठेवावें । अहर्निशी जागृत ॥ ५१ ॥ हा दासगणूविरचित । श्रीगजाननविजय ग्रंथ । तारक होवो भवाब्धींत । अवघ्य भाविकांकारणें ॥ १५२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

॥ इति तृतीयोऽध्याय समाप्तः ॥

* * *

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य तृतीयोऽध्यायः समाप्तः ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय ४.



श्रीगजानन महाराजांच्या चिलमीजवळ बंकटलालने काडी धरतांच चिलीम पेटली

श्रीगणेशाय नमः । हे सर्वसाक्षी सर्वेश्वरा । निलकंठा गंगाधरा । महाकाल त्र्यंबकेश्वरा । श्रीओंकारा पाव मशीं ॥ १ ॥ तूं आणि रुक्मिणीस । एक तत्त्व आहां खास । तोय वारी म्हटल्यास । काय जलीं भेद होतो ॥ २ ॥ तैसी तुमची आहे स्थिती । तंतोतंत जगत्पाति । जैसी ज्याची मानेल मति । तैसा तो तुज बाहत ॥ ३ ॥ अनन्यभावें बाहतां । तूं पावसी आपुल्या भक्तां । माता न धरी निष्ठुरता । आपल्या वत्साविषयीं कधीं ॥ ४ ॥ मी तुझें अजाण लेंकरूं । नको माया पातळ करूं । तूं साक्षात् कल्पतरू । इच्छा पूर्ण करी हरा ॥ ५ ॥ बंकटलालाचें घरात । असतां स्वामी समर्थ । प्रकार एक अघटीत । आला ऐसा घडोनी ॥ ६ ॥ वैशाख शुद्ध पक्षासी । अक्षयतृतीयेचिया दिवशीं । पितरार्थ उदककुंभासी । देती श्राद्ध करोनिया ॥ ७ ॥ अक्षयतृतीयेचा दिवस । वऱ्हाडांतील लोकांस । विशेष वाटे प्रत्येकास । मोठा सण मानिती हा ॥ ८ ॥ त्या दिवशीं काय झालें । तें पाहिजे श्रवण केलें । महाराज पोरांत बैसलें । कौतुक लीला करावया ॥ ९ ॥ बालकां म्हणती गजानन । चिलीम द्यावी भरून । तंबाखूची मजकारण । विस्तव वरी ठेवोनिया ॥ १० ॥ सकाळपून ऐसाच बसलों । चिलीम मुळीं नाहीं प्यालो । त्यामुळें हैराण झालों । भरा चिलीम मुलांनों ! ॥ ११ ॥ ऐसी आज्ञा ऐकतां भली । पोरे अवघी आनंदली । चिलीम भरूं लागली । तंबाखू आंत घालुनिया ॥ १२ ॥ विस्तवाचा तपास केला । तो न सदनीं मिळाला । कां कीं चूल पेटण्याला । आवकाश होता विबुध हो ॥ १३ ॥ पोरें चित्तीं विचार करिती । आपापसांत निश्चिती । कशी करावी यासी युक्ति । विस्तव पाहिजे चिलमीला ॥ १४ ॥ मुले पाहून चिंतातुर । बंकट

करी मधुरोत्तर । अरे जानकीराम सोनार । आहे वेटोळीं* आपुल्या ॥ १५ ॥ त्याच्याकडे तुम्ही
जावें । विस्तवासी मागून घ्यावें । दुकान तें चालण्या बरवें । विस्तव लागतो आधीं त्या ॥ १६ ॥
आधीं पेटतें बागेसरी । त्याच्यापुढें दुकानदारी । सोनाराची रीत खरी । आहे ठावें की
तुम्हांला ॥ १७ ॥ पोरांनीं तें ऐकलें । जानकीरामाकडे आले । विस्तव मागूं लागले । समर्थाच्या
चिलमीस ॥ १८ ॥ जानकीराम रागावला । लेंकरांसी बोलतां झाला । अक्षयतृतीयेच्या सणाला ।
दे न कोणा विस्तव मी ॥ १९ ॥ पोरे म्हणाली त्यावर । जोडोनी आपले दोन्ही कर । नको करूं
हा अविचार । विस्तव पाहिजे समर्थाला ॥ २० ॥ महाराज श्रीगजानन । देवाचेही देव जाण ।
त्यांच्या चिलमीकारण । विस्तव हा जातसे ॥ २१ ॥ साधुप्रती कांहीं देतां । तेथें अशुभाची नसे
वार्ता । उगींच व्यावहारिक कथा । सांगत आम्हां बसूं नको ॥ २२ ॥ आम्ही आहों मुलें लहान ।
तूं मोठा आमच्याहून । ऐसें साच असून । हें न कैसें कळे तुला ? ॥ २३ ॥ विस्तव तूं देशील जरी ।
भाग्य येईल तुझ्या घरीं । चिलीम पिऊन तृप्त जरी । झालें गजानन महाराज ॥ २४ ॥ तें सोनारें
न ऐकिलें । अद्वातद्वा भाषण केलें । ज्याचें जवळ मरण आलें । त्याचें पाय खोलाकडे ॥ २५ ॥
सोनार म्हणे बालकांसी । गजानन कशाचा पुण्यराशी ? । त्या चिलमीबहाद्दरासी । साधु म्हणून
सांगूं नका ॥ २६ ॥ गांजा तंमाखू पीत बसतो । नग्न गांवांत हिंडतो । वेड्यापरी चाळे करितो ।
पितो पाणी गटाराचें ॥ २७ ॥ जात गोत नाहीं त्याला । ऐशा वेड्यापिशाला । मी साधु
मानण्याला । नाहीं मुळीं तयार ॥ २८ ॥ बंकटलाल खुळावला । नादीं त्याच्या लागला । नाहीं देत

* गल्लीत



विस्तवाला । मी तयाचे चिलमीसी ॥ २९ ॥ तो आहे ना साक्षात्कारी । मग विस्तव कशाला
पाहिजे तरी ? । आपुल्या कर्तृत्वें कां न करी । विस्तवातें निर्माण ? ॥ ३० ॥ साधु नाथ
जालंदर । पीत होते चिलीम फार । परि विस्तवासाठीं घर घर । ना हिंडले कदा ते ॥ ३१ ॥ जा
जा उभे न राहा येथ । विस्तव ना मिळे तुम्हांप्रत । नाहीं मला किंमत । त्या तुमच्या पिशाची
॥ ३२ ॥ पोरें विन्मुख परत आली । महाराजांसी निवेदिली । हकीकत जी कां झाली । सोनाराचें
दुकानांत ॥ ३३ ॥ ती ऐकतां हास्यवदन । करिते झाले दयाघन । नाहीं आपणां प्रयोजन ।
मुळींच त्याच्या विस्तवाचें ॥ ३४ ॥ ऐसे म्हणोनि घेते झाले । चिलीम आपुल्या हातीं भले ।
बंकटलालासी बोलले । काडी एक वरती धरीं ॥ ३५ ॥ बंकट म्हणे गुरुराया । थोडे थांबा परम
सदया । विस्तव देतो करूनिया । काडी चासून आतां मी ॥ ३६ ॥ काडी घासल्यावाचूनि ।
कदां न प्रगटे अग्नि । म्हणून केली विनवणी । ती मनास आणा समर्था ॥ ३७ ॥ महाराज बोलले
त्यावर । उगी न करी चरचर । नुसती काडी धरणे वर । तिला मुळींच घासूं नको ॥ ३८ ॥ बंकट-
लालें तैसें केलें । नुसत्या एका काडीस धरिले । चिलमीचिया वरती भले । समर्थ-आज्ञा म्हणून
॥ ३९ ॥ तों काय झाला प्रकार । ऐका तुम्ही श्रोते चतुर । प्रगट झाला वैश्वानर । काडी नुसती धरतां
वरी ॥ ४० ॥ काडीप्रती विस्तवाचा । अंशही नव्हता साचा । हा प्रभाव शक्तीचा । महा-
राजांच्या लोकोत्तर ॥ ४१ ॥ काडी तैसीच राहिली । चिलीम तीही पेटली । कशाचींही नाही
उरली । जरूर खऱ्या साधुला ॥ ४२ ॥ याचें नांव साधुत्व । उगीच नव्हतें थोतांड मत । आतां

सोनाराचें घरांत । काय झाले तें ऐका ॥ ४३ ॥ या अक्षयतृतीयेला । मान विशेष चिंचवण्याला । जेवीं वर्षप्रतिपदेला । महत्त्व निंब फुलांचें ॥ ४४ ॥ असां भोजना बसली पंगत । चिंचवणें वाढलें द्रोणांत । तों प्रकार ऐसा अघटीत । घडून आला तो ऐका ॥ ४५ ॥ त्या चिंचवण्या-माझारीं । अळ्या दिसल्या नानापरी । बुजबुजाट झाला भारी । किळस वाटे सर्वांला ॥ ४६ ॥ लोक उठले पात्रावरून । अवघ्या अन्नांत टाकून । सोनार बसला अधोवदन । कारण काहीं उमजेना ॥ ४७ ॥ चिंचवण्याच्या संगें भलें । अवघें अन्न वार्‍या गेलें । मग त्या कोडें उमगलें । ऐसें व्हाया मीच कारण ॥ ४८ ॥ मी न साधूसी विस्तव दिला । त्याचा प्रत्यय तात्काळ आला । गजाननाची अगाध लीला । मीं न खचित जाणिली ॥ ४९ ॥ गजानन जान्हवी नीरि । मीं त्या मानिलें थिल्लर । गजानन राजराजेश्वर । मीं त्या भिकारी मानिलें ॥ ५० ॥ त्रिकालज्ञ गजानन । मीं त्या मानिले वेडा पूर्ण । कल्पतरुकारण । मीं बाभुळ मानिलीं ॥ ५१ ॥ गजानन हा चिंतामणी । मी लेखिली गार जाणी । गजानन हा कैवल्यदानी । मी ढोंगी मानिला हो ॥ ५२ ॥ हाय हाय रें दुर्दैवा । त्वा कैसा साधिला दावा । माझ्या हातून संतसेवा । होवो ना तूं दिलीस ॥ ५३ ॥ मसी असो हा धिक्कार । मी भारभूत साचार । जन्म पावलों भूमीवर । द्वय पायांचा पशू मी ॥ ५४ ॥ आज माझ्या भाग्यकाळीं । बुद्धि कशी चळती झाली । सुयोगाची दवडिली । वेळ आलेली म्यां करें ॥ ५५ ॥ कांहीं असो आतां जाऊं । समर्थांचें पाय पाहूं । पदीं त्यांच्या अनन्य होऊं । क्षमा मंतूची मागावया ॥ ५६ ॥ ऐसा विचार करुनी । सवें घेऊन चिंचवणी । बंकटलालाच्या



सदनीं । आला हकीकत सांगावया ॥ ५७ ॥ अहो शेटजी बंकटलाला । आज माझा घात झाला । पाहा या चिंचवण्याला । आंत किडे पडलें बहु ॥ ५८ ॥ माणसें उठलीं उपोषित । तेणें झाला श्राद्धघात । हें ऐसें व्हावया कृत्य । माझा मीच कारण असे ॥ ५९ ॥ आज सकाळीं चिलिमीला । मीं नाहीं विस्तव दिला । पोरें मागत असतां मला । समर्थांच्या चिलिमीस्तव ॥ ६० ॥ त्याचेच हे आहे फळ । चिंचवणी नासलें सकळ । ते ऐकून बंकटलाल । बोलूं लागला येणें रिती ॥ ६१ ॥ तुम्ही न चिंचोके पाहिले । ते असतील किडलेले । म्हणून हे नासते झाले । तुमचें चिंचवणी वाटे मला ॥ ॥ ६२ ॥ सोनार म्हणे ऐसी शंका । शेटजी तुम्ही घेऊं नका । नवी चिंच होती देखा । मग चिंचोके किडके कसे ? ॥६३॥ जी मी चिंच फोडिली । तिचीं टरफलें अजून पडलीं । चिंचोक्यांची रास झाली । मर्जी असल्या पाहा चला ॥ ६४ ॥ आतां इतुकीच विनंती । आहे शेटजी तुम्हांप्रती । मला नेऊन पायांवरती । घाला शीघ्र समर्थांच्या ॥ ६५ ॥ क्षमा मंतूची मागेन । अनन्यभावें करून । साधु दयेचे परिपूर्ण । सागर मूळचेच आहेत कीं ॥ ६६ ॥ समर्थांपुढे भीत भीत । जानकीराम गेला त्वरित । घातलें त्यानें दंडवत । अष्टांगेसी समर्थां ॥ ६७ ॥ आणि म्हणाला दयाघना ! । तुला येवो माझी करुणा । मी अपराध केले नाना । त्यांची क्षमा करावी ॥ ६८ ॥ तूं साक्षात् उमानाथ । नांदसी या शेगांवांत । ज्याची होती मजला भ्रांत । ती त्वां आज *निवटीली ॥ ६९ ॥ माझे अपराधरूपीं अवघें तृण । जाळीं कृपाकृशानें* करून । समर्था आजपासोन । मी ना टवाळी तुझीं करी ॥ ७० ॥ जी शिक्षा आज केली । तेवढीच मजसी पुरे झाली । तूं अनाथांचा आहेस

* विस्तवानें

वाली । आतां अंत पाहूं नको ॥ ७१ ॥ महाराज बोलले त्यावर । खोटें न सांगें तिळभर । तुझें चिंचवणी आहे मधुर । किडे न पडले त्यामध्यें ॥ ७२ ॥ तें ऐकतां अवघ्यांनीं । पाहिलें तें चिंचवणी । पहिला प्रकार मावळोनी । गेला होता तेधवां ॥ ७३ ॥ अवघ्यांप्रती आश्चर्य झालें । समर्थांचें महत्त्व कळलें । हां हां म्हणतां पसरलें । वृत्त हें त्या गांवामध्यें ॥ ७४ ॥ ज्यांच्या त्यांच्या तोंडीं मात । हीच निघूं लागली सत्य । कस्तुरींचा नाहीं येत । वास झांकावया कवणातें ॥ ७५ ॥ चंदुमुकीन नांवाचा । गृहस्थ एक शेगांवाचा । निःसीम भक्त समर्थांचा । त्याची कथा ऐका ही ॥ ७६ ॥ श्रोते ज्येष्ठ मासांत । सभोवार बसले भक्त । अति आदरें जोडोन हात । दृष्टि ठेवून पायांवरी ॥ ७७ ॥ कोणी आंबे कापिती । कोणी फोडी हातात देती । कोणी पंख्यानें घालिती । वारा समर्थांकारणें ॥ ७८ ॥ कोणी वांटिती खडीसाखर । कोणी गळ्यांत घालिती हार । कोणी चंदन थंडगार । लाविती अंगीं साधूंच्या ॥ ७९ ॥ तयीं महाराज म्हणाले चंदूला । हें आंबे नकोत मला । दोन कान्होले उतरंडीला । आहेत तुझ्या ते आण जा ॥ ८० ॥ चंदू बोले कर जोडोन । आतां कान्होले कोठून ? । इच्छा असल्या तळून । ताजे आणितों गुरुराया ॥ ८१ ॥ तई महाराज वदलें वाचें । नाहीं कारण ताज्याचें । पाहिजेत तुझ्या उतरंडीचें । कान्हवले मज खावया ॥ ८२ ॥ जा वेळ करूं नको । उगीच सबबी सांगूं नको । गुरुपाशीं बोलूं नको । खोटें वेड्या यत्किंचित ॥ ८३ ॥ त्या मुकीनचंदूप्रतीं । लोक अवघे बोलती । जा ये पाहून शीघ्रगती । खोटी न होय संतवाणी ॥ ८४ ॥ चंदू घराप्रती गेला । कांतेस पुसूं लागला । दोन कान्हवले उतरंडीला । आहेत



काय रंमोरूं ? ॥ ८५ ॥ तैं बोले अंगना । होऊन गेला एक महिना । आतां कान्हवले आपल्या सदना । मिळतील कशाचे ? ॥ ८६ ॥ अक्षयतृतीया दिवशी भले । कान्हवले मी पतिराया केलें । ते न आतां राहिले । संपून गेले त्याच दिनीं ॥ ८७ ॥ मर्जी असल्या नवे करिते । समर्थांस्तव तळून देते । ही पाहा मी ठेवितें । कढई नाथा चुलीवर ॥८८॥ तुम्ही थांबा क्षणभर । सामान अवघें तयार । नको पाहण्या बाजार । कान्हवल्याच्या साहित्यासी ॥ ८९ ॥ चंदु बोले त्यावरी । ताजे नकोत सुंदरी । जे तूं उतरंडीमाझारी । दोन ठेविले तेच दे ॥ ९० ॥ समर्थांनीं ऐसेंच कथिलें । तेंच मी तुज निवेदिले । आठवण करून चांगले । पहा कांहीं येधवां ॥ ९१ ॥ ऐसें ऐकतां पतिवचन । कांता गेली घोटाळून । करूं लागली शोधन । कान्हवल्याचें चित्तांतरी ॥ ९२ ॥ कान्हवल्याचा शोध करितां । आठवण झाली तत्त्वतां । उघड म्हणे थांबा नाथा । सत्य गिरा समर्थांची ॥ ९३ ॥ दोन कान्हवले होते उरले । ते मी उतरंडीस ठेविले । त्यांचें स्मरण नाहीं उरलें । सगळ्या महिन्यांत मजलागीं ॥ ९४ ॥ त्यास महिना होऊन गेला । असेल बुरसा वरी आला । ते खाण्याच्या उपयोगाला । राहिले नसतील अणुमात्र ॥ ९५ ॥ ऐसें बोलून तात्काळ उठली । उतरंड सर्व धांडोळली । कान्हवले ते ठेवलेली । कळशी होती खापराची ॥ ९६ ॥ आंत जों पाहिलें न्याहाळून । तों दृष्टी पडले तिच्या दोन । कान्हवले जे सुकोन । गेले होते थोडके ॥ ९७ ॥ बुरसा मुळींच नाहीं आला । श्रोते त्या कान्हवल्याला । बट्टा संतवाणीला । नाहीं लागला कधीं जगीं ॥ ९८ ॥ कान्हवल्याते पाहोन । उभयतांचें हर्षलें मन । धन्य साधु गजानन । महा

समर्थ सिद्धयोगी ॥ ९९ ॥ चंदू कान्हवले घेऊन आला । समर्थांसी अर्पिता झाला । लोक करती आश्चर्याला । त्याच्या कृतीतें पाहून ॥ १०० ॥ लोक म्हणती गजानन । खाचित असती त्रिकालज्ञ । भूत भविष्य वर्तमान । यांसी अवघे कळतसे ॥ १ ॥ चंदूच्या त्या कान्हवल्यांसी । सेविते झाले पुण्यराशी । राम शबरीच्या बोरांशी । जेवीं झाला भक्षिता ॥ २ ॥ शेगांवच्या दक्षिणेसी । चिंचोली गांव परियेसी । तेथील एक रहिवासी । माधव नामें विप्र होता ॥ ३ ॥ वय ज्याचे साठावर । अवयव झाले क्षीण फार । तरुणपणी संसार । हेंच होतें ब्रह्म ज्याचें ॥ ४ ॥ प्रारब्धाच्या पुढारी । कोण जातो भूमीवरी ? । ब्रह्मदेवें जीं कां खरीं । लिहिलीं अक्षरें तेंच होय ॥ ५ ॥ माधवासी न कोणी उरले । कांतापुत्र मरून गेले । म्हणून विरक्त जाहले । मन तयाचें संसारी ॥ ६ ॥ जी का होती चीजवस्तु । ती अवधी केली फस्त । म्हणे आतां माझी गत । होईल कैशी देवदेवा ! ॥ ७ ॥ म्यां हमाघुमींचा संसार केला । तो आतां अवघा निमाला । आठविले कधी नाहीं तुला । एक क्षणही दीनबंधो ! ॥ ८ ॥ आतां माझा वाली कोण ? । दीनदयाळा तुजवांचून । माझें हें अरण्यरोदन । तुजाविण देवा कोण ऐके ? ॥ ९ ॥ ऐसा अनुताप धरून पोटीं । शेगांवीं आला शेवटीं । गजाननाच्या द्वारवंटीं । हट्ट धरून बैसला ॥ ११० ॥ आरंभिलें उपोषण । अन्नपाण्यातें त्यागून । वदनीं वदे नारायण । खंड न पडे तयाला ॥ ११ ॥ ऐशापरी एक गेला । दिवस परी नाहीं उठला । तईं महाराज वदले तयाला । हें करणें उचित नसे ॥ १२ ॥ हेंच हरीचें नामस्मरण । कां न केलें मागे जाण । प्राण देहातें



सोडून । जातां वैद्य बोलाविसी ॥ १३ ॥ तरुणपणीं ब्रह्मचारी । म्हातारपणीं करिसी नारी । अरे वेळ गेल्यावरी । नाहीं उपयोग साधनाचा ॥ १४ ॥ जें करणें तें वेळेवर । करावें कीं साचार । घर एकदां पेटल्यावर । कूप खणणें निरर्थक ॥ १५ ॥ ज्या कन्यापुत्रांसाठीं । तूं केली आटाआटी । ते अवघे गेले शेवटीं । टाकोनिया तुजलागीं ॥ १६ ॥ अशाश्वताचें पोषण । केलें शाश्वता विसरून । त्या कर्मांचीं तुजलागून । फळें भोगणें भाग असे ॥ १७ ॥ ती फळें भोगल्याविना । सुटका तुझी होईना । दे हा टाकून हट्टीपणा । विवेक कांहीं करी मनीं ॥ १८ ॥ तें न माधवे ऐकिलें । हट्टासि ना सोडिलें । यत्न लोकांचे वाया गेले । त्यासी भोजन घालण्याचें ॥ १९ ॥ शेगांवचा कुलकर्णी । करूं लागला विनवणी । भोजनास चला सदनीं । अन्नाविण राहूं नका ॥ १२० ॥ तेही म्हणणें माधवाला । नाहीं पटलें तसाच बसला । समर्थांच्या सान्निध्याला । नाम घेत हरीचें ॥ २१ ॥ रात्र झाली दोन प्रहर । तमें आक्रमिलें अंबर । निशीचा तो शब्द किर्र । होऊं लागला वरच्यावरी ॥ २२ ॥ आसपास कोणी नाहीं । ऐसें पाहून केलें कांहीं । कौतुक तें लवलाही । स्वामी गजाननांनीं ॥ २३ ॥ रूप धरिलें भयंकर । दुसरा यमाजी भास्कर । आ पसरून माधवावर । धांवून आलें भक्षावया ॥ २४ ॥ तेणें माधव पळाला । घेऊन आपला जीव भला । धडकी भरली चित्ताला । छाती उडे धडधड ॥ २५ ॥ बुडबुडा आला तोंडासी । शब्द फुटेना वाचेसी । ऐशा पाहोन स्थितीसी । समर्थे धरिलें सौम्य रूप ॥ २६ ॥ आणि बोलले गर्जोन । हेंच कां तुझें धीटपण । तूं काळाचें भक्ष्य जाण । असाच खाईल काळ तुला ॥ २७ ॥ त्याची चुणूक दाखविली । पुढची स्थिती जाणविली । तेथें

पळाया नाहीं उरली । यमलोकांत जागा तुला ॥ २८ ॥ माधव ऐसें ऐकतां । झाला विनयें बोलतां । यमलोकाची नको वार्ता । तेवढी माझी टाळा हो ॥ २९ ॥ नको नको हें जीवित । द्या धाडून वैकुंठांत । हींच विनंति आपणांप्रत । महाराज माझी शेवटची ॥ १३० ॥ यमलोकीं जें दिसणार होतें । तें तुम्हीं दाविलें येथें । आतां या लेंकरातें । यमलोकीं धाडूं नका ॥ ३१ ॥ माझ्या पातकांच्या राशी । आहेत जरी बहुवशी । परी त्या जाळणें तुम्हांसी । नाहीं मुळीं अशक्य ॥ ३२ ॥ कांहीं सुकृत पदरीं होतें । म्हणून पाहिलें तुम्हांतें । संतभेटी ज्याला होतें । यमलोक ना तयासी ॥ ३३ ॥ ऐसें ऐकतां भाषण । समर्थें केलें हास्यवदन । महापतीता पावन । साधूच एक करिती की ॥ ३४ ॥ श्रीमन्नारायण नारायण । ऐसेंच माधवा करी भजन । जवळ आलें तुझें मरण । आतां गाफील राहूं नको ॥ ३५ ॥ किंवा अजून वांचण्याची । आस आहे तुला साची । ती असल्यास आयुष्याची । वाढ तुझ्या करितों मी ॥ ३६ ॥ माधव म्हणे गुरुराया । नको मला आयुष्य सदया । ओखटी ही प्रपंचमाया । त्यांत पुन्हां गोवूं नको ॥ ३७ ॥ 'तथास्तु' ऐसें महाराज वदले । तूं जें मागसी तें मीं दिलें । आतां तुला नाहीं उरलें । जन्मास येणें भूमीवर ॥ ३८ ॥ ऐशा रीतीं दोघांचा । संवाद गुप्त स्वरूपाचा । झाला त्या वर्णण्या वाचा । नाहीं माझी समर्थ ॥ ३९ ॥ इहलोकीचें देहभान । माधवाचें निमालें जाण । कित्येक बोलूं लागलें जन । उपवासें फिरलें मस्तक ॥ १४० ॥ म्हणून वेडेचार करी । जनकल्पना नानापरी । उठल्या झाल्या त्या अवसरीं । त्या किती म्हणून वर्णाव्या ? ॥ ४१ ॥ असो माधवाचें देहावसन । समर्थांसन्निध झालें जाण ।



चुकलें त्याचें जन्ममरण । गजाननाच्या कृपेनें ॥ ४२ ॥ असो एक्या समर्यां भली । समर्थांसी इच्छा झाली । ती त्यांनीं निवेदिली । आपल्या शिष्यवर्गातें ॥ ४३ ॥ वैदिक ब्राह्मण बोलवा । मंत्रजागरण येथें करवा । वेदश्रवणें देवदेवा । आनंद होतो अतिशय ॥ ४४ ॥ पन्हें पेढे बरफी खवा । भिजल्या डाळीस मीठ लावा । एकेक रुपया तो द्यावा । घनपाठी ब्राह्मणाते ॥ ४५ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । शिष्य विनवूं लागले । ऐसे वैदिक नाहीं उरले । या आपल्या शेगांवीं ॥ ४६ ॥ सांगाल तो करूं खर्च । परी अडचण आहे हींच । ब्राह्मण मिळण्याची साच । आमचा उपाय यातें नसे ॥ ४७ ॥ महाराज म्हणाले त्यावरी । करा उद्यां तयारी । ब्राह्मण धाडील श्रीहरी । तुमच्या वसंतपूजेला ॥४८॥ मग काय विचारतां । अवघे हर्षले तत्त्वतां । झाली तयारी हां हां म्हणता । रुपये शंभर झाले जमा ॥४९॥ सामान सर्व आणिलें । चंदनाचें उटणें केलें । आंत केशर कालविलें । तैसाच आणखी कापूर ॥ १५० ॥ दोन प्रहरचे समयाला । ब्राह्मण आले शेगांवाला । जें पदक्रम जटेला । जाणत होते विबुध हो ! ॥ ५१ ॥ थाटांत वसंतपूजा झाली । ब्राह्मण मंडळी आनंदली । दक्षिणा घेऊन गेली । अन्य ग्रामाकारणें ॥ ५२ ॥ संतांच्या जें मनीं येत । तें तें पुरवी रमानाथ । कमी न पडे यत्किंचित । ऐसा प्रभाव संतांचा ॥ ५३ ॥ बंकटलाल प्रतिवर्षीं । व्रत हें चालवी अतीहर्षीं । अजून परी शेगांवासी । वंशज त्याचे करिती हें ॥ ५४ ॥ हा दासगणूविरचित । श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । साधकासी दावो पथ । विमलशा हरिभक्तीचा ॥१५५॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

॥ इति चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥







श्रीगजानन महाराजांनी कोरड्या विहिरींत पाणी उत्पन्न केले. भास्कर पाटील क्षमा मागतो.

श्रीगणेशाय नमः ॥ हे अज अजित अद्वया । सच्चिदानंदा करुणालया । दासगणू लागला पायां । आतां अभय असूं दे ॥ १ ॥ मीं हीन दीन पातकी नर । नाहीं कोणता अधिकार । सर्व बाजूंनी लाचार । आहे मी देव देवा ॥ २ ॥ परी अत्यंत हीनावरी । थोर सर्वदा कृपा करी । पहा अंगी लाविली खरी । विभूति श्रीशंकरानें ॥ ३ ॥ तो हीनांचा हीनपणा । थोरा न आणी कमीपणा । हें जाणोन नारायणा । गणू हा ठेवा संग्रहीं ॥ ४ ॥ सर्व लाड लेकरांचे । माता ती पुरवी साचे । आहे दासगणूचें । ओझें सर्व तुझ्या शिरीं ॥ ५ ॥ जैसें करशिल तैसें करी । परी दया असूं दे अंतरीं । देवा तुझ्या बळावरी । दासगणूच्या साऱ्या उड्या ॥ ६ ॥ गजानन असतां शेगांवीं । यात्रा येई नित्य नवी । ती कोठवरी वर्णावी ? । पार न लागे तियेचा ॥ ७ ॥ महिमा तो वाढला फार । म्हणून गजानन साधुवर. । ती उपाधी करण्या दूर । भटकूं लागले काननीं ॥ ८ ॥ महिना महिना तिकडेच राहावें । वाटेल तेथेच बैसावें । कोणाशीं उमगूं न द्यावें । चरित्र आपुलें येतुलेंही ॥ ९ ॥ श्रोते एका समयासी । महाराज पिंपळगांवासी । गेले तेथें गोष्ट कैसी । झाली ते अवधारा ॥ १० ॥ त्या पिंपळगावाच्या शिवारात । होतें एक अरण्यात । शंकराचें मंदिर सत्य । जुनें पुराणें हेमाडपंती ॥ ११ ॥ ऐशा त्या मंदिरीं । येते झाले साक्षात्कारी । बैसलें शिवाच्या गाभारीं । लावोनिया पद्मासन ॥ १२ ॥ गुराखी त्या गांवचे । आपापले कळप गुरांचे । घेऊनिया निघाले साचे । अस्तमानी गांवाकडे ॥ १३ ॥ मंदिरापुढें तत्त्वता । एक लहान ओढा होता । तेथे पाणी पाजण्याकरिता । गुरें गुराखी पातले ॥ १४ ॥ कोणी सहज मंदिरांत । गेले वंदण्या शिवाप्रत । तो तेथें पाहोन समर्थ । आश्चर्यचकित

आहलें ॥ १५ ॥ मुलें म्हणती या मंदिरीं । कोणी न पाहिला आजवरी । पुरुष बसलेला निर्धारी । अस्तमानचे समयाला ॥ १६ ॥ कांहीं गुराखी बाहेर आले । इतरां बोलावूं लागले । कांहीं तेथेंच बैसले । सत्पुरुषाचे समोर ॥ १७ ॥ परी साधु बोलेना । डोळे मुळीच उघडीना । याचें कारण कळेना । त्या गुराखी अर्भकांसी ॥ १८ ॥ कोणी म्हणती थकलेला । हा साधु दिसतो मला । शक्ति मुळी नुरली त्याला । बोलावयाकारणें ॥ १९ ॥ कोणी म्हणती उपवासी । असावा निश्चयेसी । थोडी भाकर तयासी । देऊं आपण खावया ॥ २० ॥ ऐसे म्हणून भाकर । धरली मुखासमोर । भाविक मुळची गुराखी पोरं । हलवूं लागली समर्थाला ॥ २१ ॥ परी साधु हालेना । मुखीं शब्द बोलेना । म्हणून साऱ्या गुराख्यांना । नवल वाटले विशेष ॥ २२ ॥ गुराखी आपसांत बोलती । याची मुळीं न कळे स्थिती । जरी मेला म्हणावा निश्चिती । तरी आहे बसलेला ॥ २३ ॥ अंग ना झाले थंडगार । ऊन आहे साचार । यावरून हा जिवंत नर । आहे तरी शंका नको ॥ २४ ॥ कोणी म्हणे असेल भूत । मायावी रूप दावित । कोणी म्हणे हें तर सत्य । शिवापुढें ना भूत येई ॥ २५ ॥ कोणी म्हणती स्वर्गीचा । देव हा असावा साचा । लाभ त्याच्या दर्शनाचा । झाला आपणां हेंच भाग्य ॥ २६ ॥ याचें आतां पूजन । करूं अवघे आपण । जा स्नानालागून । पाणी आणा ओढ्याचें ॥ २७ ॥ पोरें गेलीं ओढ्यावरीं । गळ्यामध्यें[1] आणिलें वारी[2] । परमभावें पायांवरी । घालिते झालें समर्थांच्या ॥ २८ ॥ कोणीं वन्यपुष्पें आणिलीं । माळ त्यांची

१ खापराचा पाणी भरण्याचा बुधला त्यामध्यें. २ पाणी.



तयार केली । कंठामध्यें घातिली । गुराख्यांनीं साधूच्या ॥ २९ ॥ कोणी कांदाभाकर । नैवेद्यार्थ साचार । दिली ठेवून समोर । एका वडाच्या पानावरी ॥ ३० ॥ गुराख्यांनीं केलें नमन । आदरें भाव धरून । कांहीं वेळ केलें भजन । पुढें बसून समर्थांच्या ॥ ३१ ॥ ऐसा आनंद चालला । तों गुराखी एक बोलला । अरे वेळ बहु झाला । चला आतां गांवाकडे ॥ ३२ ॥ दिवस गेला मावळून । का न आलीं रानांतून । मुलें गुरांना घेऊन । ऐसें लोक म्हणतील कीं ॥ ३३ ॥ कदाचित आपणांसी । पाहण्या येतील काननासी । तान्हीं वासरें घरांसी । लागलीं असतील हुंबरावया ॥ ३४ ॥ या साधूची हकीकत । आपण सांगू गांवांत । शहाण्या वडील माणसांप्रत । म्हणजे येईल कळून की ॥ ३५ ॥ तें अवघ्यांसीं मानवलें । गुराखी सर्व निघून गेले । गांवामाजी कळविलें । मंदिराचें अवघें वृत्त ॥ ३६ ॥ पुढे श्रोते प्रातःकाळी । आली गांवची मंडळी । समर्थांसी पाहण्या भली । गुराख्यांच्या बरोबर ॥ ३७ ॥ जैसा काल होता बसला । तैसाच आतां पाहिला । भाकरीसी ना स्पर्श केला । ती जशीच्या तशीच आहे कीं ॥ ३८ ॥ म्हणूं लागले गांवकरी । हा योगी पुरुष कोणी तरी । आहे बैसला मंदिरी । सांप्रत या शंकराच्या ॥ ३९ ॥ कोणी ऐसें बोलले । शिव पिंडीच्या बाहेर आले । आपणा दर्शन द्याया भले । चला नेऊं या गांवांत ॥ ४० ॥ हा समाधी उतरील । तेव्हां कांहीं बोलेल । ही उतरण्या आहे वेळ । त्याला त्रास देऊं नका ॥ ४१ ॥ बंगाल देशीं जालंदर । बारा वर्षे झाले स्थिर । समाधीच्या जोरावर । गर्तेमाजीं ख्यात हें ॥ ४२ ॥ ऐसी भवति न भवति झाली । एक पालखी आणविली । त्यांत उचलून ठेविली । समर्थांची मूर्ति

पाहा ॥ ४३ ॥ ग्रामांतील नारीनर । अवघे होते बरोबर । पुढें वाजंत्र्यांचा गजर । होत होता विबुध हो ! ॥ ४४ ॥ मधून मधून तुळशीफुलें । पौर[1] टाकीत होते भले । समर्थांचें अंग झालें । गुलालानें लाली लाल ॥ ४५ ॥ घंटाघड्याळें वाजती । लोक अवघे भजन करिती । जय जय योगीराज मूर्ति । ऐसे उंच स्वराने ॥ ४६ ॥ मिरवणूक आली गांवांत । मारुतीच्या मंदिरांत । बसविले आणून सद्गुरुनाथ । एका भव्य पाटावरी ॥ ४७ ॥ तोही दिवस तैसाच गेला । मग लोकांनीं विचार केला । आपण करूं स्तवनाला । उपाशी बसून यांच्यापुढें ॥ ४८ ॥ ऐसा जो ते विचार करिती । तों आले देहावरती । गजानन श्रीसद्गुरुमूर्ति । मुगुटमणी योग्यांचे ॥ ४९ ॥ मग काय विचारतां । आनंद झाला समस्तां । प्रत्येक स्त्रीपुरुष ठेवी माथा । स्वामींचिया चरणांवरी ॥ ५० ॥ नैवेद्याची धूम झाली । ज्याने त्याने आणिली । पात्रें तीं वाढून भलीं । मारुतीच्या मंदिरांत ॥ ५१ ॥ त्या अवघ्यांचा स्वीकार । समर्थें केला थोडाफार । हाळोपाळींत साचार । ही वार्ता श्रुत झाली ॥ ५२ ॥ पुढें दुसऱ्या मंगळवारी । पिंपळगांवचे गांवकरी । आले बाजारा निर्धारी । शेगांवाकारणें ॥ ५३ ॥ ते शेगांवच्या लोकांसी । सहज बोललें प्रेमेसी । आमच्याही गांवासी । आला एक अवलिया ॥ ५४ ॥ अवलिया थोर अधिकारीं । प्रत्यक्ष आहे श्रीहरी । धन्य पिंपळगांव नगरी । पाय लागले साधूचे ॥ ५५ ॥ आम्ही तया योगीवरा । कोठें न जाऊं देऊं खरा । निंघि चालत आला घरा । त्यातें कोण दवडी हो ॥ ५६ ॥ शेगांवचे बाजारांत । जिकडे तिकडे हीच

[1] जन.



मात । बंकटलाला झालें श्रुत । वर्तमान तें अवलियाचें ॥ ५७ ॥ बंकटलाल पत्नीसहित । गेला पिंपळगांवांत । समर्थांसी जोडोन हात । विनवूं लागला नानापरीं ॥ ५८ ॥ आतां येतो म्हणून । निघून गेलात आपण । त्यास झाले पंधरा दिन । याचा विचार करा हो ॥ ५९ ॥ गुरुराया तुम्हांवीण । भणभणीत दिसे सदन । शेगांवचे अवघे जन । चिंतातुर झालें हो ॥ ६० ॥ गाडी आणिली आपणासाठीं । चला शेगांवीं ज्ञानजेठी । मायलेका होणें तुटी । हें कांहीं बरें नसें ॥ ६१ ॥ कित्येक दयाळा आपुले भक्त । राहिले असती उपोषित । त्या शेगांव शहरांत । नित्य दर्शन घेणारे ॥ ६२ ॥ तुम्ही न आल्या शेगांवीं । मी ही तनु त्यागीन बरवी । आशुची सांगा पुरवावी । आळ कोणी गुरुवर्या ! ॥ ६३ ॥ बंकटलाल ऐसें वदले । महाराज गाडीवरी बसले । शेगांवासी निघालें । पिंपळगांवा सोडून ॥ ६४ ॥ जैसा मागें गोकुळाला । न्याया कृष्णा अक्रूर आला । तैसा बंकटलाल भासला । आक्रूर पिंपळगांवातें ॥ ६५ ॥ पिंपळगांवच्या लोकांप्रती । बंकटलाल समजाविती । नका होऊं दुःखित चित्तीं । जाती न कोठें लांब साधु ॥ ६६ ॥ वाटेल तेव्हां दर्शना यावें । हेतु आपलें पुरवावे । जेथल्या तेथें अन्न द्यावें । या अमोल मूर्तीला ॥ ६७ ॥ बहुतेक पिंपळगांवाचा । बंकटलाल साहुकार साचा । मनोभंग साहूचा । करण्या कुळांची छाती नसे ॥ ६८ ॥ चुरमुऱ्याचे लाडु खात । पिंपळगांव बसले स्वस्थ । महाराज बसून गाडीत । जाऊं लागले शेगांवा ॥ ६९ ॥ पथीं जातां गुरुमूर्ति । बोलली बंकटलालाप्रती । ही का साहूची होय रीति । माल दुसऱ्याचा बळे न्यावा ! ॥ ७० ॥ मशीं

यावया तुझ्या घरीं । भय वाटतें अंतरीं । तुझ्या घरची नाही बरी । रीत हें मी पाहतों ॥ ७१ ॥ लक्ष्मी जी लोकमाता । महाविष्णूची होय कांता । जिची असे अगाध सत्ता । तिलाही त्वा कोंडिलें ॥ ७२ ॥ तेथें माझा पाड कोण ? । म्हणून गेलों पळोन । जगदंबेचे पाहून । हाल, माझें चित्त भ्यालें ॥ ७३ ॥ ऐसें ऐकतां हंसूं आलें । बंकटलालाप्रती भलें । विनयानें भाषण केलें । तें ऐका सावचित्तें ॥ ७४ ॥ बंकट बोले गुरुनाथा । माझ्या कुलपा न भ्याली माता । आपुला वास तेथें होता । म्हणून झाली स्थीर ती ॥ ७५ ॥ जेथें बाळ तेथें आई । तेथें दुज्याचा पाड काई ? । आपल्या पायापुढें नाहीं । मला धनाची किंमत ॥ ७६ ॥ तेंच माझें धन थोर । म्हणून आलों इथवर । माझें न उरलें आतां घर । तें सर्वस्वी आपुलें ॥ ७७ ॥ घरमालकाकारण । शिपाई आडवी कोठून ? । जैसें तुमचें इच्छील मन । तैसेंच तुम्ही वागावें ॥ ७८ ॥ इतकीच माझी विनंती । शेगांवीं असो वस्ती । धेनु काननातें जाती । परी येती घरीं पुन्हां ॥ ७९ ॥ तैसेंच तुम्ही करावें । अवघ्या जगा उद्धरावें । परी आम्हां न विसरावें । शेगांवीं यावें वरचेवर ॥ ८० ॥ ऐसी समजूत घालून । शेगांवीं आणले गजानन । तेथें कांहीं दिवस राहून । निघून गेले पुनरपि ॥ ८१ ॥ ती ऐकावी तुम्हीं कथा । सांगतों मी इथे आतां । अडगांव नामे ग्राम होता । एक तया वऱ्हाड प्रांतीं ॥ ८२ ॥ त्या ग्रामाकारण । जाया निघाले दयाघन । प्रातःकाळीं चुकवून । नजर शेगांवकरांची ॥ ८३ ॥ महाराजांची चालगती । वायुचिया समान होती । अंजनी–तनय मारुती । आला काय वाटे पुन्हां ॥ ८४ ॥ मास होता वैशाख ।



सोळा कलांनीं तपे अर्क । क्वचित् कोठें न राहिलें उदक । ऐसा प्रखर उन्हाळा ॥८५॥ माध्यान्हीच्या समयाला । अकोली गांवापासी आला । हा योगयोगेश्वर साधु भला । गजाननमहाराज ॥ ८६ ॥ तों काय घडलें वर्तमान । समर्थांसी लागली तहान । करिती चौफेर अवलोकन । तों उदक कोठें दिसेना ॥ ८७ ॥ अंगावटे चालल्या धारा । घामाच्या त्या एकसरा । अधरोष्ठ तो सुकला खरा । उदकाविण समर्थांचा ॥ ८८ ॥ ऐशा दुपारच्या अवसरीं । भास्कर नामें शेतकरी । घालीत होता पाळी खरी । आपुल्या त्या शेताला ॥ ८९ ॥ शेतकऱ्याची पाहतां स्थिति । हे अवघ्यांत मुख्य असती । कृषीवल हा निश्चिति । अन्नदाता जगाचा ॥ ९० ॥ अंगीं ऐसें मोठेपण । परी सोशी यातना दारुण । बिचाऱ्यांना ऊन तहान । सोसणे भाग असे कीं ॥ ९१ ॥ त्या अकोलीच्या शिवारांत । जलाचें दुर्भिक्ष अत्यंत । एक वेळा मिळेल घृत । परि अभाव पाण्याचा ॥ ९२ ॥ आपणातें प्यावयासी । भास्करानें शेतासी । आणिलें खापराच्या घागरीसी । उदक होतें गांवांतून ॥ ९३ ॥ पाठीशी ती भाकर । डोई जलाची घागर । ऐसा होता प्रकार । शेतामाजीं येण्याचा ॥ ९४ ॥ ती घागर झुडपाखालीं । होती भास्करें ठेविली । त्या ठिकाणीं स्वारी आली । भास्करा जल मागावया ॥ ९५ ॥ समर्थ म्हणती भास्कराला । तहान लागली मला । पाणी दे बा प्यावयाला । नाहीं ऐसें म्हणूं नको ॥ ९६ ॥ पुण्य पाणी पाजण्याचें । आहे बापा थोर साचें । पाण्यावांचून प्राणाचें । रक्षण होणें अशक्य ॥ ९७ ॥ धनिक पाणपोया घालिती । हमरस्त्याच्या पथावरती । याचें कारण शोध चित्तीं । म्हणजे येईल कळोन ॥ ९८ ॥ भास्कर बोले त्यावर । तूं नंगा धूत

दिगंबर । तुला दांडग्या पाजितां नीर । पुण्यलाभ कशाचा ? ॥९९॥ अनाथ–पंगू–दुबळ्यांसाठीं । त्या पुण्याच्या शोभती गोष्टी । वा जो समाजहितासाठीं । झटे त्यासी साह्य करा ॥ १०० ॥ ऐसे शास्त्राचें आहे वचन । तुझ्यासारख्या मैंदाकारण । आम्ही पाजितां जीवन । तें उलटें पाप होय ॥ १ ॥ भूतदयेच्या तत्त्वें मला । सर्प कोणी कां पोसला ? । वा जागा चोरट्याला । देती सदनी काय कोणी ? ॥ २ ॥ तूं भीक मागून घरोघर । केलेंस पुष्ट शरीर । भारभूत साचार । झालास आपुल्या कृतीने ॥ ३ ॥ मीं माझ्यासाठीं घागर । आणिली सकाळीं डोक्यावर । त्या आपल्या पिठावर । रेघोट्या तूं ओढूं नको ॥ ४ ॥ तुला ना देणार पाणी । नको करूं रे विनवणी । जा जा करी येथोनी । काळे आपले चांडाळा ॥ ५ ॥ तुझ्यासरिखे निरोद्योगी । जन्मले आमच्यांत जाग-जागीं । म्हणून झालों अभागी । आम्ही चहूं खंडांत ॥ ६ ॥ भास्कराचें भाषण । समर्थांनीं ऐकून । थोडें करूनि हास्यवदन । निघोन गेले तेथोनिया ॥ ७ ॥ थोड्या दूर अंतरावर । एक होती साच विहीर । तिकडे धांव अखेर । घेतली स्वामीरायांनीं ॥ ८ ॥ स्वामी तिकडे जाऊं लागतां । भास्कर झाला बोलतां । उच्च स्वरें; वेड्या वृथा । तिकडे कशाला जातोस ? ॥ ९ ॥ ती कोरडी ठणठणीत । आहे विहीर जाण सत्य । पाणी या एक कोसांत । नाहीं कोठें जाण पिशा ॥ ११० ॥ समर्थ बोलले त्यावरी । ही सत्य तुझी वैखरी । विहिरींत पाणी नाहीं जरी । परी करितों प्रयत्न ॥ ११ ॥ तुझ्यासारखे बुद्धिमान । जलानें होती हैराण । ते मी नयनीं पाहून । स्वस्थ ऐसा बैसलो जरी ॥ १२ ॥ तरी समाजहितासाठीं । काय मी केली सांग गोष्टी । साह्य होतो जगजेठी । हेतु



शुद्ध असल्यावर ॥ १३ ॥ समर्थ आले विहिरीपाशीं । तो थेंब नाहीं तियेशीं । हताश होऊन वृक्षापाशी । बैसले एका दगडावर ॥ १४ ॥ डोळे मिटून केलें ध्यान । चित्तीं सांठविला नारायण । जो सच्चिदानंद दयाघन । दीनोद्धार जगद्गुरु ॥ १५ ॥ समर्थ म्हणती देवदेवा । हे वामना वासुदेवा । प्रद्युम्ना राघवा । हे विठ्ठला नरहरी ! ॥ १६ ॥ देवा ही आकोली । पाण्यावांचून त्रस्त झाली । बोलही न राहिली । कोठेंच देवा विहिरींतून ॥ १७ ॥ मानवी यत्न अवघे हरिले । म्हणून तुजला प्रार्थिले । पाव आतां जगन्माऊले । पाणी दे या विहिरीला ॥ १८ ॥ तुझी करणी अघटीत । जें न घडे तें घडविसी सत्य । मांजरे जळत्या आव्यांत । पांडुरंगा ! तूं रक्षिलीं ॥ १९ ॥ प्रल्हाद भक्त करण्या खरा । स्तंभी प्रगटलास जगदोद्धारा । बारा गांव वैश्वानरा । भक्षिलें त्वां गोकुळांत ॥ १२० ॥ कर नखाग्रीं धरिला गिरी । तूंच कीं रे मुरारी । तुझ्या कृपेची न ये सरी । जगत्रयीं कवणास ॥ २१ ॥ दामाजीपंत ठाणेदार । त्याच्यासाठीं झालास महार । चोख्यासाठीं ओढिलीं ढोरं । पांखरें रक्षिलीं माळ्याचीं ॥ २२ ॥ उपमन्यूसाठीं भला । क्षीरसमुद्र तुवां दिला । तहान नामदेवाला । मारवाडांत लागली जैं ॥ २३ ॥ तैं तुम्ही कौतुक केलें । निर्जलता प्रांतीं भलें । नाम्यासाठीं भरविलें । जल हें आण ध्यानांत ॥ २४ ॥ ऐसें विनवितां ईश्वरा । विहिरीलागीं फुटला झरा । उफाळ्याचा साजिरा । विहीर भरली क्षणा-मध्ये ॥ २५ ॥ साह्य झाल्या जगन्नाथ । काय एक ना तें होत । ईश्वरी सत्ता अगाध सत्य । जें ना घडे तेंच घडवी ॥ २६ ॥ तेथ पाणी समर्थ प्याले । तें भास्करानें पाहिलें । चित्त त्याचें घोटाळलें ।

काहीं नच चाले तर्क त्याचा ॥ २७ ॥ वर्षे झाली द्वादश । जल नाहीं विहिरीस । तिलाच एका घटकेस । यानें जलमय केली कीं ॥ २८ ॥ यावरून हा कोणीतरी । खचित आहे साक्षात्कारी । बळेंच फिरतो पिशापरी । हें आतां समजलें ॥ २९ ॥ शेतीचें काम सोडून । भास्कर आला धांवून । धरिता झाला दृढ चरण । मुखें स्तोत्र आरंभिलें ॥ १३० ॥ हे नरदेहधारी परमेश्वरा । हे दयेच्या सागरा । लेंकरासी कृपा करा । अर्भक मी तुमचें असें ॥ ३१ ॥ तुम्हांतें ना जाणून । मी बोललों टाकून । आतां पस्तावा झाला पूर्ण । क्षमा त्याची करा हो ॥ ३२ ॥ टाकून बोलता गौळणी । रागावला ना चक्रपाणी । दयाळा बाह्य वेषांनीं । तुझ्या मजला ठकविलें ॥ ३३ ॥ त्याचें तूंच निरसन । केलें चमत्कार दाखवून । भगवंताचें देवपण । कृतीनेंच कळलें कीं ॥ ३४ ॥ तैसा तुझा अधिकार । केवढा तरी आहे थोर । तें कळलें साचार । या जलाच्या कृतीनें ॥ ३५ ॥ कांहीं असो सद्गुरुनाथा । मी न सोडी तुम्हां आतां । लेंकरानें भेटतां । मायें कोठें न रहावें कीं ॥ ३६ ॥ खोटी ही प्रपंच माया । आलें आज कळोनिया । आतां परते न लोटा या । दीना अर्भकाकारणें ॥ ३७ ॥ भास्करासी समर्थ म्हणती । ऐसा न होई दुःखित चित्तीं । आतां घागर डोक्यावरती । गांवांतून आणूं नको ॥ ३८ ॥ तुझ्यासाठीं हें जीवन । विहिरींत केलें निर्माण । आता कशाची नुरली वाण । मग का प्रपंच टाकिशी ? ॥ ३९ ॥ पाणी आलें तुझ्याकारितां । बगीचा तो लाव आतां । भास्कर म्हणे गुरुनाथा । हें आमीष दावूं नका ॥ १४० ॥ माझा निश्चय हीच विहीर । कोरडी ठणठणीत साचार । होती



दयाळा आजवर । थेंब नव्हता पाण्याचा ॥ ४१ ॥ ती विहीर फोडण्याला । तुम्हीच हा प्रयत्न केला । साक्षात्काराचा लाविला । सुरुंग खडक फोडावया ॥ ४२ ॥ तेणें हा फुटला खडक । भावाचें लागलें उदक । आतां मळा निःशंक । भक्तिपंथाचा लावीन मी ॥ ४३ ॥ वृत्तीच्या मेदिनी-ठायीं । फळझाडें ती लावीन पाही । सन्नीतीची माझे आई । तुझ्या कृपेंकरून ॥ ४४ ॥ सत्कर्मांचीं फुलझाडें । लावीन मी जिकडे तिकडे । क्षणैक बैलवाडे । यांचा संबंध आतां नको ॥ ४५ ॥ पहा श्रोते संतसंगति । क्षणैक घडतां भास्कराप्रती । केवढी झाली उपरती । याचा विचार करा हो ॥ ४६ ॥ खऱ्या संताचें दर्शन । आगळें सर्व साधनांहून । तुकारामें केलें वर्णन । "संतचरण-रजा"चे अभंगीं ॥ ४७ ॥ तो अभंग पहावा । चित्तीं विचार करावा । आणि त्याचा अनुभव घ्यावा । निजहिताकारणें ॥ ४८ ॥ पाणी लागलें विहिरीस । ही वार्ता आसपास । पसरतां जन दर्शनास । धांवूं लागले स्वामीच्या ॥ ४९ ॥ मधूचा लागतां सुगावा । जैशा मक्षिका घेती धांवा । वा साखरेचा पाहून रवा । मुंग्या येती धांवून ॥ १५० ॥ तैसे श्रोते तेथ आले । लोक अपार मिळाले । विहिरीचें पाणी पाहिले । पिऊन त्यांनीं तेधवां ॥ ५१ ॥ उदक, निर्मळ शीत मधुर । गोड अमृताहून फार । करूं लागले जयजयकार । गजाननाचा लोक सारे ॥ ५२ ॥ असो पुढें भास्करासहित । अडगांवासी न जातां परत । महाराज आले शेगांवांत । श्रीगजानन सिद्धयोगी ॥ ५३ ॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । होवो जगासी आदर्शभूत । संतमहिमा जाणावया ॥ १५४ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति पंचमोऽध्यायः समाप्तः ॥

श्रीगजानन-
॥ ३० ॥

विजय
अ. ॥ ५ ॥

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य पंचमोऽध्यायः समाप्तः ॥

॥ ३० ॥





श्रीगजानन महाराजांजवळ कणसे टाकून मधमाशांना भिऊन पळून जाणारे लोक.

श्रीगणेशाय नमः ॥ हे परम मंगला श्रीहरी । तुझी कृपा झालियावरी । अशुभ अवघें जातें दुरी । हा अनुभव संतांचा ॥ १ ॥ त्या संतवाक्यीं भरंवसा । मी ठेवून श्रीनिवासा । मंगलाची धरून आशा । तुझ्या दारीं पातलों ॥ २ ॥ आतां विन्मुख लावल्यास । त्याचा तुला लागेल दोष । आणि बट्टा वाक्यास । लागेल कीं संतांच्या ॥ ३ ॥ म्हणोन हे माधवा ! । अभिमान माझा धरावा । रोष कधीं ना करावा । या अजाण लेंकरावर ॥४॥ बालकाचे हीनपण । मातेलागीं दूषण । हें मनांत आणून । करणें असेल तें करी ॥५॥ असो बंकटलाला घरीं । राहिली समर्थांची स्वारी । तयीं अपूर्व एक घडली खरी । गोष्ट श्रोते ती ऐका ॥ ६ ॥ गांवाचिया दक्षिणेस । बंकटलालाच्या मळ्यास । महाराज गेले एक दिवस । कणसें मक्याचीं खावया ॥ ७ ॥ बहुत मंडळी बरोबरी । कणसें खाया आली खरी । विहिरीपार्श्वी तयारी । केली कणसें भाजण्याची ॥ ८ ॥ विहीर होती धनत्तर । पाणी जिला अपरंपार । गर्द छायेचे वृक्ष थोर । जवळ होते चिंचेचे ॥ ९ ॥ आगट्या पेटल्या एकसरा । अजमासें हो दहा बारा । तेणें डोंब झाला खरा । गगनोदरीं धूमाचा ॥ १० ॥ त्यायोगें ऐसें झालें । आग्या मोहोळ लागलेलें । चिंचवृक्षावरी भलें । त्याच्या माशा उठल्या कीं ॥ ११ ॥ त्या माशा उठतां क्षणीं । मंडळी गेली पळोनी । कणसें ठिकाणच्या ठिकाणीं । मक्याचीं तीं राहिलीं हो ॥ १२ ॥ त्या आग्या मोहोळाच्या मक्षिका । पसरल्या अवघ्या मळ्यांत देखा । घोंगड्याचा करून बुरखा । कोणी गेले पळून ॥ १३ ॥ प्राणापरी आवडती । वस्तु नसे हो कोणती । अशा वेळीं समर्थमूर्ति । आसनीं होती निर्धास्त ॥ १४ ॥

तें नाहीं पळून गेले । आसनीं आपल्या स्वस्थ बसले । विचार करूं लागले । निजचित्तीं माश्यांचा ॥ १५ ॥ माशी तरी मीच झालों । मोहोळ तेंही मीच बनलों । कणसें खाया मीच आलों । कणसें तेंही रूपें माझी ॥ १६ ॥ ऐशा विचारें आनंदात । महाराज राहिले डोलत । अंगावरी असंख्यात । माशा येऊन बैसल्या ॥ १७ ॥ वाटे पासोडी माश्यांची । समर्थ पांघरले साची । योग्यता ब्रह्म-निष्ठाची । काय वर्णन करावी ? ॥ १८ ॥ माशा चावती वरच्यावरी । परी न तो पर्वा करी । त्यांचे कांटे शरीरी । बोचले असती असंख्यात ॥ १९ ॥ यासी झाला एक प्रहर । भक्त झाले चिंतातुर । बंकटलालाचें अंतर । दुःखें व्याकूळ झालें हो ॥ २० ॥ कोठून बुद्धि झाली मला । येथें आणिलें समर्थाला । कणसें मक्याची खावयाला । मंडळीच्या समवेत ॥ २१ ॥ अशा समर्थालागून । दुःख द्याया मीच कारण । झालों हे का शिष्यगण । माझें हाय रे दुर्दैवा ? ॥ २२ ॥ बंकटलालानें तयारी । पुढें येण्याची केली खरी । हें जाणोन अंतरी । कौतुक केलें समर्थानें ॥ २३ ॥ जीवांनो ! जा निघोन । बसा मोहोळीं जाऊन । माझ्या बंकटाकारण । तुम्ही न कोणीं चावावें ॥ २४ ॥ जमलेल्या मंडळींत । बंकट हाच निःसीम भक्त । जो माझ्या प्रीत्यर्थ । येत आहे धांवोनिया ॥ २५ ॥ ऐसे म्हणतां माश्या गेल्या । मोहोळावरी जाऊन बैसल्या । बंकटलालानें पाहिल्या । त्या आपल्या निजदृष्टीं ॥ २६ ॥ महाराज त्या पाहोनी । बोलते झाले हांसोनी । वा खूप केलीस मेजवानी । आम्हांसी तूं माश्यांची ॥ २७ ॥ अरे ते जीव विषारी । बैसले माझ्या अंगावरी । माझ्यापासूनी झाले दुरी । लड्डूभक्त येधवां ॥ २८ ॥ याचा करी गा विचार ।



संकट आल्या कोणावर । कोणी न साह्य करणार । एका ईश्वरावाचूनि ॥ २९ ॥ जिलबी पेढे बरफी खाती । माश्या आल्या पळून जाती । ऐशी जयांची आहे कृति । ते स्वार्थी भक्त निःसंशय ॥ ३० ॥ बंकटलाल मधुरोत्तर । करितां झाला त्यावर । महाराज आणवूं कां सोनार । काटे माश्यांचें काढावया ? ॥ ३१ ॥ महापापी मी गुरुराया । तुम्हांलागीं त्रास द्याया । आणवितां झालों या ठायां । माश्या किती डसल्या तरी ! ॥ ३२ ॥ गांधी अगणित अंगावर । उठल्या तुमच्या साचार । याचा व्हावया परिहार । उपाय सांगा कोणता ? ॥ ३३ ॥ बंकटलालाचें ऐकिलें । वचन, महाराज बोलते झाले । अरे यांत ना कांहीं अधिक घडलें । डसणें स्वभाव माश्यांचा ॥ ३४ ॥ मला त्याची मुळींच बाधा । होणार नाहीं कदा । त्या माशीरूप सच्चिदानंदा । म्यां जाणलें म्हणोन ॥ ३५ ॥ माशी तरी तोच झाला । तोच आहे माझा पुतळा । पाण्यानेंच पाण्याला । काय दुखावितां येईल ? ॥ ३६ ॥ हें ऐकतां ब्रह्मज्ञान । बंकटलाल धरी मौन । कांटे काढण्यालागून । पाहिलें त्यानें सोनारा ॥ ३७ ॥ सोनार चिमटे घेऊन आले । देहास शोधूं लागले । कोठे आहेत कांटे रुतले । मक्षिकेचे पाहावया ॥ ३८ ॥ महाराज वदले तयांना । काय ह्या वंध्यामैथुना । करितसा तुमच्या नयनां । कांटे ते ना दिसतील ॥ ३९ ॥ ते काढण्या चिमट्याची । गती नाहीं मुळींच साची । साक्ष ती ह्या गोष्टीची । मीच दावितों तुम्हांला ॥ ४० ॥ ऐसें म्हणून कौतुक केलें । वायुलागीं रोधून धरिलें । तों कांटे अवघे वरी आले । रुतलेल्या स्थलांतून ॥ ४१ ॥ तो पाहतां प्रकार । लोक आनंदले फार । कळून

आला अधिकार । श्रीगजाननस्वामींचा ॥ ४२ ॥ पुढें कणसें भाजलीं । अवघ्यांनीं तीं ग्रहण केलीं । अस्तमानीं निघून आली । मंडळी निजगृहातें ॥ ४३ ॥ असो पुढे एक वेळां । महाराज गेले अकोटाला । आपल्या बंधूस भेटण्याला । श्रीनरसिंगजीकारणें ॥ ४४ ॥ हा कोतश्या अल्लीचा । शिष्य मराठा जातीचा । कंठमणी विठ्ठलाचा । भक्तिबलानें झाला असे ॥ ४५ ॥ त्या नरसिंगजीचें चरित्र । मी भक्तलीलामृतांत । वर्णिले आहे इत्थंभूत । आतां तें सांगणें नको ॥ ४६ ॥ हें अकोट नामें नगर । शेगांवाहून साचार । आहे अठरा कोसांवर । ईशान्येला परियेसी ॥ ४७ ॥ मनोवेगाचा सजवून वारु । निघते झाले सद्गुरु । जे पदनताचे कल्पतरु । श्रीगजानन महाराज ॥ ४८ ॥ अकोटाच्या सान्निध्यासी । एका निबिडतरशा अरण्यासी । नरसिंग राहे अहर्निशीं । एकान्तवास सेवावया ॥ ४९ ॥ हें निर्जन अवघें अरण्य । महा भयंकर दारुण । निंब अश्वत्थ रातांजन । वृक्ष जेथें उदेले ॥ ५० ॥ लता त्या नाना जाती । वृक्षा वेढून बैसल्या असती । तृण वाढलें भूमीवरती । सर्प वारुळीं असंख्यात ॥ ५१ ॥ ऐशा त्या अरण्यांत । नरसिंगजी जाऊन बसत । म्हणून आले अवचित । समर्थ त्यासी भेटावया ॥ ५२ ॥ सारखा भेटे सारख्यासी । पाणीच मिळे पाण्याशीं । विजातीय द्रव्यासी । समरसता होणें नसें ॥ ५३ ॥ गजाननासी पाहिलें । तेणें चित्त आनंदलें । स्वामी नरसिंगजीचें भलें । तो प्रेमा न वर्णवे कीं ॥ ५४ ॥ एक हरी, एक हर । चालते बोलते परमेश्वर । एक राम एक कुमर । वसुदेवदेवकीचा ॥ ५५ ॥ एक मुनि वसिष्ठ । एक पराशर ऋषि श्रेष्ठ । एक जान्हवीचा कांठ । एक तट गोदेचा ॥५६॥ एक हिरा कोहिनूर । एक कौस्तुभ साचार । एक वैनतेय, एक कुमर । सती



वानरी अंजनीचा ॥ ५७ ॥ दोघे भेटले एकमेकां । दोघा आनंद सारखा । बैसते झाले आसनीं एका । हितगुज तें करावया ॥ ५८ ॥ अनुभव ते आपापले । एकमेकां कथिते झाले । नरसिंगा ! तूं उत्तम केलें । प्रपंचांत राहिलास ॥ ५९ ॥ मीं त्याग केला तयाचा । स्वीकार करून योगाचा । या सच्चिदानंद तत्त्वाचा । करिता झालों विचार ॥ ६० ॥ या योगाच्या क्रियेंत । गोष्टी होती अघटीत । ज्यांचा मुळीं न लागे अंत । या सामान्य लोकांला ॥ ६१ ॥ त्या गोष्टी लपवावया । पिसा बनलों जगा ठायां । उपाधी ते नासावया । वेड बळेंच पांघरलों ॥ ६२ ॥ तत्त्व जाणण्याकारण । मार्ग कथिलें आहेत तीन । कर्म, भक्ति, योग म्हणून । शास्त्रकारांनी शास्त्रांत ॥ ६३ ॥ फल या तिन्ही मार्गांचें । एकचि आहे अखेरीचें । परी बाह्य स्वरूप त्यांचें । भिन्न भिन्न असें कीं ॥ ६४ ॥ योगी योगक्रियेचा । जरी अभिमान वाही साचा । तरी तपासी तत्त्वाचा । खरा बोध ना होईल ॥ ६५ ॥ योगक्रिया वरून । अलिप्त रहावे तयापासून । कमलपत्रासमान । तरीच तत्त्व कळून ये ॥ ६६ ॥ याचपरी प्रपंचाची । स्थिती नरसिंगा आहे साची । आसक्ति कन्यापुत्रांची । मुळींच राहतां कामा नये ॥ ६७ ॥ गार पाण्यांत रहाते । परी न पाणी शिरूं देते । तैसेच वागती साचें । या प्रपंचामाझारीं ॥ ६८ ॥ यापरी त्वां रहावें । अपेक्षारहित असावें । चित्तांतून ना ढळूं द्यावें । सच्चिदानंद ईशाला ॥ ६९ ॥ म्हणजे कांहीं अशक्य नाहीं । तूं, मी आणि शेषशायी । एकरूप आहों पाही । जन जनार्दन भिन्न नसे ॥ ७० ॥ नरसिंग म्हणती बंधुराया । आलास मशी भेटावया । ही तुझी केवढी दया । उपमा याला देण्या नसे ॥ ७१ ॥ प्रपंच मुळी अशाश्वत । त्याची काय किंमत । दुपारच्या सावलीप्रत । कोण

सांग खरें मानी ? ॥७२॥ तूं कथिलें जयापरी । तैसा वागेन भूवरी । मी, जाण वरच्यावरी । अशीच भेटी द्यावी तुवां ॥ ७३ ॥ देह–प्रारब्ध जयाचें । असेल ज्या जातीचें । तेंच आहे न्हावयाचें । लोकाचारी निःसंशय ॥ ७४ ॥ तुम्हां आम्हांकारणें । जें का धाडिलें ईशानें । तेंच आहे आपणां करणें । निरालसपणें भूमिवरी ॥ ७५ ॥ आतां विनंती इतुकीच खरी । व्यावहारिक भेट वरच्यावरी । देत जावी साजिरी । मी धाकटा बंधु तुझा ॥ ७६ ॥ नंदीग्रामा राहिला भरत । रघुपतीची वाट पहात । तैसाच मी या आकोटांत । राहून पाहातों वाट तुझी ॥ ७७ ॥ तुला येथें यावया । अशक्य कांहीं नाहीं सदया । अवघ्या आहेत योगक्रिया । अवगत तुला पहिल्यापून ॥ ७८ ॥ पद न लाविता पाण्याप्रत । योगी भरधांव वरुनी पळत । क्षणामाजीं फिरून येत । शोधून अवघ्या त्रिभुवना ॥ ७९ ॥ ऐसे हितगुज उभयतांचें । रात्रभरी झालें साचें । भरतें आलें प्रेमाचें । दोघांचिया संगमीं ॥ ८० ॥ खरे खरे जे का संत । तेथें हेंच घडून येत । दांभिकांची होतात । भांडणें पाहून एकमेकां ॥ ८१ ॥ दांभिक म्हणूं नये गुरु । ते अवघे पोटभरु । पुरामाजीं फुटकें तारूं । तारण्यासी समर्थ नसे ! ॥ ८२ ॥ दांभिकांचा बोलबाला । जरी होतो जगीं भला । तरी त्यागणें आहे त्याला । निवडूनिया श्रोते हो ! ॥ ८३ ॥ संतत्व नाहीं मठांत । संतत्व नाहीं विद्वत्तेंत । संतत्व नाहीं कवित्वांत । तेथें स्वानुभव पाहिजे ॥ ८४ ॥ दांभिक मुलाम्याचें सोनें । त्याला सांगा काय घेणें । गृहिणी म्हणून ठेवणें । काय कसबीण सदनांते ? ॥ ८५ ॥ ही संतजोडी साक्षात्कारी । दांभिकतेची साच वैरी । नांदे ज्यांच्या सदैव घरीं । सन्निति सदाचार ॥ ८६ ॥ नरसिंगजीस



भेटण्या जाण । काननीं आले गजानन । ऐसें कळलें वर्तमान । गुराखीद्वारें आकोटाला ॥ ८७ ॥ तें कळतां आनंदले । लोक धावूं लागले । नारळ घेऊन निघाले । पाहाया द्वय संतांसी ॥ ८८ ॥ एकमेकां ऐसें म्हणती । चला चला रे सत्वर गती । गोदा आणि भागीरथी । संगम पावली काननांत ॥ ८९ ॥ त्या भेटरूप प्रयागासी । जाऊं आपण स्नानासी । या महोदयपर्वणीसी । साधून घेऊं चला हो ॥ ९० ॥ तों इकडे काय झालें । गजानन आधींच निघून गेले । नरसिंगासी पुसून भले । भेट ना झाली पौरांसी ॥ ९१ ॥ पुढें एकदां गजानन । करीत असतां भ्रमण । दर्यापुराच्या सन्निध जाण । येते जाहले शिष्यांसह ॥ ९२ ॥ दर्यापुराच्या शेजारी । शिवर गांव निर्धारी । असे चंद्रभागेच्या तीरीं । व्रजभूषणा वास जेथें ॥ ९३ ॥ श्रोते ही चंद्रभागा । पंढरीची नाहीं बघा । ही लहानशी एक गंगा । पयोष्णीला मिळणारी ॥ ९४ ॥ या शिवर गांवांत । व्रजभूषण नामें पंडित । चार भाषा अवगत । होत्या श्रोते जयाला ॥ ९५ ॥ कीर्ति ज्याच्या विद्वत्तेची । वऱ्हाडी पसरली साची । याला भक्ति भास्कराची । आत्यंतिक असे हो ॥ ९६ ॥ प्रत्यहीं चंद्रभागेवर । स्नान करी साचार । उदयास येतां दिनकर । अर्घ्य त्यासी देतसे ॥ ९७ ॥ पंच पंच उषःकाला । व्रजभूषण उठे भला । सारून प्रातर्विधीला । अरुणोदयीं स्नान करी ॥ ९८ ॥ तेंही शीतोदकांनीं । ऐसा कर्मठ परी ज्ञानी । मानमान्यता विद्वज्जनीं । ज्याची होती विशेष ॥ ९९ ॥ त्या शिवरगांवला । योगीराज फिरत आला । वाटे तयाचें धावयाला । फल त्या व्रजभूषणासी ॥ १०० ॥ चंद्रभागेच्या वाळवंटी । हा बैसला ज्ञानजेठी । समोर

नदीचिया कांठी । आले व्रजभूषण स्नानाला ॥ १ ॥ ती प्रभातीची वेळ पाही । प्रकाशिल्या दिशा दाही । कुक्कुटाचा आवाज येई । वरचेवरी ऐकावया ॥ २ ॥ चातक भारद्वाज पांखरें । जाऊं लागली अत्यादरें । भास्करासी सामोरे । पूर्व दिशा लक्षून ॥ ३ ॥ भास्कराचा उदय होतां । तम निमाला हां हां म्हणतां । जैसा समेस पंडित येतां । मूर्ख जाती उठोनी ॥ ४ ॥ ऐशा त्या सुप्रभातीं । वाळवंटी गुरुमूर्ति । बैसली होती निश्चिती । ब्रह्मानंदी डोलत ॥ ५ ॥ सर्वे शिष्य अपार । वसले होते मंडलाकार । ते शिष्य नव्हते किरणें थोर । त्या गजाननभास्कराची ॥ ६ ॥ तई व्रजभूषण तत्त्वतां । झाला सूर्यासीं अर्घ्य देतां । तो हा पुढें ज्ञानसविता । त्यानें पाहिला प्रत्यक्ष ॥ ७ ॥ सूर्याप्रमाणें सतेज कांति । आजानुबाहू निश्चिती । दृष्टि नासाग्राच्या वरती । स्थिर जयाची झाली असे ॥ ८ ॥ ऐसा पुरुष पाहतां क्षणी । व्रजभूषण हर्षला मनीं । संध्यासामान घेऊनी । आला धांवून जवळ त्यांच्या ॥ ९ ॥ अर्घ्य दिले पायांवरी । गजाननाच्या सत्वरीं । प्रदक्षिणाही अखेरी । त्यानें घातली तयाला ॥ ११० ॥ मित्राय नमः सूर्याय नमः । भानवे नमः खगाय नमः । ऐशी नांवें घेऊन पाहा । घातले द्वादश नमस्कार ॥ ११ ॥ शेवटीं आरती ओवाळिली । गजाननासी आदरें भली । न्यूनता ती नाहीं पडली । कशाची त्या ठायां ॥ १२ ॥ प्रार्थनापूर्वक नमस्कार । साष्टांग केला अखेर । मुखानें तें स्तवन थोर । महाराजांचें चाललें ॥ १३ ॥ माझ्या तपाचरणाचें । फळ आजि मिळालें साचें । दर्शन दिव्य पायांचें । आज झालों धन्य मी ॥ १४ ॥ नभोदरींच्या भास्कराला । देत होतों अर्घ्य भला । तों आज प्रत्यक्ष



पाहिला । ज्ञाननिधी योगेश्वर ॥ १५ ॥ (श्लोक) हे पूर्णब्रह्म जगचालक ज्ञानराशी । ऐसें युगायुगीं किती अवतार घेसी ? । झाल्यास दर्शन तुझें, भवरोगचिंता । नासे गजाननगुरो, मज पाव आतां ॥ १ ॥ ऐसी प्रार्थना करून । संपविलें त्यानें स्तवन । योगेश्वरें या आलिंगन । दृढ दिधलें त्या दोन्ही करें ॥ १६ ॥ माय जैसी लेंकराला । प्रेमें धरी पोटाला । तेवीं व्रजभूषणाला । धरिते झालें महाराज ॥ १७ ॥ मस्तकावरीं ठेविला कर । आशीर्वाद दिधला थोर । सर्वदा तुझा जयजयकार । होईल बाळा व्रजभूषणा ! ॥ १८ ॥ कर्ममार्ग सोडूं नको । विधी निरर्थक मानूं नको । मात्र त्यांत होऊं नको । लिप्त बाळा केव्हाही ॥ १९ ॥ आचरून कर्मफल । टाकितां भेटतो घननीळ । त्याच्या अंगीं न लागे मळ । या कर्मांचा केव्हींही ॥ १२० ॥ तूं आतां आपुल्या सदनीं । माझें बोल ठेवी मनीं । प्रत्यही माझें तुला ध्यानीं । होत जाईल दर्शन ॥ २१ ॥ ऐसें म्हणून प्रसाद दिला । श्रीफलाचा शोते भला । त्या व्रजभूषण पंडिताला । महाराज आले शेगांवीं ॥ २२ ॥ ह्या शेगांवाचें होतें नांव । पूर्वकालीं शिवगांव । अपभ्रंश लाधला ठाव । शेगांव या शब्दाला ॥ २३ ॥ तेंच हल्लीं प्रचलीत । आहे बुधहो वऱ्हाडांत । सतरा पाटील होते सत्य । ह्या एकाच ग्रामाला ॥ २४ ॥ महाराज शेगांवासी आले । परी न स्थिर राहिले । हमेशा ते भटकत फिरले । मनास येईल त्या स्थळा ॥ २५ ॥ आकोट अकोलें मलकापूर । नांवें सांगावीं कुठवर ? । चांदण्यांची न होणार । मोजदाद कोणाही ॥ २६ ॥ ज्येष्ठ आषाढ महिना गेला । पुढें श्रावण मास आला । उत्सव होता सुरू झाला । मारुतीच्या राउळांत ॥ २७ ॥ हें मारुतीचें मंदिर । शेगांवीं

भव्य साचार । पाटील मंडळी थोर थोर । होती या भक्त देवाची ॥ २८ ॥ पेंढीलागीं जैसा आळा । तेवीं पाटील गांवाला । जें जें कांहीं आवडे त्याला । तिकडे लोकांचा कल होई ॥ २९ ॥ चाले उत्सव महिनाभर । अभिषेक पोथी कीर्तन गजर । अन्नदानाशीं येई पूर । अवघे लोक तृप्त होती ॥ १३० ॥ या उत्सवाचा पुढारी । खंडू पाटील निर्धारी । जो गांवचा कारभारी । होता उदार मनाचा ॥ ३१ ॥ श्रोते हे पाटीलपण । आहे वाघाचें पांघरुण । तें जो घेई त्याला जन । भिऊं लागती सहजची ॥ ३२ ॥ गांव करी तें राव न करी । ऐशी मराठी भितरीं । म्हण एक आहे साजरी । ती यथातथ्य असे ॥ ३३ ॥ त्या मारुती मंदिरासी । आले गजानन पुण्यराशी । श्रावणाच्या आरंभासी । उत्सव श्रीचा पाहावया ॥ ३४ ॥ बोलले बंकटलालासी । मी आतां या मंदिरासी । राहीन जाण अहर्निशीं । त्याचा शोक करूं नको ॥ ३५ ॥ गोसावी संन्यासी फकीर । यांना कायमचें राहण्या घर । योग्य नाहीं साचार । तुम्हां प्रापंचिकाचें ॥ ३६ ॥ मी परमहंस संन्यासी । आतां राहतों मंदिरासी । तूं बोलाविशी ज्या दिवशीं । तेवढ्यापुरता येईन तेथ ॥ ३७ ॥ हें अंतरींचें गुह्य तुला । कथन केलें बंकटलाला । स्वामी शंकराचार्याला । भ्रमण करणें भाग आलें ॥ ३८ ॥ गोसावी मार्च्छिंद्र जालंदर । हेही राहिले निरंतर । प्रापंचिकांचें वगळून घर । काननामाजीं वृक्षातळीं ॥ ३९ ॥ छत्रपती राजा शिवाजी । जो रणबहादूर वीरगाजी । ज्यानें हिंदूंची राखिली बाजी । दंडून दुष्ट यवनांना ॥ १४० ॥ त्या शिवाजीचें प्रेम फार । होतें रामदासावर । परी सज्जनगडावर । स्वामी होते वस्तीला ॥ ४१ ॥



याचा विचार करावा । हट्ट मुळीं ना धरावा । माझ्या म्हणण्यास मान द्यावा । यांत कल्याण तुझें असें ॥ ४२ ॥ निरुपाय होऊन अखेर । देता झाला रुकार । तो बंकटलाल सावकार । गजाननाचें म्हणण्याला ॥ ४३ ॥ मंदिरीं स्वामी समर्थ येतां । हर्ष झाला समस्तां । भास्कर पाटील शुश्रुषेकरितां । जवळ राही निरंतर ॥ ४४ ॥ हा दासगणूविरचित । श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । मुमुक्षूला दावो पथ । संतचरण सेवेचा ॥ १४५ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति षष्ठोऽध्यायः समाप्तः ॥

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य षष्ठोऽध्यायः समाप्तः ॥







श्रीगजानन महाराजांस मुले उसांनी मारीत आहेत.

श्रीगणेशाय नमः ॥ जय जयाजी राघवा रामा । जय जयाजी मेघःश्यामा । संत जनांच्या विश्रामा । सीतापते दाशरथे ॥ १ ॥ तुझ्या कृपेनें वानर । बलिष्ठ झाले भूमीवर । ज्यांनी रावणाचा चकाचूर । केला देवा लंकेवरी ॥ २ ॥ तुझी कृपा झाल्या पाही । तो सर्वदा होतो विजयी । जें जें इच्छील तें तें नेई । काम आपलें तडीला ॥ ३ ॥ भूपतीचा वशीला । ज्यातें देवा ! लाधला । तो वंद्य होतो दिवाणाला । नीच कितीही असला जरी ॥ ४ ॥ ऐशा अमोघ कृपेला । होईन कां मी योग्य मला । याचा जों मी विचार केला । तों ऐसें आलें कळोन ॥ ५ ॥ नाहीं ज्ञान, नाहीं भक्ति । खरी-खुरी हे श्रीपती । ऐसी आहे माझी स्थिति । शोचनीय पांडुरंगा ॥ ६ ॥ मन सदा आशाळभूत । ते ना कदा स्थिर होत । नाना विकल्प मनांत । येऊं लागती वरच्यावरी ॥ ७ ॥ मग ऐशा पातक्याला । केंवि लाधावा वशीला । तुझा सांग जगत्पाला । हें व्यावहारिक म्हणणें असें ॥ ८ ॥ तुला आवडी पातक्याची । मनापासून आहे साची । ऐसी साक्ष पुराणाची । आहे की दीनबंधो ॥ ९ ॥ पुण्यवानाचें तारण । केल्या न कांहीं नवल जाण । जो पातक्यालागून । उद्धरीतसे तोच मोठा ॥ १० ॥ या जगतीं तुझ्याहून । मोठा नाहीं कोणी आन । देवा मम पातकालागून । किमपि आतां पाहूं नको ॥ ११ ॥ रक्षी आपला मोठेपणा । मज सांभाळी नारायणा । दासगणू शरण चरणा । आतां उपेक्षा करूं नका ॥ १२ ॥ हा मारुतीचा उत्सव । करीत होता अवघा गांव । याचा पुढारी खंडेराव । पाटील गणेशकुळीचा ॥ १३ ॥ हें पाटीलघराणें जाण । आहे अति पुरातन । घरचे धन कनकसंपन्न । पसारा थोर शेतीचा ॥ १४ ॥ पूर्वीपासून यांच्या घरीं । संत-सेवा होती खरी ।

आली माग्यें जमेदारी । मग काय विचारिता ? ॥ १५ ॥ महादजी पाटलास । दोन मुलगे
औरस । थोरल्या त्या पुत्रास । नांव असे कडताजी ॥ १६ ॥ कुकाजी तो धाकटा । पंढरीचा
भक्त निका । गोम्प्रजीचा उपदेश देखा । होता या घराण्यात ॥ १७ ॥ पाटील कडताजी कारण ।
मुलगे होते सहाजण । कुकाजी नुसता भाग्यवान । पुत्र नव्हता त्याचे कुशी ॥ १८ ॥ कडताजी
पावतां मरण । साही मुलांचें संगोपन । कुकाजीनें केलें जाण । जन्मदात्या बापापरी ॥ १९ ॥
कुकाजीच्या अमदानींत । भरभराट झाली बहुत । अष्टसिद्धी सदनांत । वाटे नांदूं लागल्या ॥ २० ॥
पाटील कुकाजीनंतर । खंडू करी कारभार । याच्या पुढें साचार । कांहीं न चाले कोणाचे ॥ २१ ॥
या खंडू पाटलाप्रती । पांच बंधू निश्चिती । गणपती नारायण मारुती । हरी आणि कृष्णाजी ॥ २२ ॥
आधींच पाटील जमेदार । सत्ता हातीं साचार । पैशाचा तो निघे धूर । जयाचिया सदनामध्यें
॥ २३ ॥ बंधु सारे तालीम करिती । दांडपट्टे खेळती । कुस्तीचा तो षोक अती । होता हरी
पाटलास ॥ २४ ॥ उत्सव नांवास मारुतीचा । तरी जयजयकार पाटलाचा । म्हणती तो शब्द
त्यांचा । झेलणें भाग रयतेला ॥ २५ ॥ नेहमी कटकटी मारामाऱ्या । शेगांवांत होती खऱ्या ।
पाटील एक्या मापी साऱ्या । लोकांप्रती मोजितसे ॥ २६ ॥ हा सज्जन साधुसंत । हें न त्यांच्या
मनीं येत । वाटेल त्या बोलती सत्य । अद्वातद्वा यथामती ॥ २७ ॥ असो पाटीलबंधूंनी । राउळांत
येऊनी । महाराजातें हेटाळणी । करण्याचें तें सुरूं केलें ॥ २८ ॥ कोणी म्हणावें पिश्या गण्या ।
खातोस कां ताककण्या ? । ऐशा गोष्टी अति उण्या । त्यांनी कराव्या समर्थांसी ॥ २९ ॥



कोणी म्हणावें खेळ कुस्ती । आम्हांसवे निश्चिती । तुला लोक बोलती । योगयोगेश्वर म्हणोन
॥ ३० ॥ त्याचे दाव प्रत्यंतर । ना तरी आम्ही देऊं मार । याचा करी विचार । बऱ्या बोलानें
येघवां ॥ ३१ ॥ त्यांचें बोल ऐकावें । समर्थांनी न उत्तर द्यावें । अवघें हंसण्यावरी न्यावें । कोप
न धरावा यत्किंचित ॥ ३२ ॥ ऐसा उर्मट प्रकार । मंदिरीं चालें निरंतर । म्हणून पाटील भास्कर ।
समर्थांसी ऐसें वदला ॥ ३३ ॥ नका महाराज येथें राहूं । चला अकोली ग्रामा जाऊं । हीं
पाटील पोरें माजली बहु । यांचा नको संबंध ॥ ३४ ॥ हे शक्तीनें माजलें । लक्ष्मीनें धुंद झालें ।
सत्तेपुढें कांहीं न चाले । येथें यांची पाटीलकी ॥ ३५ ॥ गजानन बोललें त्यावरी । भास्करा थोडा
दम धरी । ही पाटील मंडळी सारी । आहेत माझे परम भक्त ॥ ३६ ॥ मात्र विनयाप्रती थारा ।
यांच्यापाशीं नाहीं जरा । शोधुनि पहा अंतरा । त्यांच्या म्हणजे कळेल तुज ॥ ३७ ॥ हीं पोरें
पाटलाचीं । माझी लेकरें आहेत साचीं । कृपा आहे संतांची । यांच्या कुळावर भास्करा ॥ ३८ ॥
जमेदारा उर्मटपण । हेंच आहे भूषण । काय वाघाचें तें वजन । असावें सांग गाईपरी ? ॥ ३९ ॥
तलवारीला मऊपणा । मुळीं उपयोगी नाहीं जाणा । अग्नीनें तो थंडपणा । सांग धरावा कवण्या
रीती ? ॥ ४० ॥ गेल्यावरी कांहीं काळ । हा उर्मटपणा जाईल । पावसाळ्याचे गढूळ जल ।
हिवाळ्यांत निवळ होई ॥ ४१ ॥ एके दिवशीं पाटील हरी । आला मारुतीच्या मंदिरीं । महाराजांला
धरून करीं । म्हणे कुस्ती करी माझ्यासवें ॥ ४२ ॥ तुला कुस्तीत करीन चीत । चाल जाऊं
तालमींत । उगें न बैसे ऐसें म्हणत । गण गण गणांत बोते ॥४३॥ तुझे प्रस्थ माजलें बहु । तें खरें खोटें

आज पाहूं । मला पाडसी तरी देऊं । तुला मोठें बक्षीस ॥ ४४ ॥ तें समर्था मानवलें । दोघे तालमीमध्यें गेले । समर्थांनीं कौतुक केलें । तें आतां परियेसा ॥ ४५ ॥ खाली बसले गजानन । उठीव आतां मजलागून । असलास जरी पैलवान । तरी साच करशील हें ॥ ४६ ॥ हरी पाटील उठवावया । लागला यत्न करावया । परी ते अवघे गेले वायां । हालेनात समर्थ मुळीं ॥ ४७ ॥ घामाघूम तनु झाली । शक्तीची ती कमाल केली । पेंच झाले निर्बळी । समर्थांसी झुंजतां ॥ ४८ ॥ हरी म्हणे मनांत । हा केवढा सशक्त ! । अचल ऐसा पर्वत । याच्यापुढें येईल उणा ॥ ४९ ॥ हा किडकिडीत दिसतो जरी । शक्ति याची गजापरी । खोड्या आमच्या नानापरी । आजवरी यानें सहन केल्या ॥ ५० ॥ त्याचें हेंच कारण । हा गजापरी बलवान । आम्हीं जंबुकासमान । म्हणून नाहीं रागावला ॥ ५१ ॥ जंबुकाच्या चेष्टेला । गजपती न मानी भला । श्वानाचिया भुंकण्याला । व्याघ्र दे ना किंमत ॥ ५२ ॥ कांहीं असो याच्या पायीं । आतां ठेवणें आली डोई । आजपर्यंत मी नाहीं । कवणासीही नमन केलें ॥ ५३ ॥ समर्थ म्हणाले हरीला । आतां बक्षिस द्या आम्हांला । ना तरी चीत मजला । तुवां करावें कुस्तींत ॥ ५४ ॥ कुस्ती हा मर्दानी । षोक श्रेष्ठ सर्वांहुनी । कृष्ण बलरामें बालपणीं । ऐशाच कुस्त्या केल्या रे ! ॥ ५५ ॥ मुष्टिक आणि चाणूर । मल्लविद्येनें परमेश्वर । वधिता झाला साचार । जे देहरक्षक कंसाचे ॥ ५६ ॥ पहिली संपत्ति शरीर । दुसरें तें घरदार । तिसरीचा तो प्रकार । आहे धनमानाचा ॥ ५७ ॥ तुझ्याप्रमाणें पूतनारी । पाटील होता यमुनातीरीं । गोकुळींचीं पोरें सारीं । त्यानें केलीं सशक्त ॥ ५८ ॥ तैसें तुवां करावें । शरीरबला वाढवावें । ना तरी हें



सोडावें । पाटील नांव आपुलें ॥ ५९ ॥ हेंच बक्षीस द्यावें मज । ना तरी कुस्ती करी आज । येणें रिती उतरला माज । समर्थांनीं हरीचा ॥ ६० ॥ हरी म्हणे समर्थांस । आपुली कृपा असल्यास । शेगांवच्या लेंकरांस । सशक्त करितां येईल कीं ॥ ६१ ॥ ऐसें धूर्तपणाचें बोलणें । केलें पाटील हरीनें । जे मुळांत असती शहाणे । त्यांना शाळा नको कीं ॥ ६२ ॥ असो त्या दिवसापासून । हरीनें दिलें सोडून । अद्वातद्वा भाषण । करणें पुण्यपुरुषाशीं ॥ ६३ ॥ ही पाहोनि त्याची कृति । इतर बंधु बोलती । हरी तूं त्या जोगड्याप्रति । कां भितोसी कळेना ॥ ६४ ॥ आपण पाटलाचे कुमार । या गांवींचे जमेदार । तें तूंच कां रे ठेविशी शिर । पदीं त्या नागव्याच्या ॥ ६५ ॥ त्या पिशाचें थोतांड । गांवीं माजलें उदंड । त्याचा पाहिजे काढिला दांड । लोकां सावध करावया ॥ ६६ ॥ ऐसें न जरी आपण केलें । तरी लोक अवघे होतील खुळे । पाटलाचें कर्तव्य भलें । गांवा हुशार करण्याचें ॥ ६७ ॥ मैंद साधूचे वेष घेती । वेड्यावांकड्या कृत्या करिती । बाया बापड्या भोंदिती । याचा करी विचार ॥ ६८ ॥ सोन्या कस लाविल्याविना । न कळे रे सोनेपणा । तुकारामाचा शांतपणा । कळून आला ऊसानें ॥ ६९ ॥ ज्ञानेश तेव्हां साधु कळला । जेव्हां रेडा बोलला । परीक्षेविण कवणाला । अस्थानीं मान देऊं नये ॥ ७० ॥ चाल परीक्षा तयाची । आज आपण करूं साची । मोळी घेऊन ऊंसाची । मंदिरात पातलें ॥ ७१ ॥ हरी न कांहीं बोलला । इतरांनी प्रश्न केला । अरे पिशा या ऊंसाला । खातोस कां तूं सांग हें.! ॥ ७२ ॥ जरी ऊंस खाण्याची । इच्छा असेल तुला साची । तरी एक अट आमुची । आहे ती तूं मान्य करी ॥ ७३ ॥

आम्ही ऊंसाचे करूं प्रहार । तुझ्या येधवां अंगावर । त्याचे वळ ना उठळे जर । तरीच योगी मानूं तुला ॥ ७४ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । महाराज कांहीं न बोलले । लेंकरांचे बालिश चाळे । मनी न आणी सुज्ञ कदा ॥ ७५ ॥ मारुती म्हणाला त्यावर । अरे हा भ्याला साचार । ऊसाचा तो खाण्या मार । हा कांहीं तयार नसे ॥ ७६ ॥ मग म्हणाला गणपती । अरे मौन हीच संमती । त्यानें दिधली आपणाप्रति । आतां काय पाहतां ! ॥ ७७ ॥ तें दोघां तिघां मानवलें । ऊंस करी घेतले । समर्थांसी मारण्या भले । आले चढून अंगावर ॥ ७८ ॥ ते पाहतां नारीनर । मंदिरी जे होते इतर । ते पळूं लागले भराभर । भास्कर तेवढा जवळ असे ॥ ७९ ॥ भास्कर म्हणे पोरांसी । नका मारूं समर्थांसी । या ऊंसानें आज दिवशीं । हें कांहीं बरें नव्हे ॥ ८० ॥ तुमचा पाटील-कुळांत । जन्म झाला आहे सत्य । तुमचें असावें दयाभूत । अंतःकरण दीनांविषयीं ॥ ८१ ॥ हें महासाधु तुम्हांसी । जरी न वाटतील मानसी । तरी हीन दीन लेखून याशी । द्यावें सोडून हेंच बरें ॥ ८२ ॥ अरे शूर जे का शिकारी । ते चाल करिती वाघावरी । उगीच बंदूक घेऊनि करी । न मारिती नाकतोडा ॥ ८३ ॥ मारुतीनें जाळिली । रावणाची लंका भली । उगीच नाहीं चाल केली । झोंपड्या पाहून दुबळ्यांच्या ॥ ८४ ॥ यावरी म्हणती पोरें । तुमचें भाषण ऐकिलें सारें । गांवींचें लोक अत्यादरें । योगयोगेश्वर म्हणती या ॥ ८५ ॥ म्हणून त्याचा पहाया योग । येथें आलों आम्ही चांग । यांत न घ्यावा तुम्ही भाग । पहा मौज दुरूनी ॥ ८६ ॥ ऊंस घेऊन हातांत । मारूं लागले समर्थांप्रत । जैशा का

झोडितात । ओंब्या शेती कृषीवल ॥ ८७ ॥ परि न महाराज डगमगले । मुलां पाहून हंसत बसले । कोठेही ना उमटले । वळ त्यांच्या अंगावर ॥ ८८ ॥ तें पाहतां पोरें भ्याली । चरणीं त्यांच्या लागली । म्हणती खराच आहे बली । हा योगयोगेश्वर ॥८९॥ महाराज म्हणती पोरांला । मुलांनो तुमच्या कराला । असेल अति त्रास झाला । मारण्यानें मजलागीं ॥ ९० ॥ त्या श्रमाचा करण्या नाश । काढून देतो इक्षुरस । तुम्हांला प्यावयास । या बसा माझ्यापुढे ॥ ९१ ॥ ऐसें म्हणून घेतला । एक ऊंस करीं भला । हातानेंच पिळून त्याला । रस काढिला पात्रामध्यें ॥ ९२ ॥ त्या ऊंसाची अवघी मोळी । समर्थांनीं पहा पिळिली । आणि प्यायाकारणें दिली । रस नव्हाळी पोरांस ॥ ९३ ॥ श्रीगजानन पुण्य पुरुष । चरकावांचून काढिला रस । तें पाहतां बालकांस । अति आनंद जाहला ॥ ९४ ॥ लोक म्हणती ही योगशक्ति । दंतकथा मुळीं नसती । योगे जी का प्राप्त होती । त्या शक्तीला च्युति नसे ॥ ९५ ॥ पौष्टिक पदार्थें शक्ति येते । परी न ऐसी कायम टिकते । सशक्त आपुल्या राष्ट्रातें । करणें असल्या योग शिका ॥ ९६ ॥ हेच तत्त्व सुचवावयासी । त्या पाटील अर्भकांशी । करें काढून रसाशीं । दाविते झाले श्रोते हो ॥ ९७ ॥ समर्थांसी वंदून । गेलीं पोरें निघून । खंडू पाटलाकारण । वर्तमान श्रुत केले ॥ ९८ ॥ दादा आपुल्या गांवांत । गजानन ईश्वर साक्षात् । त्याचा आज आम्हांप्रत । आला आहे प्रत्यय ॥ ९९ ॥ ऐसें म्हणून कथिली सारी । हकीकत त्याला खरी । ती ऐकतां अंतरी । खंडू पाटील चकित झाला ॥ १०० ॥ मग तोही दर्शनाला । समर्थांच्या येऊं लागला । परी मार्दव वाणीला । मुळीं नव्हतें यत्किंचित् ॥ १ ॥ गण्या, गजा ऐसें

म्हणे। पाटील समर्थांकारणें । अरे तुरे हें बोलणें । होतें दोन ठिकाणीं ॥ २ ॥ प्रेम आत्यंतिक जें काई । तेथें ऐसें घडून येई । आई लेंकरांमाजीं होई । भाषण अरेतुरेचें ॥ ३ ॥ हा एक प्रकार झाला । आता दुसरा राहिला । तोही सांगतों ऐका भला । सावधान चित्तानें ॥ ४ ॥ नोकर चाकर हीन दीन । यांच्या सवें जें भाषण । करिती संभावित जन । तेंही एकेरी स्वरूपाचें ॥ ५ ॥ अरे तुरे म्हणण्याची । संवय पाटला पडे साची । कां कीं रयत गांवचीं । लेकरें त्याचीं निःसंशय ॥ ६ ॥ श्रोते याच संवयीनें । खंडू पाटील गण्या म्हणे । श्रीसमर्थांकारणें । कांहीं न दुसरें कारण ॥ ७ ॥ गण्या गण्या म्हणे वाणी । परी प्रेम उपजे अंतःकरणीं । पहा नारळालागूनी । वर करवंटी खोबरें आंत ॥ ८ ॥ याच न्यायें तयाचा । परिपाठ होता बोलण्याचा । वृधापकाळ कुकाजीचा । झाला म्हणून कारभार करी ॥ ९ ॥ कुकाजी तो एके दिवशीं । बोलतां झाला खंडूशीं । तूं जातोस प्रतिदिवशीं । महाराजांच्या दर्शना ॥ ११० ॥ सांगतोस मला साक्षात्कारी । गजानन एक भूमीवरी । मग कां रे तुझी वैखरी । मुग्ध होते त्याच्या पुढें ॥ ११ ॥ तुला नाहीं पोरबाळ । माझा झाला वृद्धापकाळ । नातवंडाचे बोल खेळ । पाहूं दे मज डोळ्यानें ॥ १२ ॥ आज विनंती करी त्यांना । स्वामी समर्थ गजानना । म्हणावें त्या करून करुणा । पोर एखादें द्या मज ॥ १३ ॥ तो खरा साधु असल्या सत्य । पुरतील तुझे मनोरथ । आणि माझाही अवघा हेत । तडीस जाईल त्यायोगें ॥ १४ ॥ साधु पुरुषा अशक्य कांहीं । जगत्रयीं या उरलें नाहीं । संतलाभाचा करून घेई । कांहीं आपणां उपयोग ॥ १५ ॥ तें खंडूतें मानवलें । एकें दिवशीं बोलणें केलें । मारुतीच्या मंदिरीं भलें । तें ऐका येणें रीतीं ॥ १६ ॥ अरे गण्या माझा चुलता । वृद्ध झाला आहे आतां । इच्छा उपजली त्याच्या चित्ता । नातवंड तें पाहण्याची ॥ १७ ॥ तुला लोक साधु म्हणती । दर्शन केल्या तुजप्रती । इच्छा मनींच्या पूर्ण होती । ऐसें लोक सांगतात ॥ १८ ॥ त्याचें दावीं प्रत्यंतर । उगा नको करूं उशीर । तुझ्या पायीं ज्याचें शिर । तो कां रहावा निपुत्रिक ? ॥ १९ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । महाराज त्याशीं बोलले । आज हें उत्तम घडून आलें । त्वां याचना केली आम्हां ॥ १२० ॥ सत्ता, धन तुझ्या हातीं । तूं प्रयत्नवादी असशी निगुती । मग विनंती आम्हांप्रती । कां करितोस कळेना ? ॥ २१ ॥ धन आणि बलापुढें । अवघेंच म्हणशी बापुडें । मग कां रे हें न घडे । साह्यें धनबलाच्या ॥ २२ ॥ तुझी भव्य आहे शेतीं । गिरण्या दुकानें पेढ्या अती । तुझे न कोणी मोडती । जन शब्द या वऱ्हाडांत ॥ २३ ॥ मग त्या ब्रह्मदेवाला । कां न आज्ञा करिशी भला ? आपणां पुत्र द्यावयाला । तेंच कोडें पडलें मज ॥२४॥ खंडू करी भाषण । ही गोष्ट ना यत्नाधीन । पिकें पाण्यापासून । येतीं जरी जगामध्यें ॥ २५ ॥ तरी पाडणें पाणी । मानवाच्या न करी जाणी । दुष्काळांत जमिनी । पडती उताण्या रुपात हें ॥२६॥ मात्र पाणी पडल्यावर । कर्तृत्व आपुलें चालवी नर । तैसाच हाही प्रकार । तेथें न गती मानवाची ॥ २७ ॥ खंडू पाटील ऐसें बोलतां । हंसू आले समर्था । तूं केलीस याचना आतां । मजकारणें पोराची ॥ २८ ॥ याचना म्हणजे मागणें भीक । हें तूं आज केलें देख । तुला होईल बालक । भिक्या नांव ठेव त्याचें ॥ २९ ॥ पुत्र देणें माझ्या करीं । सर्वतोपरी नाहीं जरी । परी मी विनंती

करीन खरी । तुझ्यासाठीं परमेश्वरा ॥ १३० ॥ तो ऐकले माझी मीड । त्याला न हें कांहीं जड । तूं घरचा आहेस धड । रस आंब्याचा द्विजां घाली ॥ ३१ ॥ हे मम मानीं प्रमाण वचन । पुत्र होईल तुजकारण । आम्ररसाचे भोजन । दरसाल घाली ब्राह्मणां ॥ ३२ ॥ हें खंडूनें ऐकलें । घरीं येऊन सांगितलें । कुकाजीसी निवेदिले । मंदिरींचे वर्तमान ॥ ३३ ॥ हे ऐकतां कुकाजीस । आनंद झाला बहुवस । तों कांहीं लोटतां दिवस । समर्थ वचन झालें खरें ॥ ३४ ॥ कांता खंडू पाटलाची । गंगाबाई नांवाची । गर्भिणी झाली साची । नवमास पूर्ण झाले ॥ ३५ ॥ तिजलागीं पुत्र झाला । खंडू पाटील आनंदला । कुकाजीच्या हर्षाला । पारावर कांहीं नसे ॥ ३६ ॥ त्यानें धर्म केला बहु । गरीबां दिले गूळ गहूं । पेढे-बर्फीचा दिला खाऊं । गांवांतील अर्भकांना ॥ ३७ ॥ थाटांत झालें बारसें । भिकूं नांव ठेविलेसें । पुढें बाळ वाढला असे । शुक्लपक्षीच्या इंदूपरी ॥ ३८ ॥ आम्ररसाचें भोजन । दिलें ब्राह्मणांकारण । तो संप्रदाय अजून । शेगांवात चालत असे ॥ ३९ ॥ पुण्यपुरुषाची वैखरी । कोठून होईल असत्य तरी । पाटलाच्या ओसरीवरी । बाळ रांगूं लागला ॥ १४० ॥ हा बोलबाला पाटलाचा । देशमुखां पटला न साचा । शेगांव हा दुफळीचा । गांव पहिल्यापासून ॥ ४१ ॥ एक फळी देशमुखांची । एक फळी पाटलांची । अंतःकरणें एकमेकांची । मुळीं होतीं अशुद्ध ॥ ४२ ॥ प्रत्येक आपुल्या डावांत । एकमेकांचा करण्या घात । सदा इच्छिती मनांत । लेश नसे प्रेमाचा ॥ ४३ ॥ शास्त्री दोन मंत्री दोन । शस्त्री दोन तंत्री दोन । एकमेकांपुढें श्वान । येतां गुरगुर रोकडी ॥ ४४ ॥ तैसें झालें शेगांवांत । पाटील आणि देशमुखांत ।



छत्तिसाचा आंकडा सत्य । झाला न होईल त्रेसष्टाचा ॥ ४५ ॥ पुढें गोष्ट झाली ऐशी । कुकाजी झाले स्वर्गवासी । पाहूनिया नातवंडासी । भीमातटीं पंढरींत ॥ ४६ ॥ तेणें खंडूचें उद्विग्न मन । गेलें सहज होऊन । तो म्हणे छत्र पूर्ण । माझें आज ढासळलें ॥ ४७ ॥ ज्या चुलत्याच्या जिवावरी । मी निर्भय होतो भूमीवरी । तो आधार माझा श्रीहरी । कां रे नेलास काढून ? ॥ ४८ ॥ ऐशी संधि पाहून । बालंट आणाया कारण । पाटलावरी सबड पूर्ण । मिळाली देशमुखमंडळीला ॥ ४९ ॥ तो वृत्तान्त अष्टमांत । सांगेन श्रोते तुम्हांप्रत । ही जमेदारी खाण सत्य । आहे प्रत्यक्ष द्वेषाची ॥ १५० ॥ हा दासगणूविरचित । श्रीगजाननविजयनामें ग्रंथ । परिसा श्रोते सावचित्त । कुतर्कातें सोडोनिया ॥ १५१ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति सप्तमोऽध्यायः समाप्तः ॥

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य सप्तमोऽध्यायः समाप्तः ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय ८.



श्रीगजानन महाराजांस गोसावी भेटण्यास आले आहेत.

श्रीगणेशाय नमः ॥ हे वसुदेवदेकीनंदना । हे गोपगोपीमनरंजना । हे दुष्टदानवमर्दना । श्रीहरी पाव मातें ॥ १ ॥ तुझ्या प्राप्तीचें साधन । कर्मादिकांचें अनुष्ठान । परा भक्तीचें सेवन । करण्या आहे अपात्र मी ॥ २ ॥ तुझी ज्ञानदात्री शास्त्रें सारी । गीर्वाण भाषेंभीतरीं । त्यांचें सांग करूं हरी । सेवन तें कवण्या रीतीं ॥ ३ ॥ गीर्वाणाचा नसे गंध । त्यांतून माझी मती मंद । कमलांतील मकरंद । बेडुकाला मिळतो कसा ? ॥ ४ ॥ अन्नदानें तुझी प्राप्ति । जरी करून घेऊं श्रीपती । तरी धनाचा अभाव निश्चिती । दारिद्र्य पदरी बांधिलें त्वां ॥ ५ ॥ जरी करूं मी तीर्थयात्रा । तरी सामर्थ्य नाहीं गात्रां । तशांतही अंधत्व आतां । आलें आहे दृष्टीतें ॥ ६ ॥ ऐसा सर्व बाजूंनीं । मी हीनदीन चक्रपाणी । दरिद्र्याचे मनींच्या मनीं । जाती जिरोनी मनोरथ ॥ ७ ॥ हें व्यावहारिक दृष्टया खरें जरी । परी तुझी कृपा झाल्यावरी । स्वानंदाच्या सागरीं । पोहत राहे अहोरात्र ॥ ८ ॥ तुझ्या कृपेचें महिमान । आगळे आहे सर्वांहून । घनाच्या पाण्यालागून । दान देण्याची गरज नसें ॥ ९ ॥ मेघांनीं आणिल्या मनांत । तळी विहिरी भरतात । निव्वळ खडकास फुटतात । पाट पाण्याचे पांडुरंगा ! ॥ १० ॥ ऐशा तंव कृपेचा । दासगणू हा भुकेला साचा । घास एखादा तरी त्याचा । घाल माझ्या मुखांत ॥ ११ ॥ तेणें मी तृप्त होईन । अवघ्या सुखातें पावेन । अमृताचा लाभतां कण । रोग सारे दूर होती ॥ १२ ॥ असो मागील अध्यायीं । देशमुख पाटलाठायीं । मुक्कामातें दुफळीबाई । येऊन बैसली हें ऐकिलें ॥ १३ ॥ जेथ जेथ ही नांदे दुफळी । तेथ तेथ ही करी होळी । अवघ्या सुखाची रांगोळी । इच्या पायीं होतसे ॥ १४ ॥ क्षयरोग तो शरीराला । वा

दुष्काळी रोग समाजाला । नेतसे यमसदनाला । अप्रत्न पडती छुळे देख ॥ १५ ॥ असो तव्ह्याचिया कांठावर । देशमुखाचा एक महार । करूं लागला चरचर । या खंडू पाटलापुढे ॥ १६ ॥ पाटील गांवीचा अधिकारी । पाटील गांवीची पांढरी । कांहीं कामावरून खरी । कुरबुर झाली उभयतांत ॥ १७ ॥ तो असे मन्या महार । देशमुखाचा ज्याला जोर । तो बोलला उणे उत्तर । खंडू पाटला-कारणें ॥ १८ ॥ पाटील वदला त्यावरी । तुझी रीत ही नाही बरी । गरीबानें पायरी । आपली कधीं सोडूं नये ॥ १९ ॥ उणीं उत्तरें बोलण्याचा । अधिकार आहे देशमुखाचा । तुझ्यासारख्या नकट्याचा । नाहीं हें आण मनीं ॥ २० ॥ तरी महार ऐकेना । करूं लागला चेष्टा नाना । त्याच्या ऐकोनी भाषणा । पाटील खवळला मानसीं ॥ २१ ॥ बाचाबाचीचे कारण । । होतें अति क्षुल्लक जाण । कागद ठाण्यालागून । पाठवणें होते पाटलाला ॥ २२ ॥ तो टप्पा न्यावयासीं । सांगितलें होतें महारासी । कीं तूं असाच जा अकोल्यासी । तहशिलींत टप्पा द्याया हा ॥ २३ ॥ तें ऐकोनी वदला महार । मी न हा टप्पा नेणार । देशमुखाच्या आश्रितावर । तुमचा डोळा हमेशा ॥ २४ ॥ कांहीं असो आज दिनीं । मी टप्पा न जाय घेवोनी । तुझ्या हुकुमालागूनी । बोंबा शिमग्याच्या समजतो मी ॥ २५ ॥ ऐसें वदनीं बोलला । हावभावही तैसा केला । मूठ वळुनी हात नेला । त्यानें आपुल्या मुखापुढें ॥ २६ ॥ ती त्याची पाहूनी कृती । खंडू पाटील कोपला चित्तीं । मरीव वेळूची काठी होती । पाटलाच्या हातांत ॥ २७ ॥ त्याच काठीचा केला प्रहार । महाराचिया हातावर । पाटील मूळचा जोरदार । त्यानें रागें केला प्रहार हा ॥ २८ ॥ त्या प्रहारें करूनी ।



हात गेला मोडूनी । महार बेशुद्ध होवोनी । पडता झाला भूमीवर ॥ २९ ॥ पाटील दुसऱ्या महाराला । गेले टप्पा द्यावयाला । तों इकडे वृत्तान्त कैसा झाला । तो आतां सांगतों ॥ ३० ॥ तो महार त्याच्या आप्तांनीं । नेला उचलून देशमुखसदनीं । मोडला हात हें पाहूनि । देशमुख ते संतोषले ॥ ३१ ॥ वा ! वा ! छान गोष्ट झाली । आपणां कुरापत काढण्या भली । ही अनायासें संधी आली । ती उपयोगी न दवडणें ॥ ३२ ॥ त्यांनीं त्या महारासीं । तात्काळ नेलें कचेरीसीं । समजाविलें अधिकाऱ्यासी । खोटेंनाटें विबुध हो ॥ ३३ ॥ कोठेंही दोन पक्षांत । वांकडे आल्या यत्किंचित् । कांड्यांचेच होतात । नायटे ते अवलोका ॥ ३४ ॥ फिर्याद त्या महाराची । पुस्तकांत नोंदली साची । आज्ञा झाली अधिकाऱ्याची । पाटील पकडून आणावया ॥ ३५ ॥ शेगांवी झाली पुकार । उद्यां आहे पडणार । पाटलाच्या पदीं थोर । बेडी करीं हातकड्या ॥ ३६ ॥ तें खंडू पाटला समजलें । धाबें त्याचें दणाणलें । तोंडचें पाणी पळालें । झाला अति चिंतातुर ॥ ३७ ॥ ज्या शेगांवीं मी वाघापरी । वागत होतो आजवरी । तेथेंच कां हा श्रीहरी । प्रसंग आणिला बेडीचा ॥ ३८ ॥ अब्रुदारास अपमान । वाटे मरणाहून मरण । बंधु गेले घाबरून । कांहीं विचार सुचेना ॥ ३९ ॥ खंडू हताश होऊन बसला । तों एक विचार सुचला त्याला । श्रीगजानन महाराजांला । सांकडें हें घालावें ॥ ४० ॥ त्या साधूचे वांचून । या संकटाचें निरसन । करणारा न कोणी आन । राहिला या वऱ्हाडीं ॥ ४१ ॥ लौकिकी यत्न करण्याला । बंधु गेले अकोल्याला । खंडू पाटील नीट आला । समर्थांकडे रात्रीस ॥ ४२ ॥ येतांच केला नमस्कार । शिर ठेविलें

पायांवर । महाराज आला कठीण फार । प्रसंग तो माझ्यावरी ॥ ४३ ॥ सरकारी कामानिमित्त । मी एका महाराप्रत । तव्यापाशीं ताडिले सत्य । करांतील काठीनें ॥ ४४ ॥ त्याचा ऐसा परिणाम झाला । कांद्याचा नायटा केला । देशमुख मंडळींनीं भला । माझें अहित करण्यास ॥ ४५ ॥ त्यानिमित्त कैद मला । होण्याचा उद्यां प्रसंग आला । समर्था माझ्या इज्जतीला । तुजवीण कोण रक्षील ? ॥ ४६ ॥ उद्यां येतील राजदूत । मला येथूनि नेण्याप्रत । बेडी ठोकोनि पायांत । ऐसें आज ऐकिलें ॥ ४७ ॥ त्यापेक्षा गुरुवरा । गळा माझा येथेंचि चिरा । ही घ्या तलवार देतों करा । वेळ करूं नका हो ॥ ४८ ॥ अब्रुदाराकारण । बेइज्जत हेच मरण । अपराध माझा त्यांतून । अति अल्प दयाळा ॥ ४९ ॥ त्या अपराधरूपी खड्याचा । हा डोंगर झाला साचा । अभिमान माझ्या अब्रूचा । धरा समर्था ये काळीं ॥ ५० ॥ जयद्रथाच्या वेळेला । अग्निकाष्ठ भक्षिण्याला । होता अर्जुन तयार झाला । केवळ आपुल्या अब्रूस्तव ॥ ५१ ॥ तेथें भगवंतानें भली । अब्रू त्याची रक्षण केली । प्रभूनें वस्त्रें नेसविलीं । द्रौपदीला सभेंत ॥ ५२ ॥ तेवीं मम अब्रू ही पांचाळी । देशमुख कौरवांनीं आणिली । नग्न करण्यासाठीं भली । तिचें करा हो रक्षण ॥ ५३ ॥ ऐसें वदून समर्थाला । पाटील रडूं लागला । आसवांचा तो चालला । पूर नेत्रांवाटें हो ! ॥ ५४ ॥ घरचीं माणसें चिंतातुर । आधींच झालीं होतीं फार । नाहीं त्यांच्या शोका पार । तो सांगावा कोठवरी ? ॥ ५५ ॥ इकडे समर्थांनीं भले । दोन्ही हातीं कवटाळिलें । खंडू पाटला हृदयीं धरिलें । त्याचें सांत्वन करावया ॥ ५६ ॥ अरे ! कामकर्त्या पुरुषाप्रत । ऐशीं संकटें येतात । वरच्यावरी जाण सत्य । त्याची चिंता वाहूं



नको ॥ ५७ ॥ स्वार्थदृष्टि बळावतां । ऐसेंच होतें तत्त्वतां । खऱ्या नीतीची ती वार्ता । अणुमात्र त्या कळत नसे ॥ ५८ ॥ तुम्ही पाटील देशमुख दोघेजण । एका जातीचें असून । एकमेकांचें नुकसान । स्वार्थे करूं पाहतां ॥ ५९ ॥ मागें कौरवपांडवांत । स्वार्थेच आला विपट सत्य । परि पांडवांचा पक्ष तेथ । न्यायें खरा होता कीं ॥ ६० ॥ म्हणून पांडवाकारणें । साह्य केलें भगवंतानें । सत्यासाठीं मारणें । भाग पडलें कौरवांना ॥ ६१ ॥ जा भिऊं नकोस तिळभर । बेडी न तुझीं पडणार । किती जरी केला जोर । देखमुखानें आपला ॥ ६२ ॥ तेच पुढें खरें झालें । पाटील निर्दोषी म्हणून सुटले । जें कां संत मुखावाटें आलें । तें न खोटें होई कधीं ॥ ६३ ॥ पाटील मंडळी उत्तरोत्तर । भजूं लागली साचार । कोणा नाहीं आवडणार । अमृत तें सेवावया ? ॥ ६४ ॥ पुढें खंडू पाटलानें । करून विनंति प्रेमानें । नेलें रहावयाकारणें । समर्थाला निजगृहीं ॥ ६५ ॥ असतां पाटील सदनांत । गजाननस्वामीमी समर्थ । ब्राह्मण आले अवचित । दहापांच तैलंगी ॥ ६६ ॥ तैलंगी विद्वान असती । कर्मठ वेदावरी प्रीती । परी धनाचा लोभ चित्तीं । राही ज्यांच्या विशेष ॥ ६७ ॥ तें कांहीं मिळेल म्हणून । समर्थांकडे आले जाण । तयीं होते पांघरूण । घेऊन समर्थ निजलेले ॥ ६८ ॥ त्यांना जागे करण्याप्रत । ब्राह्मण म्हणूं लागले मंत्र । जटेचें ते स्वरांसहित । अति उच्च स्वराने ॥ ६९ ॥ मंत्र म्हणण्यांत चूक झाली । ती न त्यांनीं दुरुस्त केली । म्हणून आसनीं उठून बसली । गजाननाची स्वारी पहा ॥ ७० ॥ आणि ऐसें वदलें ब्राह्मणाला । तुम्ही कशासाठीं वैदिक झाला । हीनत्व वेदविद्येला । आणूं नका रे निरर्थक ॥ ७१ ॥

ही न विद्या पोटाची । मोक्षदात्री आहे साची । वा डोईस बांधल्या शालीची । किंमत कांहीं राखा हो ॥ ७२ ॥ मी म्हणतों ऐसें म्हणा । खरे स्वर मनीं आणा । उगीच भोळ्या भाविकांना । सोंग आणून नाडूं नका ॥ ७३ ॥ जी ऋचा ब्राह्मणांनीं । म्हणण्या सुरूं केली जाणी । तोच अध्याय समर्थांनीं । घड घड म्हणून दाखावला ॥ ७४ ॥ चूक न कोठें म्हणण्यांत । शब्दोच्चार स्पष्ट सत्य । वाटे वसिष्ठ मूर्तिमंत । वेद म्हणण्याला बसला असे ॥ ७५ ॥ तैलंगी ते ऐकून चकित झाले । अधोवदन बैसले । झुख वरी करण्या आपुलें । भय मनीं वाटलें त्यां ॥ ७६ ॥ सूर्य उदय झाल्यावर । त्याच्यापुढें कां होणार । दीपाचा जयजयकार । त्याची किंमत अंधारीं ॥ ७७ ॥ विप्र म्हणती आपुल्या मनीं । हा पिसा कशाचा महाज्ञानी । चारी वेद याच्या वदनीं । नांदतात प्रत्यक्ष ॥ ७८ ॥ हा विधाताच होय दुसरा । शंका येथें नुरली जरा । हा असावा ब्राह्मण खरा । जातीनें कीं निःसंशय ॥ ७९ ॥ परमहंस दीक्षा याची । वार्ता न उरली बंधनाची । कोणत्याही प्रकारची । हा जीवन्मुक्त सिद्धयोगी ॥ ८० ॥ कांहीं पुण्य होते पदरीं । म्हणून मूर्ति पाहिली खरी । हा वामदेव याला दुसरी । उपमा न ती द्यावया ॥ ८१ ॥ असो खंडू पाटलाकडून । त्या ब्राह्मणलागून । देते झाले दयाघन । रुपया रुपया दक्षिणा ॥ ८२ ॥ ब्राह्मण संतुष्ट झाले । अन्य गांवा निघून गेले । महाराजही कंटाळले । उपाधीला गांवच्या ॥ ८३ ॥ श्रोते खऱ्या संताप्रत । उपाधी ना असे पटत । दांभिकाला मात्र । भूषण होतें तियेचें ॥ ८४ ॥ गांवाचिया उत्तरेला । एक



मळा साान्निध्याला । या मळ्यांत भाजीपाला । होत होता बहुवस ॥ ८५ ॥ एक शिवाचें मंदिर । तेथें होतें साचार । लिंबतरूंचीं थंडगार । छाया होती ते ठायीं ॥ ८६ ॥ हा कृष्णाजी पाटलाचा । मळा होता मालकीचा । हा कृष्णाजी खंडुजीचा । सगळ्यांत शेवटला भाऊ असे ॥ ८७ ॥ त्या मळ्यांत महाराज आले । शिवालयासन्निध बसले । एका ओट्यावरी भले । निंबतरूच्या छायेंत ॥ ८८ ॥ समर्थ म्हणाले कृष्णाजीसी । मी आलों तुझ्या मळ्यासी । कांहीं दिवस रहावयासी । या श्रीशंकरासन्निध ॥ ८९ ॥ हा भोलानाथ कर्पूरगौर । नीलकंठ पार्वतीवर । हा राजराजेश्वर । आहे अवघ्या देवांचा ॥ ९० ॥ तो तुझ्या मळ्यांत रमला । म्हणून मीही विचार केला । येथें येण्याचा तो भला । दे साउली करून ॥ ९१ ॥ तें वाक्य ऐकिलें । सहा पत्रें आणविले । ओट्यावरी छप्पर केलें । कृष्णाजीनें तात्काळ ॥ ९२ ॥ समर्थांनीं वास केला । म्हणून मळा क्षेत्र झाला । राजा जाय जया स्थला । तीच होते राजधानी ॥ ९३ ॥ महाराजांचे बरोबर । होता पाटील भास्कर । सेवा करण्या निरंतर । दुसरा तुकाराम कोकाट्या ॥ ९४ ॥ खाण्यापिण्याची तरतूद सारी । निजांगें कृष्णाजी पाटील करी । समर्थ तें जेवल्यावरी । तो प्रसाद घेत असे ॥ ९५ ॥ असो गजानन असतां मळ्यांत । गोष्ट घडली अद्भुत । येते झाले फिरत फिरत । दहा वीस गोसावी ते ठायां ॥ ९६ ॥ समर्थांचा बोलबाला । त्यांनीं आधींच होता ऐकिला । म्हणूनि त्यांनीं तळ दिला । येऊनि या मळ्यामध्ये ॥ ९७ ॥ गोसावी म्हणती पाटलासी । आम्हीं आहो तीर्थवासी । जातो रामेश्वरासी । भागीरथीला घेऊन ॥ ९८ ॥ गंगोत्री जम्नोत्री केदार । हिंगलाज

गिरनार डाकोर । ऐशी क्षेत्रें अपार । पाहिलीं पायीं फिरूनी ॥ ९९ ॥ ब्रह्मगिरी गोसाव्याचे । आम्ही शिष्य आहो साचे । महाराजही आमुचे । आहेत सांप्रत बरोबर ॥ १०० ॥ हे महासाधु ब्रह्मगिरी । ज्यांचा बंदा गुलाम हरी । ती मूर्ति आली घरीं । तुझ्या पूर्वभाग्यानें ॥ १ ॥ शिरापुरीचें अयाचित । आम्हां द्यावें तुम्ही त्वरित । लागे जो ओढण्याप्रत । गांजा तोही पुरवावा ॥ २ ॥ तीन दिवस येथें राहूं । चौथें दिवशीं येथून जाऊं । पाटील नका कष्टी होऊं । साधून घ्या ही पर्वणी ॥ ३ ॥ तुम्ही पोशिला मळ्यांत । वेडा पिसा नंगाधूत । मग आम्हां देण्या अयाचित । मागें पुढें कां पाहतां ? ॥ ४ ॥ गाढवासी पोशिती । गाईस लाथा मारिती । ते कां म्हणावें सन्मती । पहा विचार करून ॥ ५ ॥ आम्ही गोसावी वैराग्यभरित । जाणतो अवघा वेदान्त । मर्जी असल्या मळ्यांत । या पोथी ऐकावया ॥ ६ ॥ कृष्णाजी म्हणे त्यावरी । उद्यां घालीन शिरापुरी । आज आहेत भाकरी । त्याच जाव्या घेऊन ॥ ७ ॥ जितुका गांजा ओढाल । तितुका तेथेंच मिळेल । तेथेंच चालतां बोलतां कंठनील । बसला आहे पत्र्यामध्यें ॥ ८ ॥ दोन प्रहराची वेळ खरी । घेतल्या चूण भाकरी । मळ्यांत येऊन विहिरीवरी । बसलें गोसावी भोजना ॥ ९ ॥ समर्थांच्या समोरी । एका छपराभीतरी । गोसाव्यांनी लाविली खरी । आपआपली कडासनें ॥ ११० ॥ त्यांचा जो होता महंत । ब्रह्मगिरी नामें सत्य । तो भगवद्गीतेप्रत । वाचूं लागला अस्तमानीं ॥ ११ ॥ गोसावी श्रवणा बैसले । गांवांतूनही कांहीं आले । पोथी ऐकावया मले । त्या ब्रह्मगिरी गोसाव्याची ॥ १२ ॥ "नैनं छिन्दन्ति" हा श्लोक । निरूपणाचा होता



देख । ब्रह्मगिरी पक्का दांभिक । स्वानुभवाचा लेश नसे ॥ १३ ॥ निरूपण याचे ऐकलें । गांवकऱ्यांस नाहीं पटलें । ते आपसांत बोलू लागले । हा नुसता शब्दच्छल ॥ १४ ॥ सारे पोथी ऐकिल्यावरी । येऊन बसले पत्र्याभीतरीं । गजाननाच्या समोरीं । संतदर्शन घ्यावया ॥ १५ ॥ लोक म्हणती छपराला । निरूपणाचा भाग झाला । येथें पत्र्यास बैसला । स्वानुभवाचा पुरुष हा ॥ १६ ॥ तेथें ऐकला इतिहास । येथें पाहिला प्रत्यक्ष पुरुष । या भाषणें गोसाव्यास । राग आला कांहींसा ॥ १७ ॥ अवघे गोसावी गांजा प्याया । बसले होते घेऊनिया । त्या पत्र्याचिया ठायां । चालली चिलीम गांजाची ॥ १८ ॥ पत्र्यांत पलंगाच्या वरीं । बसली होती समर्थस्वारी । चिलीम भरून वरच्यावरी । प्याया देई भास्कर ॥ १९ ॥ त्या चिलिमीच्या विस्तवाची । ठिणगी पलंगी पडली साची । ती पडतांना कोणाची । दृष्टि न गेली तिच्यावर ॥ १२० ॥ कांहीं वेळ गेल्यावर । निघूं लागला धूर । पलंग पेटला अखेर । एकदम चहूं बाजूंनीं ॥ २१ ॥ तो प्रकार पाहतां । भास्कर बोले सद्गुरुनाथा । पलंग सोडा शीघ्र आतां । या खाली उतरून ॥ २२ ॥ लाकडें हीं पलंगाचीं । आहेत कीं सागाचीं । तीं न आतां विझायाचीं । पाण्यांवाचून दयाळा ॥ २३ ॥ तयीं समर्थ बोलले वाचें । भास्करा अग्नि विझविण्याचें । कारण नाहीं तुला साचें । जल मुळींच आणूं नको ॥ २४ ॥ अहो महाराज ब्रह्मगिरी । या बैसा पलंगावरी । तुम्हां आहे अवगत खरी । भगवद्गीता साकल्यें ॥ २५ ॥ त्याच्या परीक्षेची वेळ । आणिली हरीनें तात्काळ । ब्रह्मा न जाळी अनळ । याचा प्रत्यय दाखवा ॥ २६ ॥ "नैनं छिन्दन्ति" श्लोकावर । व्याख्यान कले एक प्रहर । आतां

कां मानितां दर । या पलंगीं बसण्याची ? ॥ २७ ॥ जा जा भास्करा लौकरी । ब्रह्मगिरीला करी धरी । आणून बसवी अत्यादरीं । या जळत्या पलंगास ॥ २८ ॥ ऐसी आज्ञा होतां क्षणीं । भास्कर गेला धांवोनि । ब्रह्मगिरीचा सव्य पाणी । धरिला त्यानें निजकरें ॥ २९ ॥ भास्कराचें शरीर । धिप्पाड सशक्त पिळदार । तो गोसावी त्याच्यासमोर । शोभूं लागला घुंगुरडें ॥ १३० ॥ पलंग पेटला चौफेर । ज्वाळा निघूं लागल्या थोर । परी महाराज आसनीं स्थिर । हलले मुळीं न इतकेंही ॥ ३१ ॥ श्री प्रल्हाद कयाधूसुत । उभा केला अग्नींत । हें लिहिलें पुराणांत । श्रीव्यासांनीं भागवतीं ॥ ३२ ॥ त्या लिहिल्या गोष्टीचें । प्रत्यंतर दाविलें साचें । मळ्यामाजीं कृष्णाजीचें । श्रीगजानन साधूंनीं ॥ ३३ ॥ ब्रह्मगिरी म्हणे भास्कराशीं । मला न न्या पलंगापाशीं । महाराजांच्या अधिकाराशीं । मी नाहीं जाणितलें ॥ ३४ ॥ तें न मानीं भास्कर । ओढीत आणिला फरफर । उभा केला समोर । आपल्या सद्गुरुरायांच्या ॥ ३५ ॥ 'नैनं दहति पावक' । हें खरें करून दावा वाक्य । ऐसे बोलतां महाराज देख । गोसावी परम घाबरला ॥ ३६ ॥ गोसावी म्हणे भीत भीत । मी पोटभऱ्या आहे संत । शिरापुरी खाण्याप्रत । मी झालों गोसावी ॥ ३७ ॥ माझ्या अपराधाची क्षमा । साच करी शांतिधामा । केला खटाटोप रिकामा । गीताशास्त्र शिकण्याचा ॥ ३८ ॥ तुला पिसा मी म्हणालों । आतां पस्तावा पावलों । मी दातीं तृण धरून आलो । शरण तुला, अभय दे ॥ ३९ ॥ शेगांवच्या जनांनीं । केली समर्था विनवणी । आपण अग्नीपासूनी । भय नाहीं हें खरें ॥ १४० ॥ तरी महाराज आमच्याकरितां । खालीं यावें लवकर आतां । अशा



स्थितींत पाहतां । तुम्हां, आम्हां धडकी भरे ॥ ४१ ॥ म्हणून आमच्यासाठीं । उतरा खालीं ज्ञानजेठी । गोसावी झाला हिंपुटी । तो न कांहीं बोलला ॥ ४२ ॥ लोक विनंतीस द्याया मान । खालीं उतरले गजानन । तो पलंग पडला कोसळून । एक पळही न लागलें त्या ॥ ४३ ॥ अवघाच होता जळाला । जो भाग शेष उरला । तो लोकांनी विझविला । साक्ष दावण्या इतरांसी ॥ ४४ ॥ ब्रह्मगिरी पायीं लागला । निरभिमान अवघा झाला । स्पर्श होता गंगाजळा । मल कोठूनी राही तेथ ? ॥ ४५ ॥ मग मध्यरात्रीच्या समयाला । ब्रह्मगिरीस बोध केला । आजपासून चेष्टेला । तूं या सोडून देई रे ॥ ४६ ॥ ज्यांनीं राख लावावी । त्यांनीं उपाधी दूर ठेवावी । अनुभवावीण न सांगावी । गोष्ट कोणा निरर्थक ॥ ४७ ॥ नुसते शब्दपांडित्य । माजलें जगीं अतोनात । तेणेंच आहे झाला घात । आपुल्या या संस्कृतीचा ॥ ४८ ॥ गोसावी मच्छिंद्र जालंदर । गोरख गहिनी साचार । ज्ञानेश्वरांचा अधिकार । किती म्हणून सांगावा ॥ ४९ ॥ स्वानुभवाचे झाले यती । श्रीशंकराचार्य निश्चिती । प्रपंचीं राहून ब्रह्मस्थिति । अनुभाविली एकनाथांनीं ॥ १५० ॥ स्वामी समर्थ ब्रह्मचारी । हेही ब्रह्मसाक्षात्कारी । होऊन गेले भूमीवरी । यांचीं चरित्रें आणी मना ॥ ५१ ॥ उगीच खाया शिरापुरी । भटकूं नको भूमीवरी । सार न तया माझारीं । येतुलेंही गवसणार ! ॥ ५२ ॥ ऐसा बोध ऐकिला । ब्रह्मगिरी विरक्त झाला । प्रातःकाळींच उठोन गेला । कोणा न भेटतां शिष्यांसह ॥ ५३ ॥ ही गोष्ट दुसऱ्या दिवशीं । कळली अवघ्या गांवासी । जो तो आला पहावयासी । मळ्यांत जळलेल्या पलंगातें ॥ ५४ ॥ हा

दासगणूविरचित । श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । तारो भाविकां भवाब्धींत । हेंचि इच्छी दासगणू ॥ १५५ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥



॥ इति अष्टमोऽध्यायः समाप्तः ॥

* * *



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय ९.



श्रीगजानन महाराज घोडयाच्या चौखुरांमध्ये निजले आहेत. त्यामुळे घोडा वठणीवर आला.

श्रीगणेशाय नमः ॥ हे सगुणस्वरूपा रुक्मिणीवरा । हे चंद्रभागातटविहारा । श्रीसंतवरदा शारंगधरा । पतितपावना दयानिधे ॥ १ ॥ लहानांवाचून मोठ्यांचा । मोठेपणा न टिके साचा । पतिताविण परमेश्वराचा । बोलबाला होणें नसे ॥ २ ॥ आम्ही आहों पतित । म्हणून तुला म्हणतात । पावनकर्ता रुक्मिणीकांत । हें आतां विसरूं नको ॥ ३ ॥ पारिस लोहाला सोनें करी । म्हणूनी त्याचें महत्त्व भूमांवरी । ओहोळ पोटी घे गोदावरी । म्हणून म्हणती तीर्थ तिला ॥ ४ ॥ याचा विचार करावा । चित्तीं आपुल्या माधवा । दासगणूला हात द्यावा । बुडूं न द्यावें कोठेंही ॥ ५ ॥ असो गोविंदबुवा टाकळीकर । एक हरिदास होता थोर । तो कराया कीर्तनगजर । शेगांवासी पातला ॥ ६ ॥ तेथें शिवाचें मंदिर । पुरातन होतें साचार । ज्याचा केला जीर्णोद्धार । मोटे नामक सावकारें ॥ ७ ॥ अलिकडच्या श्रीमंताला । मंदिरांचा कंटाळा । मोटारी क्लब बायसिकला । याचें प्रेम बहु असे ! ॥ ८ ॥ तैसा न मोटे सावकार । श्रीमंत असून भाविक फार । त्यानेंच हा जीर्णोद्धार । केला असे मंदिराचा ॥ ९ ॥ म्हणोन मोट्यांचें मंदिर । वदूं लागले नारीनर । आतां पुढचा प्रकार । काय झाला तो ऐका ॥ १० ॥ त्या मोट्याच्या मंदिरीं । उतरले टाकळीकर कथेकरी । त्यांचा घोडा समोरी । बांधिला होता मंदिराच्या ॥ ११ ॥ घोडा अतिद्वाड हाता । कोणासही मारी लाथा । समोरून कोणी येतां । त्यास चावे कुत्र्यासम ॥ १२ ॥ तोडी चऱ्हाटें वरच्यावरी । स्थिर न राहे क्षणभरी । कधीं कधीं कांतारीं । त्यानें जावें पळोन ॥ १३ ॥ खिंकाळे रात्रंदिवस । वाईट खोड्या बहुवस । आल्या होत्या मुक्कामास । ओंवे बया घोड्याच्या ॥ १४ ॥

लोखंडाच्या साखळ्या । होत्या त्यासीं बांधण्या केल्या । त्या या समयीं राहिल्या । टाकळीमाजी विसरून ॥ १५ ॥ पन्हाटानें कसा तरी । घोडा मंदिरासमोरी । बांधूनिया कथेकरी । निजले जाऊन शय्येला ॥ १६ ॥ रात्र झाली दोन प्रहर । तमें आक्रमिलें अंबर । दिवाभीतांचे घूत्कार । होऊ लागले वृक्षावरी ॥ १७ ॥ टिटव्या 'टी टी' शब्द करिती । वाघुळे भक्ष्या धुंडिती । पिंगळे बसूनि वृक्षांवरती । किलबिल करूं लागले ॥ १८ ॥ सामसूम जिकडे तिकडे । बंद झाली कवाडें । कोठेंही ना दृष्टि पडे । एकही माणूस रस्त्यांनीं ॥ १९ ॥ ऐशा रात्रसमयास । श्रीगजानन पुण्यपुरुष । घोडा बांधल्या ठायास । येते झाले सहजगती ॥ २० ॥ जे जे कोणी द्वाड असती । त्यांना सुधारण्याप्रती । साधुपुरुष अवतार घेती । ईशाज्ञेनें भूमीवर ॥ २१ ॥ औषधाचे प्रयोजन । रोगा निवारण्याकारण । तेवीं द्वाडाचें द्वाडपण । साधुसंत निवारिती ॥ २२ ॥ असो गजानन घोड्यापासी । आले रात्रसमयासी । जाऊनी निजले अति हर्षी । चहूं पायांत घोड्याच्या ॥ २३ ॥ मुखें भजन चाललें होतें । 'गणी गण गणांत बोते' । या सांकेतिक भजनातें । जाणण्या कोण समर्थ हो ? ॥ २४ ॥ त्या सूत्ररूप भजनाचा । अर्थ ऐसा वाटतो साचा । गणी या शब्दाचा । अर्थ मोजी हाच असे. ॥ २५ ॥ जीवात्मा म्हणजे गण । तो ब्रह्माहून नाहीं भिन्न । हें सुचवावया कारण । गणांत हा शब्द असे ॥ २६ ॥ बोते हो शब्द देखा । अपभ्रंश वाटे निका । बाते हा शब्द ऐका । तेथें असावा निःसंशय ॥ २७ ॥ बाया शब्दें करून । घेतलें पाहिजे मन । तें हें आहे सर्वनाम । शब्दाऐवजीं आलेलें ॥ २८ ॥ म्हणजे मना समजे नित्य । जीव हा ब्रह्मास सत्य । मानूं नको



तयाप्रत । निराळा त्या तोचि असे ॥ २९ ॥ 'गिणगिण गिणांत बोते' । कोणी 'गणी गण गणांत बोते' । ऐशीं आहेत दोन मतें । या भजनाविषयीं शेगांवीं ॥ ३० ॥ त्यासीं न आपुलें प्रयोजन । आपणा कथेसी कारण । महाराज निजले येऊन । चौपायांत घोड्याच्या ॥ ३१ ॥ वरील भजन मुखानें । चाललें होतें आनंदानें । वाटे या भजनरूप सांखळीनें । घोडा बांधूनी टाकिला ॥ ३२ ॥ गोविंदबुवांच्या अंतरीं । धास्ती होती जबर खरी । म्हणून तो वरच्यावरी । उठून पाहे वारूला ॥ ३३ ॥ तों ठाण्यावरी घोडा शांत । ऐसें पडतां दृष्टींप्रत । गोविंबुवांच्या चित्तांत । अति नवल वाटलें ॥ ३४ ॥ तो आपुल्या मनीं म्हणे । हें ऐसें झाले कशानें । का कांहीं आजारानें । व्यास झाला घोडा हा ॥ ३५ ॥ म्हणूनी राहिला शांत । हें न कांहीं कळों येत । हा ऐसा आजपर्यंत । नाहीं कधींच स्थिरावला ॥ ३६ ॥ हें काय आहे तें पहाया गेलें । तों एक माणूस दिसलें । चोहों पायांत निजलेलें । त्या द्वाड घोड्याच्या ॥ ३७ ॥ अति निकट येऊनी । पाहूं लागले निरखुनी । तों दिसले कैवल्यदानी । तेथें गोविंदबुवाला ॥ ३८ ॥ ते म्हणाले मनांत । घोडा कां झाला शांत । हें कळलें कारणासहित । मजलागीं येधवां ॥ ३९ ॥ समर्थांच्या सहवासे । घोडा शांत झालासे । जेथें कस्तुरी तेथें नसे । दुर्गंधाला थारा कदा ॥ ४० ॥ समर्थांच्या पायांवरी । गोविंदबुवानें अत्यादरीं । शीर ठेविलें निर्धारीं । अष्टभाव दाटलें ॥ ४१ ॥ मुखें करूं लागले स्तवन । आपण खरेच गजानन । विघ्नांचें करितसा कंदन । याचा प्रत्यय आज आला ॥ ४२ ॥ माझा घोडा द्वाड अती । सर्वही त्याला भीती । तेथेंच आलात गुरुमूर्ती । हरण्या त्याचा द्वाडपणा ॥ ४३ ॥

ह्या घोड्याच्या अचाट खोडी । चालता मध्येंच मारी उडी । क्षणक्षणा मागल्या झाडी । हा दुगाण्या, महाराज ! ॥ ४४ ॥ मी गेलों होतों कंटाळून । म्हणून बाजारालागून । गेलो विकाया कारण । परी न कोणी घेई या ॥ ४५ ॥ मी फुकटही लागलों द्याया । परी न कोणी तयार घ्याया । त्यांवरी आपण केली दया । हें झालें फार बरें ॥ ४६ ॥ आम्हां कथेकऱ्याचें । घोडें पाहिजे गरीब साचें । घरामाजी घनगराचे । नाहीं वाघ कामाचा ॥ ४७ ॥ ऐसा झाला प्रकार । घोडे झालें गरीब फार । जडजीवांचा उद्धार । करण्यास स्वामी अवतरले ॥ ४८ ॥ घोड्यास म्हणाले, "आतां गड्या । करूं नकोस येथून खोड्या । त्या येथेंच रोकड्या । द्याव्या अवघ्या सोडून ॥ ४९ ॥ तूं शिवाच्या समोरीं । याचा विचार कांहीं करी । वागत जावें बैलापरी । त्रास न देई कवणातें" ॥ ५० ॥ ऐसें त्यासी बोलून । निघून गेले दयाघन । कृपाकटाक्षें करून । पशूही ज्यानें आकळिला ॥ ५१ ॥ असो श्रोते दुसरे दिवशीं । मळ्यात असतां पुण्यराशीं । आले गोविंदबुवा दर्शनासी । घोड्यावरी बैसून ॥ ५२ ॥ घोडा गोविंदबुवांचा[1] । शेगांवासी ठाऊक साचा । कोश अवघ्या खोड्यांचा । भीत होते त्यासी जन ॥५३॥ तो मळ्यांत आलेला पाहून । लोक बोलले त्याकारण । गोविंदबुवा ही घेऊन । पीडा कशास येथें आला ॥५४॥ मुलें बायका मळ्यांत । आहेत पहा वावरत । तुमचा घोडा करील घात । सहज लीलेनें कवणाचा ॥ ५५ ॥ गोविंदबुवा त्यांस वदले । तुमचें म्हणणें मी ऐकिलें । माझ्या घोड्यास शहाणें केलें । काल रात्रीं समर्थांनीं ॥ ५६ ॥ त्यानें खोड्या दिल्या टाकून । झाला गोगलगाईसमान । आतां भ्यावयाचें कारण ।

१. गोविंदमहाराजांचा



कांहीं न उरलें कोणाशी ॥ ५७ ॥ चिंचेखालीं उभा केला । टाकळीकरांनी[1] घोडा भला । चऱ्हाटावांचूनी राहिला । उभा तो एक प्रहर ॥ ५८ ॥ भाजीपाला कोत्रळा घास । मळ्यांत होता विशेष । परी ना लाविलें त्यास । तोंड घोड्यानें एकाही ॥ ५९ ॥ पहा संतांची केवढी शक्ति । पशूही आज्ञेत वागती । पत्र्यांत[2] आरंभिली स्तुति । गोविंदबुवांनीं समर्थांची ॥ ६० ॥

श्लोक (पृथ्वी वृत्त)

अचिंत्य जगताप्रती कृति तुझी न कोणा कळे ।<br>
असो खलहि केवढा तव-कृपें सुमार्गी वळे ।<br>
उणें पुढति ये तुझ्या खचित रत्नचिंतामणीं ।<br>
शिरीं सतत माझिया वरदहस्त ठेवा क्षणीं ॥ १ ॥

ऐसी स्तुति करून । गेले गोविंदबुवा निघून । घोड्यास आपल्या घेऊन । टाकळीं ग्रामाकारणें ॥ ६१ ॥ प्रत्येक दिनीं शेगांवी । यात्रा येई नवी नवी । कांहीं तरी धरून जीवीं । हेतु आपल्या श्रोते हो ॥ ६२ ॥ त्या यात्रेकरू मंडळींत । बाळापूरचे दोन गृहस्थ । आले कांहीं धरून हेत । समर्थांच्या दर्शना ॥ ६३ ॥ पथीं जातां एकमेका । बोलूं लागले ऐसें देखा । पुढल्या वारीस गांजा सुका । येऊं आपण घेऊन ॥ ६४ ॥ कां कीं या गांजावर । समर्थांचें प्रेम फार । तो आपण आणिला जर । तरी कृपा होईल त्यांची ॥ ६५ ॥ लोक आणती बर्फी खवा । आपण गांजा नेऊं बरवा । गांठ धोतरां बांधून ठेवा । ना तरी विस्मृती होईल ॥ ६६ ॥ पुढल्या वारीस दोघे जण । आले दर्शनाकारण । परि गेले

१. बाशिटाकळीकर (गोविंदमहाराज). २. पत्र्याच्या झोपडींत.

विसरोन । गांजा तो आणावया ॥ ६७ ॥ शिर ठेविता पायांवरी । आठवण त्यांना झाली खरी । कीं नाहीं आणिला बरोबरी । गांजा तों आपण ॥ ६८ ॥ आतां पुढच्या वारीसी । दुप्पट आणूं गांजासी । ऐसें बोलून मानसीं । दर्शन घेऊन गेले हो ॥ ६९ ॥ पुढल्या वारीस तेंच झालें । गांजा आणण्याचें विसरलें । कर जोडून मात्र बसलें । स्मृती नसे गांजाची ॥ ७० ॥ तैं स्वामी म्हणाले भास्करासी । पाहा जगाची रीत कैसी । गांठ मारून धोतरासी । विसरती जिन्नस आणावया ॥ ७१ ॥ जातीनें आहेत ब्राह्मण । तें आपुलें भाषण । करिती आपण होऊन । खोटे पहा सर्वांशी ॥७२॥ ब्राह्मणाचें भाषण । कदा नसावें अप्रमाण । या तत्त्वालागून । न जाणती चांडाळ ते ॥ ७३ ॥ द्विजें निजधर्म सोडिला । आचार विचार सांडिला । ह्यामुळें श्रेष्ठत्वाला । ते मुकले सांप्रत ॥ ७४ ॥ बेटे मनीं नवस करिती । आणि हात हालवित येथें येती । अशानें कां पूर्ण होती । त्यांच्या मनींचे मनोरथ ? ॥ ७५ ॥ बोलण्यांत पाहिजे मेळ । चित्त असावें निर्मळ । तरीच तो घननीळ । कृपा करितो भास्करा ॥ ७६ ॥ हे शब्द त्या दोघांसी । आति लागले मानसीं । पाहूं लागले एकमेकांसी । कुतूहल दृष्टीनें ॥ ७७ ॥ पाहा केवढें अगाध ज्ञान । आहे यांचें परिपूर्ण । हा जगत्चक्षू गजानन । सूर्यापरीच असे हो ॥ ७८ ॥ आपण नवस केला मनीं । तो जाणिला समर्थांनीं । आतां येऊं घेऊनी । चला गांजा गांवांतून ॥ ७९ ॥ ऐसा विचार करून उठले । गांवांत जाऊं लागले । गांजा आणावया भले । तैं महाराज वदले त्या ॥ ८० ॥ आतां शिळ्या कढीप्रत । कां हा उगा आणितां ऊत । सार नाहीं किमपि यांत । मी न हपापलों गांजाला ॥ ८१ ॥ आतां आणण्या गांजाप्रत । नका जाऊं



पेठेंत । मेळ हमेशा बोलण्यांत । ठेवा तुम्ही आपुल्या ॥ ८२ ॥ लबाडाचे न हेतु पुरती । ही खुणगांठ बांधा चित्तीं । तुमचें काम झाल्यावरती । मर्जी असल्या गांजा आणा ॥ ८३ ॥ पुढील आठवड्यांत तुमचे काम । होईल जा अत्युत्तम । परी कदा न चुकावा नेम । पांच वाऱ्या येथील करा ॥ ८४ ॥ कां कीं हा येथें स्थिर । आहे मृडानीपती कर्पूरगौर । ज्याच्या कृपेनें कुबेर । जगीं झाला धनपती ॥ ८५ ॥ जा नमस्कार त्यासी करा । गांजा आणावया न विसरा । परमार्थांत खोटें जरा । बोलूं नये मानवांनीं ॥ ८६ ॥ ऐसा उपदेश ऐकून । महाराजांशी वंदून । घेतलें शिवाचें दर्शन । आणि गेले बाळापुरा ॥ ८७ ॥ पुढील आठवड्यामाजी भले । काम त्याचें फत्तें झालें । तेही गांजा घेऊन आलें । शेगांवांत वारीला ॥ ८८ ॥ त्या बाळापूरची दुसरी कथा । तुम्ही ऐका श्रोते आतां । बाळकृष्ण नामें होता । बाळापुरांत रामदासी ॥ ८९ ॥ कांता त्याची पुतळाबाई । परम भाविक होती पाही । दरवर्षी वारीस जाई । पायी सज्जनगडातें ॥ ९० ॥ पति-पत्नीचा विचार एक । पौष मासी निघती देख । ओझ्यासाठी घोडें एक । घेऊनिया बरोबरी ॥ ९१ ॥ कुबडी कंथा दासबोध । सर्वे हें सामान अति शुद्ध । साधुत्वाचा नव्हता मद । तयासी कीं चढलेला ॥ ९२ ॥ मार्गीं चालतां ग्रामांतरी । प्रत्यही झोळी फिरवी खरी । त्या झोळीच्या भिक्षेवरी । नैवेद्य करी रामाला ॥ ९३ ॥ पौष वद्यांत बाळापूर । सोडी नवमीला साचार । असे कांता बरोबर । पुतळाबाई नाम जिचें ॥ ९४ ॥ बाळकृष्ण-बुवा हाती । चंदनाच्या चिपळ्या असती । पुतळाबाई करी साथी । झांज हाती घेऊन ॥ ९५ ॥ रघुपतीचा नाम गजर । करी पंथानें निरंतर । शेगांव खामगांव मेहेकर । देऊळगांवराजा पुढें ॥ ९६ ॥

आनंदीस्वामीस जालनापुरी । वंदुनिया जांब नगरीं । जाय तेथें मात्र करी । तीन दिवस मुक्काम ॥ ९७ ॥ कां कीं तें ठिकाण । समर्थांचें जन्मस्थान । पुढें दिवऱ्यास येऊन । वंदन करी गोदेला ॥ ९८ ॥ पुढें बीड आंबेजोगाईचे । मोहोरी बेलेश्वर स्वामीचे ।-पट्टशिष्य समर्थांचे । डोमगांवीं कल्याण ॥ ९९ ॥ नरसिंगपूर पंढरपूर । नातेपोतें शिंगणापूर । वाई आणि सातार । असे जे गडाच्या पायथ्यापाशीं ॥ १०० ॥ माघ वद्य प्रतिपदेला । तो येऊन पहूचे भला । श्रीसज्जनगडाला । नवमीच्या त्या उत्सवासीं ॥ १ ॥ यथाशक्तीप्रमाणें । ब्राह्मणभोजन करावें त्यानें । श्रीस्वामीसमर्थांकारणें । खरा खराच रामदासी ॥ २ ॥ ऐसे रामदासी आतां । होणें कठीण सर्वथा । दासनवमीचा उत्सव होता । परत जाई त्याच मार्गें ॥ ३ ॥ ऐसा क्रम चालला । बहुत दिवस त्याचा भला । साठ वर्षे देहाला । गेलीं त्याच्या उलटून ॥ ४ ॥ माघ वद्य द्वादशीस । सोडून सज्जनगडास । निघावें परत जावयास । त्यानें आपुल्या बाळापुरा ॥ ५ ॥ असो वद्य एकादशीसी । बसला समर्थ समाधीपाशीं । आले दुःखाश्रु लोचनासी । शब्द न त्यासी बोलवे ॥ ६ ॥ हे रामदास स्वामी समर्था ! । हे गुरुराया पुण्यवंता ! । माझें शरीर थकलें आतां । वारी न पायीं होईल ॥ ७ ॥ जरी बसून वाहानातें । येऊं सज्जन-गडातें । तरी तेंही कठीण दिसतें । मजलागीं दयाळा ॥ ८ ॥ नेम चालला आजवर । आतां पडूं पाहे अंतर । परमार्थासी शरीर । निकोप आधीं पाहिजे ॥ ९ ॥ तरीच सर्व घडें कांहीं । हे रामदासा माझे आई । हें म्हणण्याची जरूर नाहीं । आपण सर्व जाणतसा ॥ ११० ॥ ऐशी



प्रार्थना करून । निजला शय्येस जाऊन । तों प्रभातकाळीं पडलें स्वप्न । बाळकृष्णबुवाला ॥ ११ ॥ स्वप्नीं म्हणाले रामदास । ऐसा न होई हताश । नको येऊं येथून खास । या सज्जनगडातें ॥ १२ ॥ माझी कृपा तुझ्यावरी । माझा उत्सव बाळापुरी । करावा तूं आपल्या घरीं । मी येईन नवमीला ॥ १३ ॥ तुला द्यावया दर्शन । हें मानीं प्रमाण वचन । आपुल्या शक्तीस पाहून परमार्थ तो आचरावा ॥ १४ ॥ ऐसें स्वप्न पाहिलें । बाळकृष्ण आनंदलें । कांतेसह परत आले । बाळापुरास आपल्या घरीं ॥ १५ ॥ पुढें श्रोतें दुसरें वर्षीं । काय झालें माघमासीं । त्या बाळापुरासी । तें आतां अवधारा ॥ १६ ॥ माघ वद्य प्रतिपदेस । समर्थांच्या उत्सवास । आरंभ बाळापुरास । बाळकृष्णानीं घरीं केला ॥ १७ ॥ दासबोधाचें वाचन । रात्रीस हरिकीर्तन । दोन प्रहरीं ब्राह्मणभोजन । धूपार्ती अस्तमानाला ॥ १८ ॥ बाळकृष्णाच्या मनांत । विचार हाची घोळत । पाहूं कसें येतात । स्वामी समर्थ नवमीसी ॥ १९ ॥ बाळकृष्णाच्या वचनांनीं । केली गांवकऱ्यानीं । आपापसांत वर्गणी । उत्सवा साह्य करावया ॥ १२० ॥ ऐसा थाट बाळापुरा । नव दिवस झाला खरा । नववे दिवशीं दोन प्रहरा । अघटित आलें घडून ॥ २१ ॥ श्रीगजानन साक्षात्कारी । श्रोते तया बाळापुरी । उभे राहिले दोन प्रहरी । नवमी तिथी लक्षून ॥ २२ ॥ बाळकृष्णाच्या द्वारांत । रामाभिषेक चालला आंत । लोक झाले विस्मित । गजाननासी पाहूनिया ॥ २३ ॥ म्हणूं लागले बुवासी । उठा उठा हा वेगसीं । तुमच्या दासनवमीसी । द्वारीं पातले गजानन ॥ २४ ॥ त्यावरी बुवा म्हणाले । गजानन आले बरें झालें । त्याही संतांचे लागले । पाय माझ्या घरासी ॥ २५ ॥

परी आजच्या दिनीं साची । मी वाट पाहातो समर्थाची । त्या सज्जनगड निवासीयाची । आतूर होऊन ये ठायां ॥ २६ ॥ त्यांचा मसी करार आहे । मी नवमीला येईन पाहे । ती वाणी असत्य नोहे । ऐसा माझा भरवंसा ॥ २७ ॥ इकडे स्वामी गजानन । द्वारीं उभे राहून । जय जय रघुवीर म्हणोन । श्लोक बोलूं लागले ॥ २८ ॥

श्लोक—अहिल्या शिळा राघवें मुक्त केली ।
पदीं लागतां दिव्य होऊनि गेली ॥

अशी वाणी ऐकतां उठली । स्वारी बाळकृष्णाची ॥ २९ ॥ पाहाती जों येऊन द्वारीं । तों गजाननांची नग्न स्वारी । अजानुबाहु साजिरी । उभी निजानंदामध्यें ॥ १३० ॥ करण्या गेला नमस्कार । तो रामदास दिसले साचार । हातीं कुबडी जटाभार । रुळत होता पाठीवरी ॥ ३१ ॥ भाली त्रिपुंड्र उभा साचा । होता गोपिचंदनाचा । नेसलेल्या लंगोटीचा । रंग होता हिरमुजी ॥ ३२ ॥ ऐसें रूप पाहिलें । बाळकृष्णा भरतें आलें । प्रेमाचे तें श्रोते भलें । नयनीं संचलें आनंदाश्रु ॥ ३३ ॥ तों सवेंच दिसती गजानन । त्याच्या नेत्रांकारण । कुबडी लंगोटी कांहींच न । त्रिपुंड्र शिरींचा जटाभार ॥ ३४ ॥ पुनः त्यानें हताश व्हावें । तों रामदास स्वामी दिसावें । पुनः जां निरखून पाहावें । तों मागुती गजानन ॥ ३५ ॥ ऐसी स्थिति झाली खरी । सिनेमाच्या खेळापरी । घोटाळलासे अंतरीं । कोडे कांहींच उमगेना ॥ ३६ ॥ मग म्हणाले गजानन । रामदासी प्रेमेकरुन । नको गांगरूं देऊं मन । तुझा समर्थ मीच असे ॥ ३७ ॥



मागें बापा गडावरी । माझीच वस्ती होती खरी । आतां शेगांवाभीतरीं । राहिलों येऊन मळ्यांत ॥ ३८ ॥ तुला सज्जनगडीं दिलें वचन । कीं दासनवमीस येईन । मी बाळपुरालागून । ह्याचें स्मरण आहे कां ? ॥ ३९ ॥ त्या वचनाची पूर्तता । करण्यास येथें आलों आतां । दे सोडोन अवघी चिंता । मीच आहे रामदास ॥ १४० ॥ शरीररूपी वस्त्रास । तूं किंमत देतोस । आणि आत्म्याला विसरतोस । याला काय म्हणावें ? ॥ ४१ ॥ श्लोक आहे गीतेंठायीं । "वासांसि जीर्णानि" तो पाही । ऐसा मुळिं ना भ्रमिष्ट होई । चाल पाटीं बसवी मला ॥ ४२ ॥ बाळकृष्णाचा धरून हात । गजानन आले घरांत । एका मोठ्या पाटीं स्थित । स्वामी गजानन जाहले ॥ ४३ ॥ बाळापुरी पुकार झाली । गजानन आल्याची ती भली । मंडळी धावूं लागली । दर्शन घ्याया पायांचें ॥ ४४ ॥ रामदासी अवघ्या दिवसभर । करीत राहिला विचार । शेवटीं रात्र होतां तीन प्रहर । स्वप्न पडलें बाळकृष्णा ॥ ४५ ॥ अरे, गजानन माझीच मूर्ति । हल्लीं तुमच्या वऱ्हाडप्रांतीं । संशय मुळीं ना धरीं चित्तीं । तो धरितां बुडशील ॥ ४६ ॥ मी तोच समजून । करी गजाननाचें पूजन । गीतेचें हें वचन । "संशयात्मा विनश्यति" ॥ ४७ ॥ ऐसें स्वप्न पडल्यावरी । बाळकृष्ण तोषला भारीं । मस्तक ठेविलें अत्यादरीं । गजाननांचे पायावर ॥ ४८ ॥ महाराज आपुली लीला । मी ना समर्थ जाणण्याला । तो घोटाळा उकलिला । तुम्ही स्वप्न देऊन ॥ ४९ ॥ नवमी माझी सांग झाली । न्यूनता न कांहीं उरली । अर्भकावरी कृपा केली । तेणें धन्य झालों मी ॥ १५० ॥ आतां कांहीं दिवस । राहा या बाळापुरास । हीच आहे मनीं

आस । तो पूर्ण करा हो ॥ ५१ ॥ महाराज म्हणाले त्यावर । एक माझा विचार । कांहीं दिवस गेल्यावर । येईन मी बाळापुरा ॥ ५२ ॥ भोजनोत्तर निघून गेले । स्वामी शेगांवासी भले । रस्त्यानें न कोणा दिसले । क्षणांत पोंचले शेगांवीं ॥ ५३ ॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । सुखद होवो भाविकांप्रत । हेंचि इच्छी दासगणू ॥ १५४ ॥ शुभं भवतु । श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति नवमोऽध्यायः समाप्तः ॥

* * * *



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १०.



श्रीगजानन महाराजांचे दर्शन होतांच गाय गरीब झाली.

आस । तो पूर्ण करा हो ॥ ५१ ॥ महाराज म्हणाले त्यावर । एक माझा विचार । कांहीं दिवस

श्रीगणेशाय नमः ॥ हे अरूपा अव्यया । पूर्णब्रह्मा पंढरीराया । सज्जनांच्या विसाविया । मजला परते लोटूं नको ॥ १ ॥ देवा हा दासगणू । नको परक्याचा आतां म्हणूं । माझ्या पातकाचा नको आणूं । विचार चित्तीं नारायणा ॥ २ ॥ माझ्या करें न झालें पुण्य । हें ठाऊकें मजलागून । फार काय तुला वदन । दावण्या मी योग्य नसे ॥ ३ ॥ ऐशी स्थिती आहे जरी । परि देवा कृपा करी । ओहळास गोदावरी । पोटीं आपल्या घेतसे ॥ ४ ॥ तैसें तुवां करावें । दुःख अवघें निवारावें । पातकाला न उरूं द्यावें । माझ्या ठायीं यत्किंचित ॥ ५ ॥ तूं आणिल्या मनांत । अवघेंच कांहीं घडून येत । रंकाचाही राव होत । तुझा लाधतां वशीला ॥ ६ ॥ असो एकदां पुण्यराशी । गेले उमरावतीसी । जाऊन उतरले सदनासी । आत्माराम भिकाजीच्या ॥ ७ ॥ हा आत्माराम भिकाजी-सुत । उमरावतीचा असे प्रांत । मोठा अधिकार हातांत । होता त्याच्या विबुध हो ॥ ८ ॥ कायस्थ प्रभू याची जात । हा संतांचा प्रेमी अमित । सदाचारसंपन्न गृहस्थ । गृहस्थाश्रमीं वर्ततसे ॥९॥ त्याच्या घरीं समर्थ गेले । ते त्यानें सांग पूजिलें । मंगलस्नान घातिलें । उष्णोदकानें गजानना ॥ १० ॥ उटणीं नाना प्रकारचीं । अंगा लाविलीं साचीं । वृत्ति आनंदली त्याची । संतसहवासें तेधवां ॥ ११ ॥ कर्वतीकांठी उमरेडचा । धोतरजोडा नेसविला साचा । भालीं केशरी गंधाचा । भव्य तिलक लाविलासे ॥ १२ ॥ कंठामाजीं पुष्पहार । नैवेद्याचे नाना प्रकार । दक्षिणेसीं शंभर । रुपये त्यानें ठेविलें ॥ १३ ॥ धूप दीप आरती झाली । पुष्पांजलीं समर्पिली । दर्शनालागी दाटी झाली । उमरावतीच्या लोकांची ॥ १४ ॥ प्रत्येका ऐसें वाटावें । समर्थ आपल्या घरीं न्यावें ।

यथासांग करावें । पूजन त्याचें येणें रितीं ॥ १५ ॥ इच्छा ऐसी बहुतां झाली । परी थोडक्यांची मनीषा पुरली । सदनीं पाऊलें लागण्या भलीं । पुण्य पाहिजे बलवत्तर ॥ १६ ॥ ते ज्यांच्यापासीं होतें । समर्थ गेले तेथें तेथें । कां कीं साधूस अवघें कळतें । अंतर्ज्ञानें करून ॥ १७ ॥ गणेश श्रीकृष्ण खापर्डे । अमरावतीचे गृहस्थ बडे । वकीलींत त्यांच्यापुढें । ढीग रुपयांचे पडती कीं ॥ १८ ॥ दादासाहेब यांप्रत । म्हणत होते वऱ्हाडांत । हा सज्जन भाविक अत्यंत । ब्राह्मण शुक्लयजुर्वेदी ॥ १९ ॥ त्यानें विनंती करितां खरी । महाराज गेले त्याच्या घरीं । तेथेंही झाली याचपरी । समर्थांची पूजा हो ! ॥ २० ॥ गणेश आप्पा म्हणूनी । होता लिंगायतवाणी । चंद्राबाई कामिनी । त्याची परम भाविक असे ॥ २१ ॥ ती बोलली पतीला । हा साधु पाहिजे नेला । कसेंही करून घराला । पाहा विनंती करून ॥ २२ ॥ आपुलें निष्पाप असल्या मन । याच्या आगमनें करून । होईल आपलें पवित्र सदन । भाविकांचा देव असे ॥ २३ ॥ गणेश आप्पा म्हणे तिला । वेड लागले आहे तुला । हा सदनीं साधु न्यावयाला । वशिला पाहिजे बलवत्तर ॥ २४ ॥ पहा खापर्ड्यालागुनी । हा साधु न्यावया सदनीं । श्रम पडले ते आण ध्यानीं । उगा हट्ट धरूं नको ॥ २५ ॥ चंद्राबाई म्हणे नाथा । हें न पटे माझ्या चित्ता । सांगे माझी मनोदेवता । सदनीं साधु येतील हो ॥ २६ ॥ तुम्ही करा हो त्यांना तुसती । सदनीं येण्यास विनंती । गरीबावरी असते प्रीती । संतांची ती विशेष ॥ २७ ॥ परि आप्पा बोलेना । छाती त्याची होईना । बोलावावयासी निजसदना । श्रीगजानन साधूतें ॥ २८ ॥ महाराज बदले अखेर । गणेश आप्पाचा धरून कर । तुझें किती आहे



सदन दूर । तेवढें सांग मला ? ॥ २९ ॥ तुझ्या सदनीं वाटते यावें । कांहीं वेळ बसावें । अरे चित्तीं असेल तें बोलावें । भीड न धरितां कवणाची ॥ ३० ॥ ऐसें महाराज बोलतां । गणेश आप्पाचिया चित्ता । हर्ष झाला तत्त्वतां । तो न शब्दें बोलवे ॥ ३१ ॥ समर्थास नेऊन सदनीं । पूजा केली उभयतांनीं । आपुला संसार त्यांचे चरणीं । अर्पण केला तात्काळ ॥ ३२ ॥ असो ऐशा पूजा अमित । झाल्या उमरावतींत । त्या प्रत्येक पूजेप्रत । एक गृहस्थ हजर असे ॥ ३३ ॥ तो आत्माराम भिकाजीचा । नातयानें हा होता भाचा । राहणार मुंबई शहरींचा । तारमास्तर असे कीं ॥ ३४ ॥ तो रजा घेऊन भला । उमरावतीस होता आला । भेटण्या आपुल्या मामाला । बाळाभाऊ नाम ज्याचें ॥ ३५ ॥ त्या बाळाभाऊकारण । समर्थांचें लागलें ध्यान । म्हणे ऐशा साधूचे चरण । सोडून कुठें जाऊं नये ॥ ३६ ॥ प्रपंच अवघा अशाश्वत । त्यांत कशाला गोवूं चित्त । केला आजपर्यंत । तोच आतां पुरे झाला ॥ ३७ ॥ कांहीं असो आजपासून । मी न सोडी त्याचे चरण । अमृताला टाकून । विष प्याया कोणी जावें ? ॥ ३८ ॥ म्हणून प्रत्येक पूजेला । बाळाभाऊ हजर भला । होता बुध हो राहिला । दुसरें न कांहीं कारण ॥ ३९ ॥ असो कांहीं दिवसांनीं । शेगांवीं आले परतोनी । मळ्यासी न जातां जाणी । आले मंदिरीं मोट्याच्या ॥ ४० ॥ त्या मंदिराच्या पूर्वेस । एक जागा होती ओस । गजानन पुण्य पुरुष । येऊन बसला ते ठायां ॥ ४१ ॥ बातमी महाराज आल्याची । कृष्णा पाटला कळली साची । त्यांनीं जागा मळ्याची । सोडली हें समजलें ॥ ४२ ॥ म्हणून आला धांवत । त्या ओस जागेवरी सत्य । महाराजा करून दंडवत । अधोवदन बैसला ॥ ४३ ॥

डोळ्यांतून वाहे पाणी । खंड त्याला नसे जाणी । वस्त्र टाकले भिजवोनी । त्या अश्रूंनीं छातीचें ॥ ४४ ॥ तैं महाराज वदले पाटलाला । ऐसा कां रे रडशी मला ? । शोक कोणता तुला झाला ? । तें वेगें सांग मज ॥ ४५ ॥ पाटील बोले त्यावर । जोडून आपले दोन्ही कर । महाराज मळ्याचा अव्हेर । कां हो आज केलात हा ? ॥ ४६ ॥ ऐसा अक्षम्य कोणता । अपराध झाला सांगा आतां । माझ्याकडून ज्ञानवंता । मी लेकरूं आपलें असे ॥ ४७ ॥ ही देशमुखाच्या बाजूची । जागा आहे बघा साची । एका माळ्याच्या मालकीची । येथे तुम्ही राहूं नका ॥ ४८ ॥ मळ्यांत मर्जी नसेल जरी । तरी चला राहत्या घरीं । तें खाली करितों सत्वरीं । तुम्हांसाठीं दयाळा ॥ ४९ ॥ कां कीं तुम्हांवांचून । मला न कांहीं प्रिय आन । हें कळलें वर्तमान । अवघ्या पाटील मंडळीतें ॥ ५० ॥ तेही तेथें धांवून आले । महाराजा विनवूं लागले । निजसदना या या भले । हरी आणि नारायण ॥ ५१ ॥ महाराज बोलले तयासी । मी जो या जागेसी । येऊन बसलों आज दिवशीं । ते तुमच्या हितास्तव ॥ ५२ ॥ तें पुढें येईल कळोन । आतां न करा भाषण । वाद दोघांचें निर्मूलन । करील हे विसरूं नका ॥ ५३ ॥ जितके जगीं जमेदार । तितके न करिती विचार । मागचा पुढचा साचार । हेंच उणें त्याच्या ठायीं ॥ ५४ ॥ जा बंकटलालासी । पाहून आणा वेगेसी । मी सोडितां तत् गृहासी । तो नाहीं रागावला ॥ ५५ ॥ तें कां हें त्यासी विचार । माझी कृपा तुमच्यावर । आहे तीं न ढळणार । कोणत्याही कारणांनीं ॥ ५६ ॥ बंकटलालही आला तेथ । घालूं लागला समजूत । यांच्या मर्जीविरुद्ध मळ्यांत । तुम्हीं यांना नेऊं नका ॥ ५७ ॥



माझ्या घरून जेव्हां आले । तेव्हां सांगा मी काय केलें । आपण आहांत त्यांची बाळें । ते सारखे अवघ्यांना ॥ ५८ ॥ सखाराम आसोलकर । आहे मनाचा उदार । तो जागा देण्यास इन्कार । करणार नाहीं वाटतें ॥ ५९ ॥ सखाराम देईल जागा । पुढचें करूं आपण बघा । समेट अवघ्यांचा होऊनी । मठ म्हणजे अवघ्यांस यांत भागा । घेतां येईल सहजची ॥ ६० ॥ बांधिला त्या ठिकाणीं । परशराम सावजींनीं । मेहेनत घेतली विशेष ॥ ६१ ॥ समर्थांच्या बरोबर । निस्सीम भक्त होते चार । भास्कर, बाळाभाऊ, पितांबर । उमरावतीचा गणेश आप्पा ॥ ६२ ॥ रामचंद्र गुरव त्याचपरी । राहात होता बरोबरी । हे पांच पांडव, श्रीहरी । गजानन शोभूं लागले ॥ ६३ ॥ वृत्ति बाळाभाऊची । अतिविरक्त झाली साची । पर्वा न त्यानें नौकरींची । केली यत्किंचित् आपुल्या ॥ ६४ ॥ पत्रें येती वरच्यावरी । बाळाभाऊस येण्या घरीं । परी परिणाम अंतरीं । कांहींच त्याच्या होईना ॥ ६५ ॥ भास्कर म्हणे गुरुराया । हा सोकला पेंढे खाया । म्हणून ना इच्छी जाया । आपल्यापासून कोणीकडे ॥ ६६ ॥ तुम्हीं द्यावा यातें मार । म्हणजेच हा जवळ करील घर । रत्न चौदावें पाहिल्याविगर । हा येथून हलणें नसे ॥ ६७ ॥ लकडीवांचून माकड । पाहा न होई कधीं धड । मोठमोठाले ते पहाड । भिऊं लागती वज्राला ॥ ६८ ॥ एकदां बळेंच घालवून । दिलें बाळाभाऊकारण । परी तो आला परतून । राजीनामा देवोनिया ॥ ६९ ॥ बाळाभाऊ शेगांवासी । येतां भास्कर बोलला त्यासी । कां रे आम्हां त्रास देसी ? । येथें येऊन वरच्यावर ॥ ७० ॥ ओढाळ बैल हिरव्यावर । पाहे पडाया निरंतर । त्यास जरी

दिला मार । तरी तो येई तेथ पुनः ॥ ७१ ॥ तैसी लोंचटा तुझी कृति । तंतोतंत निश्चिती । झाली जयाला विरक्ति । त्यानेंच येथें यावें रे ॥ ७२ ॥ हें अहंकाराचें भाषण । समर्था न खपलें जाण । त्यांनीं भास्कराचें अज्ञान । निवटाया कृत्य केलें ऐसें ॥ ७३ ॥ एका गृहस्थाच्या हातीं । भली थोरली छत्री होती । ती गजाननें घेऊनी हातीं । बाळास झोडूं लागले ॥ ७४ ॥ मारतां मारतां मोडली । बुध हो छत्री भली । मग एक मोठी घेतली । भरीव काठी वेळूची ॥ ७५ ॥ तिनें मारणें सुरूं केलें । तें पाहातां लोक स्याले । कांहीं कांहीं पळून गेले । सोडून त्या मठाला ॥ ७६ ॥ परी बाळाभाऊ तसाच पडला । समर्थांच्या पुढें भला । कैक म्हणती असेल मेला । तो या अशा मारानें ॥ ७७ ॥ भास्करही झाला चिंतातुर । बाळाभाऊचा पाहून मार । परी समर्थांच्या समोर । बोलण्या छाती होईना ॥ ७८ ॥ तीही काठी मोडली खरी । बाळाभाऊच्या पाठीवरी । मग तो कंटाळून अखेरीं । तुडवूं लागले तयाला ॥ ७९ ॥ जैसा का तो कुंभार । माती तुडवितो साचार । तैसाच केला प्रकार । महाराजांनीं तुडविण्याचा ॥ ८० ॥ मठीं हा प्रकार चालला । शिष्यसमुदाय पळत सुटला । कोणी गेलं बोलावण्याला । त्यांच्या आवडीच्या मंडळीस ॥ ८१ ॥ बंकटलाल, कृष्णाजी । धावून आले मठामाजीं । समर्थ हात धरण्या राजी । कोणी तयार होईना ॥ ८२ ॥ बंकटलाल म्हणे भीत भीत । समर्था हा आपुला भक्त । पुरें झालें याप्रत । आतां ऐसें तुडवणें ॥ ८३ ॥ ऐसें ऐकतां भाषण । समर्थ वदले हांसून । हें असंबद्ध भाषण । कां करितां कळेना ॥ ८४ ॥ मीं न बाळासी मारिलें । नाहीं तयासी तुडविलें । निरखून



पहा चांगलें । म्हणजे येईल कळोनी ॥ ८५ ॥ महाराज म्हणाले बाळासी । ऊठ वत्सा वेगेसी । या आलेल्या मंडळीसी । आंग तुझें दाखिव ॥ ८६ ॥ ऐसी आज्ञा होता भला । बाळाभाऊ उठून बसला । लोक त्याच्या अंगाला । पाहूं लागले निरखून ॥ ८७ ॥ तों वळाचें नांव नाहीं । कोठेंही न लागलें कांहीं । तो पहिल्यापरीच होता पाही । निमग्न आपुल्या आनंदांत ॥ ८८ ॥ त्यायोगें भास्कराला । बाळाभाऊचा अधिकार कळला । मग तोही ना पुन्हां बोलला । वेडेंवांकुडें बाळासी ॥ ८९ ॥ सोनें कसासी उतरतें । तेव्हांच त्याची किंमत कळते । आश्चर्य झालें समस्तांतें । तो प्रकार पाहून ॥ ९० ॥ सुकलाल नामें आगरवाला । होता बाळापुराला । श्रोते त्याच्या आगराला । गाय एक द्वाड होती ॥ ९१ ॥ तिनें गांवांत फिरावें । मुलांमाणसां तुडवावें । सशक्तांसी हुंदडावें । शिंगानें कीं आपुल्या ॥ ९२ ॥ वाटेल त्याच्या दुकानांत । गाईनें शिरावें अवचित । धान्याचिया टोपल्यांत । तोंड आपुलें खुपसावें ॥ ९३ ॥ वाटेल तितुकें यथेच्छ खावें । राहिलेलें नासावें । तेल-तुपाचें लवंडावें । पिंप अंगाच्या धक्क्यानें ॥ ९४ ॥ घरीं बांधून ठेवितां । चऱ्हाटें तोडी हां हां म्हणतां । सांखळीसी आणिली लघुता । बांधतां त्या गाईनें ॥ ९५ ॥ ती गाय नोव्हे वाघीण । बाळापुराकारण । लोक गेले कंटाळून । त्रास सोसितां तियेचा ॥ ९६ ॥ गाभण मुळींच होईना । कास कधींच करीना । कोंडून ठेवितां राहीना । घरामाजीं कोठेंही ॥ ९७ ॥ लोक म्हणती सुकलालाला । दे या खाटकास गाईला । किंवा मारून टाक तिला । तूंच गोळी घालून ॥ ९८ ॥ सुकलाला म्हणे लोकांसी । तुम्हीच मारून टाका तिसी । वाटेल त्या प्रयत्नांसी । करून या विबुध

हो ॥ ९९ ॥ एका पठाणानें तिला । मारण्याचा यत्न केला । गोळी भरून बंदुकीला । टपून बैसला होता हो ॥ १०० ॥ तें कसें काय कोण जाणे । कळलें गाईकारणें । तिनें येऊन शिंगानें । पठाण पाडिला उताणा ॥ १ ॥ मी परगांवा नेऊन । दिली होती सोडून । परी ती आली परतून । त्याला सांगा काय करूं ? ॥ २ ॥ ऐसें ऐकतां लोक म्हणती । आतां याला एक युक्ति । गोविंदबुवाचा घोडा म्हणती । समर्थानें गरीब केला ॥ ३ ॥ तूंही या गाईला । घेऊन जा शेगांला । अर्पण करी समर्थाला । म्हणजे अवघें संपलें ॥ ४ ॥ साधूस गाय दिल्याचें । पुण्य तुला लाभेल साचें । आणि संकट आमुचें । टळेल बापा त्यायोगें ॥ ५ ॥ तें अवघ्यांस मानवलें । गाय नेण्याचें ठरविलें । तिला धरण्यासाठीं केलें । प्रयत्न नानापरीचे ॥ ६ ॥ एकही यत्न नाहीं फळला । शेवटीं एक्या पटांगणाला । हरळकुंद्याचा ढीग केला । सरकी ठेवली शेजारीं ॥ ७ ॥ ती खायालागून । गाय आली धांवून । ती येतां फांस टाकून । धरिली दहावीस जणांनीं ॥ ८ ॥ साखळदंडानें बांधून पुरी । गाय घातली गाडीवरी । आणिली शेगांवाभीतरीं । गजाननासी द्यावया ॥ ९ ॥ जवळ शेगांव जसें जसें । येऊं लागलें तसें तसें । स्वभावांत पडलासे । त्या गाईच्या पालट ॥ ११० ॥ समर्थांपुढें येतांक्षणीं । गाय झाली दीनवाणी । तिनें लोचनीं आणून पाणी । पाहिलें त्या पुण्यपुरुषा ॥ ११ ॥ महाराज म्हणाले अवघ्यांना । हा काय तुमचा मूर्खपणा । गाईस ऐशा यातना । देणें कांहीं बरें नव्हे ॥ १२ ॥ चारही पाय बांधलेत । गळा साखळदंड लाविलेत । शिंगांचीही तीच गत । केली चऱ्हाटें काथ्याच्या ॥ १३ ॥ ऐसा मोठा बंदोबस्त । शोभतसे वाघिणीप्रत । ही



गाय बिचारी साक्षात् । तिला न ऐसें करणें बरें ॥ १४ ॥ अरे खुळ्यांनो, ही गाय । अवघ्या जगाची आहे माय । तिला बांधिलें हाय हाय । केवढा कठीण प्रसंग आला ॥ १५ ॥ तिला आतांच करा मुक्त । ती न हुंदाडी कोणाप्रत । परी लावण्या तिला हात । छाती कोणाची होईना ॥ १६ ॥ जो तो पाहून मागें सरे । तेथ समर्थ आले त्वरें । आपुल्या त्या पुनीत करें । बंधनें तोडिलीं धेनूची ॥ १७ ॥ बंधनें अवघीं तुटतां भलीं । गाय गाडीच्या खालीं आली । पुढले पाय टेकती झाली । समर्थां वंदन करावया ॥ १८ ॥ खाली घालूनिया मान । प्रदक्षिणा त्या केल्या तीन । समर्थांचे दिव्य चरण । चाटूं लागली जिभेनें ॥ १९ ॥ ऐसा प्रकार तेथें झाला । तो अवघ्यांनीं पाहिला । समर्थांच्या प्रभावाला । शेषही वर्णू शकेना ॥ १२० ॥ समर्थ म्हणाले धेनूस । बाई कोणा न द्यावा त्रास । तूं या सोडून मठास । कोठेंही जाऊं नको ॥ २१ ॥ ऐसा घडतां प्रकार । अवघ्यांनीं केला जयजयकार । उच्च स्वरानें त्रिवार । समर्थांच्या नांवाचा ॥ २२ ॥ बाळापूरची मंडळी । बाळापुरा निघून गेली । गाय तेथेंच राहिली । शेगांवासी मठामध्यें ॥ २३ ॥ त्या दिवसापासून । ठावे न तिला चऱ्हाट जाण । सुज्ञ धेनूचे अवघे गुण । तिच्या ठायीं पातले ॥ २४ ॥ अजून त्या शेगांवातें । तिची संतती नांदते । जे कांहीं वदती ब्रह्मवेत्ते । तेंच येतें घडोन ॥ २५ ॥ असो एक कारंज्याचा । लक्ष्मण घुडे नांवाचा । विप्र वाजसनीय शाखेचा । धनकनक-संपन्न असे ॥ २६ ॥ त्यासी रोग झाला पोटांत । उपाय केले अत्यंत । परि न आला गुण किंचित् । खर्च सारा व्यर्थ गेला ॥ २७ ॥ त्यानें समर्थांची कीर्ति । कर्णोपकर्णी ऐकली होती ।

म्हणून सहपरिवारें सत्वर गती । आला शेगांवाकारणें ॥ २८ ॥ रोगव्यथेनें चालवेना । श्रोते तया लक्ष्मणा । दोघांतिघांनी उचलून जाणा । आणिले त्या मठांत ॥ २९ ॥ करण्या तुसता नमस्कार । असमर्थ होतें शरीर । त्याच्या कुटुंबानें पदर । समर्थांपुढें पसरिला ॥ १३० ॥ आणि म्हणाली दयाघना ! । मीं आपली धर्मकन्या । माझ्या पतीच्या यातना । हरण कराव्या आपण ॥ ३१ ॥ अमृताचें दर्शन । होतां कां यावें मरण । माझ्या कुंकवालागून । टिकवा हीच विनंती ॥ ३२ ॥ त्या वेळीं समर्थस्वारी । आंबा खात होती खरी । तोच फेकिला अंगावरी । त्या लक्ष्मणकांतेच्या ॥ ३३ ॥ जा दे हा पतीस खाया । व्याधि त्याची बरी व्हाया । तूं शोभसी त्यास जाया । पति–भक्ति–परायण ॥ ३४ ॥ यापुढें न कांहीं वदले । चिलीम ओढूं लागले । श्रीगजाननस्वामी भले । आपुल्या मठांत शेगांवीं ॥ ३५ ॥ भास्कर म्हणे ‘ अहो बाई । आतां न बसा ये ठाईं । आपल्या पतीस लवलाहीं । घेऊन जा कारंज्यातें ॥ ३६ ॥ प्रसाद आंब्याचा जो कां तुला । समर्थ-करीं प्राप्त झाला । तोच घाली खावयाला । आपुल्या पतीकारणें ॥ ३७ ॥ यानें तुझें होईल काम । गुण येईल अत्युत्तम । लक्ष्मणासी आराम । होईल आंबा खातांच ॥ ३८ ॥ बाई घेऊन आंब्याला । येती झाली कारंज्याला । प्रसाद खाऊं घातला । आंब्याचा आपल्या पतीस ॥ ३९ ॥ निजगृहीं जोडपें आलें । आप्त पुसूं लागले । शेगांवांत काय घडलें । तें सांगावें साकल्यें ॥ १४० ॥ बाईनें अवघें वर्तमान । कळविलें लोकांलागून । आंब्याचा तो प्रसाद म्हणून । दिला समर्थें मजलागीं ॥ ४१ ॥ आणि आज्ञा केली वरी । खाऊं घाला अत्यादरीं । आंबा प्रसाद निजकरीं । आपुल्या





* * * *

त्या पतीला ॥ ४२ ॥ त्याप्रमाणें मींहीं केलें । आज सकाळीं खाऊं घातलें । हें वैद्यांनीं जई ऐकिलें । तईं त्या वाटलें वाईट ॥ ४३ ॥ अहो बाई तुम्ही काय । केलेंत हें हाय हाय । आंबा हेंच कुपथ्य होय । या पोटांतील रोगाला ॥ ४४ ॥ माधवनिदानीं हेंच कथिलें । सुश्रुतानींहीं वर्णिलें । निघंटानें कथन केले । शारंगधर म्हणे ऐसेंच ॥ ४५ ॥ तुम्ही तो प्रसाद दिलेला । पाहिजे होता भक्षण केला । पत्नीचें पुण्य पतीला । उपयोगी पडतसे ॥ ४६ ॥ ऐसें वैद्य बोलले । आप्त अवघे घाबरले । जे ते टोचूं लागले । लक्ष्मणाच्या पत्नीस ॥ ४७ ॥ परी झालें अघटित । लक्ष्मणाचें पोट सत्य । रेच होऊन अकस्मात । मऊ होऊन गेलें हो ॥ ४८ ॥ शौच्यावाटें व्याधि गेली । हळूंहळूं शक्ति आली । पहिल्या परीच होती झाली । प्रकृति लक्ष्मणाची ॥ ४९ ॥ निसर्गाच्या बाहेरी । वैद्यशास्त्र कांहीं न करी । तेथें उपयोगी पडे खरी । कृपा देवसंतांची ॥ १५० ॥ लक्ष्मण बरा झाल्यावर । आला शेगांवीं सत्वर । म्हणे महाराजा माझें घर । पाय लावून पवित्र करा ॥ ५१ ॥ मी आलों त्याचसाठीं । चला कारंज्यास ज्ञानजेठी । मला न करा हिंपुटी । नाहीं ऐसें म्हणूं नका ॥ ५२ ॥ आग्रह त्याचा विशेष पडला । महाराज गेले कारंज्याला । तेधवां होते संगतीला । शंकर-भाऊ पितांबर ॥ ५३ ॥ घरीं नेऊन पूजा केली । दक्षिणा ती निवेदिली । अवघी संपत्ति आपुली । आहे मी कोण देणार ? ॥ ५४ ॥ परी एका ताटांत । कांहीं रुपये ठेविले सत्य । महाराज बघून त्याप्रत । ऐशा रितीं बोलले ॥ ५५ ॥ म्हणशी माझें कांहीं न उरलें । मग हे रुपये कोठून आणिले ? । लक्ष्मणा ऐंसे चाळे । दांभिकपणाचे करूं नको ॥ ५६ ॥ मला दिलें तूं आपलें घर । आतां उघडीं दार । फेकून देई रस्त्यावर । अवघीं

कुलपें येघवा ॥ ५७ ॥ लक्ष्मण कांहीं न बोलला । मौन धरून बैसला । परी समर्थें आग्रह धरिला । खजिन्याचें दार उघडी ॥ ५८ ॥ मीत मीत मोकळें द्वार । केलें त्यानें अखेर । खजिन्याच्या उमऱ्यावर । स्वतः जाऊन बैसला ॥ ५९ ॥ आणि म्हणाला महाराज यावें । वाटेल तें घेऊन जावें । ऐसें बोलला जरी बरवें । परी अन्यभाव अंतरींचा ॥ १६० ॥ हें त्याचें दांभिकपण । समर्था आलें कळोन । बहुरूप्याचें राजेपण । कोठून टिके बाजारीं ? ॥ ६१ ॥ जैसें कडू वृंदावन । वरून पाहतां दिसे छान । परी अंतरीं कडवटपण । पूर्ण त्याच्या भरलें असे ॥ ६२ ॥ सोडून त्याच्या घरासी । उपाशीं निघाले पुण्यरासी । दांभिकाच्या सदनासी । संत न होती तृप्त कदा ॥ ६३ ॥ तेथें त्याच्या घराची । वा धनदौलतीची । गरज समर्था नव्हती साची । ते वैराग्याचे सागर ॥ ६४ ॥ परी तो जें कांहीं बोलला । त्याचा सत्यपणा पाहिला । खोटेंपणाचा राग आला । म्हणून गेले उठोन ॥ ६५ ॥ जातां जातां बोलले । माझें माझें म्हणसी भलें । भोग आतां त्याचीं फळें । माझा उपाय त्यास नसे ॥ ६६ ॥ मी कृपा करावया । आलों होतों या ठायां । याहीपेक्षां दुप्पट द्याया । परी तें न तुझ्या प्रारब्धीं ॥ ६७ ॥ तेंच पुढें झालें सत्य । एका सहा महिन्यांत । अवघी लक्ष्मी झाली फस्त । त्या भिक्षेची वेळ आली ॥ ६८ ॥ म्हणून श्रोते परमार्थांत । खोटेपणा न खपे किंचित् । याचसाठीं हें चरित्र । समर्थें घडून आणिलें ॥ ६९ ॥ श्रीगजानन चिंतामणी । त्या गार काय शोभा आणी ? । वा सुवर्णालागुनी । भूषवावें का कथिलानें ? । ॥ १७० ॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । सदा माविक परिसोत । निज कल्याण व्हावया ॥ १७१ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ इति दशमोऽध्यायः समाप्तः ॥

* * * *









श्रीगजानन महाराजांनी कावळ्यांना यथेच्छ खाऊं दिले व पुन्हा न येण्यास सांगितले.

कुलपें येघवा ॥ ५७ ॥ लक्ष्मण काहीं न बोलला । मौन धरून बैसला । परी समर्थें आग्रह धरिला ।

श्रीगणेशाय नमः ॥ हे ओंकाररूपा पशुपती । हे भवानीवरा दक्षिणामूर्ति । ब्रह्मांडांत जितुक्या विभूति । तितकीं रूपें तुझीं देखा ॥ १ ॥ तुझें रूप जें निराकार । जेणें हें व्यापक चराचर । जें सर्वस्वीं आधार । अविद्या माया प्रकृतीला ॥ २ ॥ तें स्वरूप जाणावया । अशक्य आहे देवराया । म्हणून तूं करण्या दया । सगुण रूपें धरलींस ॥ ३ ॥ जैसें ज्याला वाटत । तैसें तो तुला भाग देत । नाभामुळें तुजप्रत । भिन्नत्व ये ना कधींही ॥ ४ ॥ शैव तुला शिव म्हणती । ब्रह्म बोलती वेदान्ती । रामानुजांचा सीतापती । वैष्णवांचा विष्णू तूं ॥ ५ ॥ उपासनेप्रमाणें । नांवें मिळालीं तुजकारणें । परी तूं अभिन्नपणें । सर्वांठायींच गवससी ॥ ६ ॥ तूं सोमनाथ विश्वेश्वर । हीम केदार ओंकार । क्षिप्रातटाकीं साचार । महांकाल तूंच कीं ॥ ७ ॥ नागनाथ वैजनाथ । घृष्णेश्वर वेरुळांत । त्र्यंबक तुला म्हणतात । गोदावरीच्या तटाकीं ॥ ८ ॥ तूं भीमाशंकर । मल्लिकार्जुन रामेश्वर । तूं गोकर्णरूपी शंकर । तूं महादेव शिंगणापुरीं ॥ ९ ॥ त्या अवघ्यांकारण । असो माझें साष्टांग नमन । माझ्या त्रितापांचें हरण । शीघ्र करी दीनबंधो ॥ १० ॥ देवा तुम्ही कुबेराला । क्षणांत धनपती केला । मग माझ्याविषयीं कां हो पडला । प्रश्न तुम्हांसी गिरिजापते ? ॥ ११ ॥ बाळकृष्णाच्या सदनासी । समर्थ आले दुसरे वर्षीं । त्या बाळापुरासी । दासनवमीकारणें ॥१२॥ सुकलाल बाळकृष्ण । या बाळापुरालागून । निःसीम भक्त होते दोन । त्यांची सरी न ये कोणा ॥ १३ ॥ या वेळीं बरोबर । होते पाटील भास्कर । बाळाभाऊ, पितांबर । गणू, जयदेव, दिंडोकार ॥ १४ ॥ उत्सव दासनवमीचा । सांग झाला तेथ साचा । दैवयोग भास्कराचा । तेथेंच आला आंढवून ॥ १५ ॥

एक कुत्रें पिसाळलेलें । भास्करा येऊन चावलें । तेणें लोक इतर भ्याले । म्हणती आतां हा पिसाळेल ॥ १६ ॥ उपाय अवघे व्यावहारिक । भास्करामी केले देख । कोण म्हणती निःशंक । डॉक्टरा घाडा बोलावणें ॥ १७ ॥ भास्कर म्हणे ते अवसरीं । वैद्याची ना जरूर खरी । माझा डॉक्टर आसनावरी । बैसला आहे गजानन ॥ १८ ॥ त्याचकडे मजला न्यावें । वृत्त अवघें कळवावें । ते सांगतील तें ऐकावें । आपला हेका करूं नका ॥ १९ ॥ गजाननांचे समोर । आणिला पाटील भास्कर । बाळाभाऊनें समाचार । अवघा समर्थांस श्रुत केला ॥ २० ॥ तो अवघा ऐकून । महाराज वदले हंसून । हत्या, वैर आणि ऋण । हें कोणासी चुकेना ॥ २१ ॥ सुकलालच्या गाईठायीं । द्वाडपणा जो होता पाही । तो या भास्करें लवलाही । शेगांवीं दवाडिला ॥ २२ ॥ तें तिचें द्वाडपण । कुत्रें येथें झालें जाण । तेंच जावलें येऊन । या पाटील भास्कराला ॥ २३ ॥ तिचा हरण्या द्वाडपणा । मशी यानें केली प्रार्थना । इचें प्यावया दूध जाणा । ऐसा भास्कर मतलबी ॥ २४ ॥ दूध पितां वाटलें गोड । आतां कां रे चाललें जड । नको ठेवूंस पडदा आड । वांचवूं कां मी सांग तुला ? ॥ २५ ॥ हें कुत्रें निमित्त झालें । तुझें आयुष्य मुळींच सरलें । आतां पाहिजे प्रयाण केलें । तूं या सोडून मृत्युलोका ॥ २६ ॥ जरी इच्छा असेल मनीं । वांचण्याची तुजलागूनी । तरी तुझें मी यापासूनी । रक्षण वेड्या करीन ॥ २७ ॥ परी ती होईल उसनवारी । जन्ममृत्यूची बाळा खरी । या अशाश्वताच्या बाजारीं । देणें घेणें चालत ॥ २८ ॥ बोल आतां झडकर । काय तुझा विचार । ऐसी कधीं ना येणार । पर्वणी ती जाण तुला ॥ २९ ॥ भास्कर बोले त्यावरी । मी अज्ञाण



सर्वतोपरी । जें असेल अंतरीं । आपुल्या तेंच करावें ॥ ३० ॥ लेंकुराचे अवघें हित । माता एक तें जाणत । ऐसें एकया अभंगांत । श्रीतुकोबा बोलले ॥ ३१ ॥ मी आपलें लेंकरूं । म्हणून विनंती कशास करूं ? । तूं अवघ्या ज्ञानाचा सागरू । अवघें कांहीं कळतें तुला ॥ ३२ ॥ ऐसें ऐकतां भाषण । संतोषले गजानन । खऱ्याप्रती समाधान । खरें बोलतां होतसे ॥ ३३ ॥ कोणी म्हणाले गुरुराया । भास्करासी वांचवा सदया । या कुत्र्यापासूनिया । तो आपुला भक्त असे ॥ ३४ ॥ महाराज म्हणती त्याकारण । हेंच तुझें अज्ञान । अरे वेड्या जन्ममरण । हीन मुळीं भ्रांति असे ॥ ३५ ॥ जन्मे न कोणी, मरे न कोणी । हे जाणावयालागुनी । परमार्थाचा उपाय जाणी । शास्त्रकारें कथन केला ॥ ३६ ॥ त्याचा उपयोग करावा । मोह समूळ सोडावा । प्रारब्धभोग भोगावा । निमूटपणें हेंच बरें । ॥ ३७ ॥ संचित-प्रारब्ध-क्रियमाण । हें भोगल्यावांचून । या बद्ध जीवालागून । सुटका होणें मुळींच नसे ॥ ३८ ॥ पूर्वजन्मीं जें करावें । तें या जन्मीं भोगावें । आणि तें भोगण्यासाठीं यावें । जन्मा हा सिद्धान्त असे ॥ ३९ ॥ या जन्मीं जें करावें । तें पुढच्या जन्मास उरवावें । असे किती सांग घ्यावे । फेरे जन्ममृत्यूचे ? ॥ ४० ॥ पूर्वजन्मीचें उर्वरित । भास्कराचें न उरलें सत्य । तो अवघ्यापून झाला मुक्त । मोक्षास जायाकारणें ॥ ४१ ॥ म्हणून आग्रह करूं नका । मार्ग त्याचा आडवूं नका । काय भास्करासारखा । भक्तराणा जन्मे पुन्हां ॥ ४२ ॥ पूर्वजन्माचें याचें वैरी । कुत्रें होतें निर्धारीं । म्हणून तें या बाळापुरीं । चावतें झालें भास्करास ॥ ४३ ॥ त्यानें अवघा आपुला । डाव येथें साधिला । तैसा जरी शेष उरला । द्वेष मनीं भास्कराच्या ॥ ४४ ॥ तरी तो

त्याचा द्वेष । कारण पुढील जन्मास । कारण होईल भास्करास । दावा आपुला उगवावया ॥ ४५ ॥ म्हणून पूर्वजन्मींचें वैर सरलें । या आतां न कांहीं शेष उरलें । भास्कराकारण भलें । अवघ्या उपाधि निरसल्या ॥ ४६ ॥ आतां मी इतकेंच करितों । दोन महिने वांचवितों । याला न पिसाळूं देतों । श्वानविषापासून ॥ ४७ ॥ तें न मी केलें जरी । हा जन्मास येईल पुन्हां परी । दोन महिने भूमिवरी । उरलें आयुष्य भोगावया ॥ ४८ ॥ ऐसें ज्ञान ऐकिलें । तें कित्येकांस नाहीं पटलें । मात्र बाळाभाऊ आनंदले । त्या बोधातें ऐकुनी ॥ ४९ ॥ भास्करा, तूं धन्य धन्य । संतसेवा केलीस पूर्ण । चुकलें तुझें जन्ममरण । काय योग्यता वानूं तुझी ? ॥ ५० ॥ ऐसा प्रकार झाल्यावरी । मंडळी आली शेगांवनगरीं । भास्कर बोले मधुरोत्तरीं । महाराजांच्या भक्तगणां ॥ ५१ ॥ बाळापूरची हकीकत । सांगे प्रत्येकाला इत्थंभूत । माझी विनंती जोडून हात । हींच तुम्हां भास्कर म्हणे ॥ ५२ ॥ महाराज लाधले शेगांवा । याचा विचार करावा । या कीर्तीचा अमोल्य ठेवा । सांभाळा स्मारक करून ॥ ५३ ॥ त्यांना स्मारकाची जरूर नाहीं । तें पुढीलांसाठीं पाही । तें स्मारक साक्षी देई । त्यांच्या अमोल साधुत्वाची ॥ ५४ ॥ पाहा आळंदीस ज्ञानेश्वर । समर्थ सज्जनगडावर । पवित्र केलें देहूनगर । त्या तुकोबारायानें ॥ ५५ ॥ त्यांचीं स्मारकें त्या त्या ठायां । ठेविलीं भव्य करूनिया । तोच पंथ अनुसराया । तुम्हीं झटावें मनापून ॥ ५६ ॥ ऐसें प्रत्येका सांगत । भास्कर राहिला निवांत । परी त्याच्या मनांत । ऐसें आलें एकदां ॥ ५७ ॥ हे मला हो हो म्हणती । माझी ऐकून विनंती ।



परी शंका येत चित्तीं । हो म्हणण्याची यांची मला ॥ ५८ ॥ त्यानें एकदां ऐसें केलें । अवघ्या लोकांस मिळविलें । एक्या ठायीं मठांत भले । महाराजांच्या अपरोक्ष ॥ ५९ ॥ बंकटलाल पाटील हरी । मारुती चंद्रभान कारभारी । जो खंडूजीच्या दुकानावरी । होता कारभार करीत ॥ ६० ॥ श्रीपतराव वावीकर । ताराचंद साहुकार । आणिक मंडळी होती इतर । नांवें कुठवर सांगावीं ? ॥ ६१ ॥ मिळवूनिया त्या लोकांला । भास्करें पदर पसरीला । माझा आतां संबंध उरला । दोन महिनेच तुमच्याशीं ॥ ६२ ॥ माझ्या मनीं ऐशी आस । समर्थांचें स्मारक खास । भव्य व्हावें वऱ्हाडास । या शेगांवामाझारी ॥ ६३ ॥ तुम्ही हें करितों म्हणा । तेणें आनंद माझ्या मना । होऊन सुखें करीन गमना । मी वैकुंठाकारणें ॥ ६४ ॥ संतसेवा कधींही । अनाठायीं जाणार नाहीं । इच्छा जयाची ज्या ज्या होई । ती ती संत पुरविती ॥ ६५ ॥ स्मारक ऐसें करावें । अवघ्यांनींच वाखाणावें । पाहून त्या डोलावें । प्रत्येकानें आपुल्या मनीं ॥ ६६ ॥ ऐसेंच स्मारक करण्याची । शपथ वाहा समर्थांची । ही विनंति अखेरीची । माझी ती मान्य करा ॥ ६७ ॥ तें अवघ्यांनीं कबूल केलें । भास्कराचें स्थीरावलें । यायोगें तें चित्त भलें । रुखरुख मनाची संपली ॥ ६८ ॥ उत्तरोत्तर आनंदवृत्ती । भास्कराची वाढत होती । जैसी लेंकुरें आनंदती । पुढील सणाच्या आशेनें ॥ ६९ ॥ माघ वद्य त्रयोदशीस । महाराज वदले भास्करास । चाल त्र्यंबकेश्वरास । जाऊं आपण शिवरात्रीला ॥ ७० ॥ तो त्र्यंबकराजा कर्पूरगौर । भवभयांतक भवानीवर । जो आहे झाला स्थीर । श्रीगोदावरीच्या तटातें ॥ ७१ ॥ तें ज्योतिर्लिंग मनोहर । करी पातकांचा संहार । नको करूंस आतां

उशीर । जाऊं गंगास्नानाला ॥ ७२ ॥ भास्करा, त्या त्र्यंबकेश्वरीं । पहाड एक ब्रह्मगिरी । जेथें औषधी नानापरी । बहुसाल असती उगवलेल्या ॥ ७३ ॥ त्या ब्रह्मगिरीवर स्थित । आहेत पहा गहनीनाथ । ज्यांना आहेत अवगत । गुणधर्म औषधींचे ॥ ७४ ॥ वेड्या कुत्र्याच्या विषावरी । तेथें औषधी आहे खरी । तिचा उपयोग सत्वरीं । करून पाहूं येथवां ॥ ७५ ॥ भास्कर म्हणे गुरुनाथा । आतां औषधी कशाकरतां ? तुमची आहे अगाध सत्ता । औषधीहून आगळी ॥ ७६ ॥ आपुल्या कृपेनें भलें । विष बाळापुरींच निमालें । आयुष्याचे आहेत उरले । दोन महिनेच आतां कीं ॥ ७७ ॥ म्हणून वाटे मजप्रती । शेगांवींच राहूं गुरुमूर्तीं । त्र्यंबकेश्वर आम्हांप्रती । तुम्हीच आहांत साक्षात् ॥ ७८ ॥ गोदावरी तुमचे चरण । तेथेंच मी करी स्नान । अन्य तीर्थांचें प्रयोजन । मला न आतां राहिलें ॥ ७९ ॥ ऐसी ऐकतां त्याची वाणी । समर्थ वदले हांसोनी । हें जरी खरें जाणी । तरी तीर्थमहिमा मानावा ॥ ८० ॥ चाल नको करूं उशीर । पाहूं तो त्र्यंबकेश्वर । बाळाभाऊ पीतांबर । यांसही घे बरोबरी ॥ ८१ ॥ मग ती मंडळी निघाली । शेगांवाहून भली । शिवरात्रीस येती झाली । त्र्यंबकेश्वराकारणे ॥ ८२ ॥ कुशावर्ती केलें स्नान । । घेतलें हराचें दर्शन । गंगाद्वारा जाऊन । पूजन केलें गौतमीचें ॥ ८३ ॥ वंदिली माय निलांबिका । तेवीं गहनी निवृत्तिनाथ देखा । तेथून आले नाशिका । गोपाळदासास भेटावया ॥ ८४ ॥ हा गोपाळदास महंत । काळ्या रामाच्या मंदिरात । धुनी लावून द्वारांत । पंचवटीच्या बसलासे ॥ ८५ ॥ राममंदिरासमोर । एक पिंपळाचा होता पार ।



शिष्यांसहि साधुवर । तेथें जाऊन बैसले ॥ ८६ ॥ गोपाळदासास आनंद झाला । बोलले जवळच्या मंडळीला । आज माझा बंधु आला । वऱ्हाडांतून गजानन ॥ ८७ ॥ जा घ्या त्यांचें दर्शन । अनन्यभावें करून । माझी ही भेट म्हणून । नारळसाखर त्यांसी द्या ॥ ८८ ॥ हा हार घाला कंठांत । तो मी एक साक्षात् । देह भिन्न म्हणून द्वैत । आम्हां उभयतीं मानूं नका ॥८९॥ शिष्यांनीं तैसेंच केलें । दर्शन घ्याया अवघे आले । कंठामाजीं घातिले । दिलेल्या पुष्पहाराला ॥ ९० ॥ नारळ आणि खडीसाखर । ठेविली स्वामीसमोर । ती पाहून गुरुवर । ऐसें बोलले भास्कराला ॥९१॥ हा प्रसाद अवघ्यांस वाटी । परी न होऊं देई दाटी । माझ्या बंधूची झाली भेटी । आज या पंचवटींत ॥ ९२ ॥ माझें येथील काम झालें । आतां नाशकाचें राहिलें । म्हणून पाहिजे तेथें गेले । धुमाळ वकीलाच्या घरा ॥ ९३ ॥ महाराज आले नाशकांत । लोक दर्शना जमले बहुत । बारीक सारीक गोष्टी अमित । तेथें असतां जहाल्या ॥ ९४ ॥ त्या अवघ्या सांगतां । विस्तार होईल उगीच ग्रंथा । म्हणून देतों संक्षेप आतां । त्याची क्षमा करा हो ॥९५॥ तेथें राहून कांहीं दिवस । महाराज आले शेगांवास । तो अडगांवीं नेण्यास । श्यामसिंग पातला ॥ ९६ ॥ त्यानें आग्रह केला फार । समर्थें दिलें उत्तर । रामनवमी झाल्यावर । येऊं आम्ही अडगांवा ॥ ९७ ॥ आतां तूं जावें परत । उगा न पडे आग्रहांत । श्यामसिंग मुळींच भक्त । निःसीम होता समर्थांचा ॥ ९८ ॥ तों आला तैसा परत गेला । आपुल्या त्या अडगांवाला । पुन्हां ओते येतां झाला । रामनवमीस शेगांवीं ॥ ९९ ॥ उत्सव करून शेगांवांत । समर्थांना शिष्यांसहित । आला घेऊन अडगांवांत ।

हनुमानजयंतीकारणें ॥ १०० ॥ अडगांवीं असतां समर्थस्वारी । चमत्कार झाले नानापरी । एके दिवशीं दोन प्रहरीं । भास्कर लोळविला फुपाट्यांत ॥ १ ॥ छातीवरी बैसून । भास्करा केलें ताडन । लोंक पहाती दुरून । परी जवळी कोणी जाईना ॥ २ ॥ बाळाभाऊ जवळ होता । तो म्हणाला सद्गुरुनाथा । भास्करासी सोडा आतां । बेजार झाला उन्हानें ॥ ३ ॥ तैं म्हणाला भास्कर । बाळाभाऊ न जोडा कर । माझा हा साक्षात् ईश्वर । काय करलि तें करूं दे ॥ ४ ॥ लोकांसी वाटती चापट्या दिल्या । मला होतात गुदगुल्या । अनुभवाच्या गोष्टी भल्या । अनुभवीच जाणती ॥ ५ ॥ पुढें घेऊन भास्करासी । महाराज आले विन्हाडासी । त्या अडगांव ग्रामासी । उतरलेल्या ठिकाणास ॥ ६ ॥ बाळाभाऊस बोलले । अवघे आतां दोन उरले । भास्कराचे दिवस भले । पंचमीला जाईल तो ॥ ७ ॥ आज मीं जें केलें कृत्य । ताडनाचें रानांत । तें कां हें तुजप्रत । आलें असेल कळोनी ॥ ८ ॥ तुजला या भास्करानीं । मारविले होतें छत्रीनीं । शेगांवीं माझ्या करांनीं । तें आहे कां ध्यानांत ? ॥ ९ ॥ तें क्रियामाण नासावया । त्यास मीं मारिलें ये ठायां । ह्या एकाच गोष्टीवांचूनिया । अन्य नव्हता हेत कांहीं ॥ ११० ॥ उत्सव पूर्ण झाल्यावर । त्या अडगांवींचा साचार । काय घडला प्रकार । तो आतां परियेसा ॥ ११ ॥ उत्सवाचा काला झाला । वद्य पंचमी दिवस आला । एक प्रहर दिवसाला । समर्थ म्हणती भास्करासी ॥ १२ ॥ भास्करा तुझें प्रयाण । आज दिवशीं आहे जाण । पद्मासन घालून । पूर्वाभिमुख बैसावें ॥ १३ ॥ चित्त अवघें स्थिर करी । चित्तीं सांठवावा हरी । वेळ आली जवळ खरी । आतां सावध असावें ॥ १४ ॥



इतर जनाकारण । म्हणूं लागले करा भजन । "विठ्ठल विठ्ठल नारायण" । ऐसें उच्च स्वरानें ॥ १५ ॥ हा तुमचा बंधु मला । जातो आज वैकुंठाला । त्याच्या करा पूजनाल । माळ बुका वाहून ॥ १६ ॥ भास्करें घातलें पद्मासन । नासाग्री दृष्टि ठेवून । वृत्ति अवघ्या केल्या लीन । अंतर्मुख होऊनिया ॥ १७ ॥ भक्त भास्करा पूजिती । माळा बुका वाहती । तें कौतुक पाहाती । समर्थ दूर बैसून ॥ १८ ॥ भजन एक झालें प्रहर । माध्यान्हीस आला दिनकर । महाराजांनीं "हरहर" । शब्द केला मोठ्यानें ॥ १९ ॥ त्यासरसा प्राण गेला । भास्कराचा वैकुंठाला । संतांनीं हातीं धरिलें ज्याला । तो पाहुणा हरीचा ॥ १२० ॥ लोक पुसती महाराजास । कोठे करणें समाधीस । या भास्कराच्या शरीरास । कोठें न्यावें ठेवावया ? ॥ २१ ॥ समर्थ अवघ्यास सांगती । द्वारकेश्वर जो पशुपती । ज्याच्या सन्निध आहे सती । तेथें ठेवा भास्कराला ॥ २२ ॥ ऐसी आज्ञा होतां-क्षणीं । विमान बांधिलें लोकांनीं । केळीचे खांब लावूनी । चहूं बाजूंस विबुध हो ॥ २३ ॥ आंत ठेविलें कलेवर । पुढें भजनाचा होय गजर । मिरवित आणिला भास्कर । द्वारकेश्वराचियापाशीं ॥ २४ ॥ सांगविधि समाधीचा । ते ठायीं झाला साचा । लोक म्हणती महाराजांचा । परम भक्त गेला हो ॥ २५ ॥ दुसरे दिवसापासून । समाधीच्या सन्निध जाण । होऊं लागले अन्नदान । गोरगरीबांकारणें ॥ २६ ॥ स्थान द्वारकेश्वराचें । अडगांवाच्या सन्निध साचें । अंतर एक मैलाचें । चिंचगांवापासून उत्तरेस ॥ २७ ॥ जागा द्वारकेश्वराची । परमरमणीय होती साची । झाडी वृक्षांची । होती विशेष ते ठायां ॥ २८ ॥ निंब अश्वत्थ मांदार । आम्र वट औदुंबर । ऐसे वृक्ष

होते इतर । शिवाय कांहीं फुरझाडें ॥ २९ ॥ अडगांव अकोलीच्या मध्यंतरीं । हें ठिकाण निर्धारी ।
तेथें समाधि दिधली खरी । समर्थांनीं भास्कराला ॥ १३० ॥ दहा दिवस अन्नदान । झाले याचें
वर्णन । तुम्ही नुकतेंच केलें श्रवण । संतभंडारा नांव ज्याचें ॥ ३१ ॥ चिंचवृक्षांच्या सावलींत ।
जेवाया बसे पंगत । तयीं कावळे अतोनात । त्रास देऊं लागले ॥ ३२ ॥ काव काव ऐसें करिती ।
द्रोण पात्रींचे उचलून नेती । मलोत्सर्ग तोही करिती । जेवणारांच्या अंगावर ॥ ३३ ॥ त्या योगें
लोक त्रासले । कावळ्यांस हाकूं लागले । भिल्लांनीं ते तयार केले । तीरकमटे त्या मारावया
॥ ३४ ॥ तईं बोलले गजानन । अवघ्या लोकांलागून । नका मारूं त्याकारण । अपराध त्यांचा
कांहीं नसे ॥३५॥ या भंडाऱ्यांत येण्याचा । हेतु इतकाच आहे त्यांचा । प्रसाद आपणा भास्कराचा ।
इतरांपरीच मिळावा ॥ ३६ ॥ कां की हा भास्कर । वैकुंठी गेला साचार । हा पितृलोकावर । नाहीं
मुळींच राहिला ॥ ३७ ॥ दहा दिवसपर्यंत । प्राण अंतरिक्षांत । राहे परिभ्रमण करित । सपिंडी
होतां जाय पुढें ॥ ३८ ॥ त्या अकराव्या दिवशीं । बळीं देती कावळ्यांशीं । काक जेव्हां स्पर्शेल
त्यासी । तेव्हांच प्राण जातो पुढें ॥ ३९ ॥ त्या बलीदानाचें । कारण भास्करा नुरलें साचें ।
म्हणून या कावळ्यांचे । पित्त गेलें खवळून ॥ १४० ॥ आत्मा या भास्कराचा । मुळीच मुक्त झाला
साचा । तो पाहुणा वैकुंठीचा । झाला आहे येधवां ॥ ४१ ॥ या सोमसूर्य लोकांचें । कारण त्यासी
नुरलें साचें । म्हणून पिंडदानाचें । नुरलें पाहा प्रयोजन ॥ ४२ ॥ जयाला न ऐसी गती ।
त्याच्यासाठीं पिंड देती । कावळ्यांची वाट पाहाती । पिंड ठेवून कलशावर ॥ ४३ ॥ म्हणून कावळे



रागावलें । त्यांनीं हें जाणीतलें । भास्करानें गमन केलें । एकदम वैकुंठ लोकाला ॥ ४४ ॥ म्हणून
आम्हां प्रसाद त्यांचा । मिळूं द्या या भंडाऱ्याचा । ऐसा विचार कावळ्यांचा । दिसतो या
कृतीनें ॥ ४५ ॥ तुम्ही त्यांस मारूं नका । मीच तया सांगतो देखा । अहो जिवांनों माझें ऐका ।
गोष्ट आतां सांगतों जी ॥ ४६ ॥ तुम्ही उद्यांपासोन । वर्ज्य करा हें ठिकाण । ना तरी भास्करा-
लागून । येईल माझ्या कमीपणा ॥ ४७ ॥ आज प्रसाद घेऊन । तुम्ही तृप्त व्हा अवघेजण । मात्र
उद्यांपासोन । या स्थळासी येऊं नका ॥ ४८ ॥ ऐसें महाराज बोलले । तें भाविकांसी अवघें पटलें ।
परि कुत्सित जे कां बसले । होते त्या मंडळींत ॥ ४९ ॥ ते एकमेकांलागुनी । म्हणते झालें हांसोनी ।
ही गजाननें केली वाणी । अस्थानीं कीं निरर्थक ॥ १५० ॥ पक्षी कुठें कां वागतात । मानवाच्या
आज्ञेंत ? । पाहूं याची प्रचीत । उद्यां मुद्दाम येऊनी ॥ ५१ ॥ हे वेडे कांहीं बोलती । भाविकां नादी
लाविती । आपलें स्तोम माजविती । संतत्वाचें निरर्थक ॥ ५२ ॥ अहो साजेल तें बोलावें । जें कां
पचेल तेंच खावें । उसनें न कधीं आणावें । अवसान तें अंगांत ॥ ५३ ॥ दुसरे दिवशीं ते कुत्सित ।
मुद्दाम पाहाया आले तेथ । तों एकही ना दृष्टीप्रत । पडला त्यांच्या कावळा ॥ ५४ ॥ मग
मात्र चकित झालें । समर्थांसी शरण आले । बारा वर्षे तेथ भले । कावळे न आले श्रोते हो ॥ ५५ ॥
चौदा दिवस झाल्यावरी । गजानन फिरलें माघारीं । येते झाले शेगांव नगरी । आपल्या उर्वरित
शिष्यांसह ॥ ५६ ॥ श्रोते त्या शेगांवांत । एक गोष्ट घडली अघटित । ती ऐका सात्रचित्त । सांगतों
मी येधवा ॥ ५७ ॥ होतें साल दुष्काळाचें । म्हणून एका विहिरीचें । काम चाललें खोदण्याचें ।

सुरुंगातें लावून ॥ ५८ ॥ विहीर दोन पुरुषांवर । गेली, खोल साचार । खडक काळा लागला थोर । गती खुंटली पहारीची ॥ ५९ ॥ म्हणून भोकें करून । आंत दारू ठांसून । सुरुंगाच्या साह्यें करून । काम फोडण्याचें सुरुं झालें ॥ १६० ॥ चारी बाजूंस भोके चार । केलीं पहारीनें तयार । दारू ठासिली अखेर । आंत दोऱ्या घालूनी ॥ ६१ ॥ एरंड पुंगळ्या पेटवून । सोडल्या चारी दोऱ्यांतून । तों मध्येंच बैसल्या अडकून । दोऱ्यांचीया गांठीवरी ॥ ६२ ॥ पुंगळी खाली जाईना । दारूस विस्तव लागेना । पाणी दम धरीना । आलें जवळीं सुरुंगाच्या ॥ ६३ ॥ तैं कामावरचा मिस्तरी । विचार करी अंतरीं । सुरुंगास लागल्या वारी । सुरुंग वाया जाईल कीं ॥ ६४ ॥ म्हणून या गणू जवऱ्याला । मिस्तरी तो बोलला । तूं उतरून विहिरीला । पुंगळ्या थोड्या सरकीव ॥ ६५ ॥ आणि तूं येई लौकर वरी । पुंगळ्या जातील तोंवरी । वाराचिया शेजारी । म्हणजे काम होईल ॥ ६६ ॥ त्या पुंगळ्या सरकवण्यासी । कोणी न धजे जावयासी । म्हणून या गणू जवऱ्यासी । मिस्तरीनें दटाविलें ॥ ६७ ॥ काय करितो बिचारा । दारिद्र्य होते ज्याच्या पदरां । त्याच्यावरी चाले जोरा । यज्ञास बळी बोकडाचा ॥ ६८ ॥ या गणू जवऱ्याची । निष्ठा समर्थांवरी साची । आज्ञा होतां मिस्तरीची । गणू आंत उतरला ॥ ६९ ॥ एक पुंगळी सरकविली । ती तात्काळ तळा गेली । दारूप्रती जाऊन भिडली । गणू आंत सांपडला ॥ १७० ॥ दुसरीस जों घाली हात । पुंगळी सरकवण्याप्रत । तों पहिला सुरुंग उडाला सत्य । मग काय विचारीता ? ॥ ७१ ॥ गणू म्हणे विहिरींतून । समर्था ये धांवून । माझें आतां रक्षण । तुझ्यावीण



कोण करी ? ॥ ७२ ॥ विहिरीमाजी धुराचा । डोंब झाला होता साचा । दुसरा सुरुंग पेटण्याचा । अवधि उरला थोडका ॥ ७३ ॥ तो गणू जवऱ्या भली । कपार हातीं लागली । त्या कपारींत बैसली । स्वारी गणू जवऱ्याची ॥ ७४ ॥ एकामागून एकांनीं । पेट घेतला सुरुंगानीं । उडाले सुरुंग ऐसें तिन्ही । दगड अपार निघाले ॥ ७५ ॥ छिन्न भिन्न शरीर । झालें असेल साचार । डोकावून पाहाती नारीनर । आंत गणू जवऱ्याला ॥ ७६ ॥ तो कोठे दिसेना । जनांच्या नाना कल्पना । दगडाप्रमाणें गणू जाणा । उडाला असेल बाहेर ॥ ७७ ॥ त्याचें आसमंत भागांत । कोठें तरी असेल प्रेत । पडलेलें त्या शोधण्याप्रत । माणूस कोणी पाठवा ॥ ७८ ॥ मिस्तरींचा शब्द ऐकिला । आंतून गणू बोलला । अहो मिस्त्री नाहीं मेला । गणू आहे विहिरींत ॥ ७९ ॥ गजाननांच्या कृपेनीं । मी वांचलों या ठिकाणीं । बसलों आहे दडोनी । या पहा कपारींत ॥ १८० ॥ परी कपारीच्या तोंडाला । धोंडा एक मोठा पडला । त्यामुळें बाहेर मला । येतां येत नाहीं की ॥ ८१ ॥ गणूचे शब्द ऐकले । लोक अवघे आनंदले । लोक खाली उतरले । तो धोंडा काढावया ॥ ८२ ॥ दहापांच जणांनीं । धोंडा सरकाविला पहारींनीं । गणूस बाहेर काढूनी । घेऊन आले वरते त्या ॥ ८३ ॥ वरती येतांच गांवात । गणू गेला पळत पळत । समर्थांच्या मठांत । दर्शन त्यांचें घ्यावया ॥ ८४ ॥ गणू दर्शना येतांक्षणीं । बोलले त्या कैवल्यदानी । गण्या कपारींत बैसोनी । किती धोंडे उडविलेस ? ॥ ८५ ॥ त्यांत मोठा धोंडा तुला । रक्षणास येऊन बैसला । कपारीच्या तोंडाला । म्हणून तूं वांचलास ॥ ८६ ॥ पुन्हां ना ऐसें साहस करी । पुंगळीवरून

सुटल्यापरी । मधेंच तिला जाऊन करीं । कशाही प्रसंगीं धरूं नये ॥ ८७ ॥ आ तुझें गंडांतर । आज निमालें साचार । गणूप्रती पाहाया इतर । लोक आले गांवींचें ॥ ८८ ॥ गणू म्हणे सद्गुरुनाथा । सुरुंग चारी पेटतां । तूंच मला देऊन हातां । कपारींत बैसाविलें ॥ ८९ ॥ म्हणून मी वांचलों । तुझें पाय पाहाया आलों । ना तरी असतों मेलों । विहिरीमाजी गुरुराया ! ॥ १९० ॥ ऐसें गजानन-कृपेचें । माहिमान आहे थोर साचें । तें साकल्यें वर्णण्याचें । मसीं नाहीं सामर्थ्य ॥ ९१ ॥ श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । आल्हादावो माविकांप्रत । हेंच इच्छी दासगणू ॥ १९२ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति एकादशोऽध्यायः समाप्तः ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १२.



श्रीगजानन महाराजांचा पितांबराने धावा केल्याबरोबर वठलेल्या वृक्षाला पालवी फुटली.

सुटल्यापरी । मधेंच तिला जाऊन करीं । कशाही प्रसंगीं धरूं नये ॥ ८७ ॥ आ तुझें गंडांतर । आज
निमालें साचार । गणूप्रती पाहाया इतर । लोक आले गांवींचें ॥ ८८ ॥ गणू म्हणे सद्गुरुनाथा ।



श्रीगणेशाय नमः ॥ हे गणाधीशा गणपती । मयूरेश्वरा विमलकीर्ति । माझ्या हृदयीं करून वस्ती । ग्रंथ कळसास नेई हा ॥ १ ॥ तूं ज्ञानबुद्धीचा दाता । तूं भक्तमनोरथ पुरविता । विघ्नगातें संहारिता । तूंच एक गणराया ॥ २ ॥ तूं साक्षात् चिंतामणी । चिंतिलेलें देशी जाणीं । आपुल्या भक्तालागूनी । ऐसें पुराणें म्हणतात ॥ ३ ॥ माझ्या मनींची अवघीं चिंता । लयास नेई एकदंता । लंबोदरा पार्वतीसुता । भालचंद्रा सिंदुरारे ॥ ४ ॥ असो बच्चुलाल अग्रवाला । होता एक अकोल्याला । धन-कनक-संपन्न भला । मनाचाही उदार जो ॥ ५ ॥ त्यानें हकिकत कारंज्याची । म्हणजे लक्ष्मणपंत घुड्याची । कर्णोपकर्णीं ऐकिली साची । तेणें साशंक जाहला ॥ ६ ॥ तें खरें खोटें पहाण्यास । विचार करी चित्तास । तों एकें समयास । महाराज आले अकोल्याला ॥ ७ ॥ येऊन बच्चुलाला घरीं । बैसते झाले ओट्यावरी । कीं गजानन साक्षात्कारी । भक्त आपुला जाणून ॥ ८ ॥ बच्चुलाला आनंद झाला । तो समर्थासी ऐसें वदला । आज गुरुराया वाटतें मला । आपली पूजा करावी ॥ ९ ॥ ऐसें ऐकतां भाषण । समर्थें तुकाविलीं मान । जें साक्षात् असे चिन्ह । श्रोते संमती दिल्याचें ॥ १० ॥ बच्चुलालानें तयारी । तात्काळ केली ओट्यावरी । षोडशोपचारें अत्यादरीं । पूजन त्यानें आरंभिलें ॥ ११ ॥ प्रथमतः घातलें मंगलस्नान । नानाविध उटणीं लावून । मग करविलें परिधान । वस्त्र पीतांबर जरीचा ॥ १२ ॥ शालजोडी अंगावरी । बहुमोल घातली काश्मीरी । एक जरीचा रुमाल शिरीं । अभ्रेस्मी आणून बांधिला ॥ १३ ॥ गोफ घातिला गळ्यांत । सलकडीं तीं हातांत । करांच्या दाही बोटांत । मुद्रिका घातल्या नानापरी ॥ १४ ॥ बहुमोल हिऱ्याची ।

वामकरीं घातिली पौंची । रत्नजडीत कंठ्याची । कंठीं शोभा विशेष ॥ १५ ॥ जिलेबी राघवदास पेढे । नैवेद्यास ठेविलें पुढें । त्रयोदश गुणी ठेविले विडे । एक्या लहान तबकांत ॥ १६ ॥ अष्टगंध अर्गजा अत्तर । सुवासिक लाविलें फार । त्यानें अवघ्या अंगभर । गुलाबपाणी शिंपडीलें ॥ १७ ॥. एका सुवर्णाच्या ताटीं । दक्षिणा ठेविली शेवटीं । ती होती फार मोठी । रुपये होन मोहोरांची ॥ १८ ॥ बेरीज करतां दहा हजार । येईल ती साचार । ऐशी दक्षिणा होती थोर । किती वर्णन करूं तिचें ॥ १९ ॥ श्रीफल पुढें ठेवून । विनयें केलें भाषण । महाराज माझें इच्छी मन । राममंदिर बांधावया ॥ २० ॥ या माझ्या ओट्यावरी । अडचण होतसे भारी । मंडप तो घातला जरी । उत्सवासी गुरुराया ॥ २१ ॥ त्या माझ्या मनोरथा । पूर्ण करी ज्ञानवंता । ऐसें म्हणून ठेविला माथा । अनन्य भावें पायांवरी ॥ २२ ॥ त्यावरी साधु गजानन । देते झाले आशीवर्चन । श्रीजानकीजीवन । तुझा करील पूर्ण हेतू ॥ २३ ॥ असो, आज तूं हें काय केलें ? । मला पोळ्याचा बैल बनविलें । हे अलंकार घालून भले । याचें काय कारण ? ॥ २४ ॥ मी न बैल पोळ्याचा । अथवा घोडा दसऱ्याचा । मला या दागदागिन्यांचा । काय सांग उपयोग ? ॥ २५ ॥ अरे हें अवघें विष । मला नको त्यांचा स्पर्श । या नसत्या उपाधीस । माझ्या मागें लावूं नको ॥ २६ ॥ अथवा तूं मोठा श्रीमान । हें दाखवाया कारण । केलेंस कां हें प्रदर्शन । सांग मसी बच्चुलाला ? ॥ २७ ॥ जें आवडतें जयासी । तेंच द्यावें तयासी । मी वेडापिसा संन्यासी । नागवा फिरतो गांवभर ॥ २८ ॥ हें अवघें तुझे तुला । लखलाभ असो बच्चुलाला । तुम्हां प्रापंचिकाला । या द्रव्याची जरूर ॥ २९ ॥

माझा यजमान भिमातटीं । उभा विटेसी जगजेठी । तो काय माझ्यासाठी । हें वैभव द्यावा तयार नसे ? ॥ ३० ॥ ऐसें म्हणून काढिले । दागिने अंगावरचे भले । चहूं बाजूंस फेंकियले । वस्त्रांचीही तीच गती ॥ ३१ ॥ दोन पेढे खाऊन । निघून गेले गजानन । हा प्रकार अवलोकून । केला शोक अकोल्यांत बहुतांनीं ॥ ३२ ॥ त्यांत कांहीं कारंज्याचे । लोक हजर होते साचे । ते म्हणती आपुल्या वाचें । अभागी आमुचा लक्ष्मण ॥ ३३ ॥ त्यानें बच्चुलालापरी । पूजन केलें आपल्या घरीं । परी कचरला अंतरीं । मोह धनाचा धरून ॥ ३४ ॥ वरघडीचें भाषण । केलें विनय दाखवून । तें कां समर्थांकारण । समजणे अशक्य आहे हो ? ॥ ३५ ॥ जेवीं पूजा दांभिकांची । शब्दमयीं असते साची । पूर्तता महावस्त्राची । होते त्यांची अक्षतेनें ॥ ३६ ॥ 'शर्कराखंडखाद्यानि' । ऐसें म्हणोनिया वदनीं । कुचका दाणा आणोनी । ठेवीती पुढें सुईमुगाचा ॥ ३७ ॥ अशा दांभिक पूजनाचें । फलही त्याच स्वरूपाचें । वाटोळें लक्ष्मणाचें । याच कृतीनें झालें हो ॥ ३८ ॥ हा बच्चुलाल धन्य धन्य । जैसे केलें भाषण । तैसेंच ठेविलें वर्तन । जवाहून न आगळें ॥ ३९ ॥ आतां याच्या वैभवाला । ओहोट हा ना शब्द उरला । संतकृपा झाली ज्याला । तो सुखीच राहातसे ॥ ४० ॥ बच्चुलालानीं तपास । केला अवघ्या अकोल्यास । परी न लागला थांग त्यास । समर्थांचा कोठेंही ॥ ४१ ॥ असो एक पितांबर नावाचा । शिष्य शिंपी जातीचा । होता गजानन महाराजांचा । शेगांवीं मठामध्यें ॥ ४२ ॥ त्यानें सेवा बहुत केली । तपश्चर्या फळा आली । एके दिनीं ऐसी झाली । गोष्ट ऐका मठांत ॥ ४३ ॥ फाटके तुटके धोतर । नेसला

होता पितांबर । ते पाहून गुरुवर । ऐशा रीती बोलले ॥ ४४ ॥ अरे तुझें नांव पितांबर । नेसण्या न धडकें धोतर । ढुंगणास पाहाती नारीनर । तें तरी झांक वेड्या ! ॥ ४५ ॥ नांव म्हणे सोनुबाई । हातीं कथलाचाही' वाळा नाहीं । नांव पाहतां गंगाबाई । आणि तडफडे तहानेनें ॥ ४६ ॥ तशांतलाच प्रकार । आहे तुझा साचार । हें फाटकें धोतर । पोतेऱ्याच्या उपयोगी ॥ ४७ ॥ तेंच नेसून बैससी । ढुंगण जगाला दाविसी । हा घे दुपटा देतो तुसी । नेसावयाकारणें ॥ ४८ ॥ तो न करितां अनमान । राहे बाळा नेसून । यासी नको सोडू जाण । कोणी कांहीं केलें तरी ॥ ४९ ॥ पितांबर दुपेटा नेसला । हें असह्य झाले इतरांला । भाऊच घातकी भावाला । होतो स्वार्थ दृष्टीनीं । ॥ ५० ॥ तो वेडावांकडा प्रकार । कशास बोलूं साचार । गटराचें उघडितां द्वार । घाण मात्र सुटते हो ॥ ५१ ॥ श्रीगजानन स्वामीप्रत । शिष्य होते असंख्यात । परी अधिकारी तयांत । दोन्ही हातांच्या बोटांइतके ॥ ५२ ॥ पाहा श्रोते कांतारी । वृक्ष असती नानापरी । त्यातून कचित् कोठें तरी । नजरेस पडतो चंदनतरु ॥ ५३ ॥ त्यापरीच होते येथें । त्यांच्या शिष्यमंडळीतें । कांहीं शिष्य पितांबराते । टोचूं लागले निरर्थक ॥ ५४ ॥ हेंच कां तुझें शिष्यपण । वस्त्र करिसी परिधान । जें कां समर्थांकारण । ल्यावयाच्या उपयोगी ॥ ५५ ॥ तुझी भक्ती कळून आली । तूं खुशालचंद अससी मुळीं । तूं राहूं नको ये स्थळीं । अपमान करण्या सद्गुरूंचा ॥ ५६ ॥ तैं पितांबर म्हणाला । मी न गुरूचा अपमान केला । उलट मान ठेविला । आज्ञा ऐकून तयांची ॥ ५७ ॥ वस्त्र हें मज त्यांनी दिलें । नेसावया सांगितलें । तेंच मी हो परिधान केलें । ही का



झाली अवज्ञा ? ॥ ५८ ॥ ऐसी भवती न भवती झाली । शिष्यांत तेढ माजली । ती मिटवावया माव केली । ऐशा रीतीं गजाननें ॥ ५९ ॥ पितांबरास म्हणती गुरुवर । तूं येथून जावें दूर । जाणतें मूल झाल्यावर । आई त्याला दूर ठेवी ॥ ६० ॥ माझी कृपा आहे खरी । हे पितांबरा तुजवरी । जा हिंडून भूमीवरी । पदनतासी तारावे ॥ ६१ ॥ डोळ्यांत आसवें आणून । करूनिया साष्टांग नमन । मागें पाहें फिराफिरून । सोडून जातां मठासी ॥ ६२ ॥ पितांबर आला कोंडोलीसी । बसला वनांत आंब्यापासी । चिंतन चाललें मानसीं । निजगुरूचें सर्वदा ॥ ६३ ॥ तेथें होता रात्रभर । उदया येता दिनकर । जाऊन बसला झाडावर । मुंगळ्यांचिया त्रासानें ॥ ६४ ॥ अवघ्या आम्र-वृक्षावरी । मुंग्या मुंगळे होते भारी । लहान थोर फांद्यांवरी । आला पितांबर जाऊन ॥ ६५ ॥ परी निर्भय ऐसें सांपडेना । स्थान तयासी बसण्या जाणा । हेंच कृत्य गुराख्यांना । कौतुकास्पद वाटलें ॥ ६६ ॥ ते म्हणाले आपसांत । हा माकडापरि कां रे फिरत । ह्या वृक्षावरी सत्य । हें कांहीं कळेना ॥ ६७ ॥ लहान सान फांदीला । हा निर्भयपणें फिरून आला । परी नाहीं खालीं पडला । हेंच आहे आश्चर्य ! ॥ ६८ ॥ दुसरा म्हणाला यांत कांहीं । आश्चर्य वाटण्याजोगें नाहीं । श्रीगजाननाच्या शिष्याठायीं । ऐसें सामर्थ्य असतें रे ॥ ६९ ॥ यावरून हा त्यांचा । शिष्य असावा खचित साचा । चला हा येथ आल्याचा । वृत्तान्त सांगूं गांवांत ॥ ७० ॥ गोपमुखें वृत्त कळलें । कोंडोलीचें लोक आले । आम्रवृक्षापासी भले । कोण आलें तें पाहावया ॥ ७१ ॥ म्हणाले पौरवासी नर । हा ढोंगी असावा साचार । बळेंच करितो वेडेचार । गजाननाच्या शिष्यापरी

॥ ७२ ॥ शिष्य गजानन महाराजांचा । भास्कर पाटील होता साचा । झाला नुकताच अंत त्याचा । अडगांव नामें ग्रामांत ॥ ७३ ॥ समर्थांचे शिष्य । येथें येतील कशास ? । बळें करण्या उपवास । सोडून बर्फी पेढ्याला ॥ ७४ ॥ पुसून एकदां यास पाहावें । तो काय म्हणतो तें ऐकावें । मग खरें खोटें ठरवावें । उगीच तर्क नाहीं बरा ॥ ७५ ॥ एक मनुष्य पुढें झाला । पितांबरासी पुसूं लागला । तूं कोण कोठील कशास आला ? । गुरु तुझा कोण असे ? ॥ ७६ ॥ पितांबर बोले त्यावर । मी शेगांवचा राहणार । मी शिंपी पितांबर । शिष्य गजानन स्वामींचा ॥ ७७ ॥ त्यांची आज्ञा मजलागून । करण्या झाली पर्यटन । म्हणून येथें येऊन । वृक्षापासी बैसलों ॥ ७८ ॥ तों आंब्याच्या मुळाशीं । मुंगळे होते बहुवसी । म्हणून बसलों फांदीसी । वृक्षावरी जाऊन ॥ ७९ ॥ ऐसे ऐकतां तद्भाषण । लोक कोपले दारुण । अरे मोठ्याचें नांव सांगून । चेष्टा ऐशा करूं नको ॥ ८० ॥ काय म्हणे मी राजाची । राणी आवडती आहे साची । खळगी भरण्या पोटाची । आले मजुरी करावया ॥ ८१ ॥ देशमुख त्या गांवींचा । शामराव नामें साचा । तो बोलला ऐसी वाचा । अरे सोंगाड्या ऐक हें ॥ ८२ ॥ स्वामी समर्थ गजानन । प्रत्यक्ष आहे भगवान् । त्यांचें नांव सांगून । बट्टा त्यांना लावूं नको ॥ ८३ ॥ अरे वेड्या एक्या काळीं । त्यांनीं ऐसी कृती केली । ऋतु नसतां आणवलीं । फळें आम्र वृक्षाला ॥ ८४ ॥ त्यांनीं फळें आणवलीं । तूं नुसतीं पानें आण भलीं । नाहीं तरी या स्थलीं । तुझी न धडगत लागेल ! ॥ ८५ ॥ हा बळीराम पाटलाचा । वृक्ष वठलेला आंब्याचा । तो पर्णयुक्त करी साचा ।



आमच्या देखत ये काळीं ॥ ८६ ॥ ऐसें न जरी करशील । तरी मार खाशील । खरा असल्यास होशील । वंद्य आम्हांकारणें ॥ ८७ ॥ कां कीं शिष्य सद्गुरूचे । कांहीं अंशीं निघती साचे । बापा त्यांच्याच तोडीचे । हा आहे न्याय जगीं ॥ ८८ ॥ नको करूं उशीर । हा आंबा करी हिरवागार । ते ऐकता पितांबर । गेला असे घाबरून ॥ ८९ ॥ बोलला ऐसें नाडूं नका । माझी सारी कथा ऐका । एका खाणींत निघती देखा । हिरे आणि गारा हो ॥ ९० ॥ तैसाच मी गार परी । गजानन शिष्यां-भितरीं । बोललों नाहीं वैखरी । यत्किंचित खोटें हो ॥ ९१ ॥ गारेवरून खाणीस । नाहीं येत जगीं दोष । मी निज गुरूच्या नांवास । चोरून कैसें ठेवावें ? ॥ ९२ ॥ शामराव म्हणे त्यावर । नको करूं चरचर । संकट शिष्यांस पडतां थोर । ते धांवा करिती सद्गुरूंचा ॥ ९३ ॥ मग शिष्य त्यांचा जरी । नसला कृतीनें अधिकारी । तरी सद्गुरूचा प्रभाव करी । साह्य त्या आपुल्या शिष्यांस ॥ ९४ ॥ ऐसी झाली आड-विहीर । पितांबरासी साचार । झाला बिचारा चिंतातुर । कांहीं न सुचे तयासी ॥ ९५ ॥ त्या वठलेल्या झाडापासी । मिळाले अवघे पौरवासी । काय होतें तें पहावयासी । मुलें बायका समवेत ॥ ९६ ॥ निरुपाय होऊनी अखेर । पितांबरानें जोडिले कर । स्तवन मांडिलें अपार । आपुल्या सद्गुरुरायांचे ॥ ९७ ॥ हे स्वामी समर्थ गजानना ! । ज्ञानांबरीच्या नारायणा । पदनताच्या रक्षणा । धांव आतां ये काळीं ॥ ९८ ॥ माझ्यामुळें दोष तुला । येऊं पहातो भक्तपाला । आपुल्या ब्रीदासाठीं पाला । आणीव आम्रवृक्षासी ॥ ९९ ॥ माझी भिस्त तुझ्यावरी । पाव मातें लवकरी । ना तरी आली पाळी खरी । मजला येथ मरण्याची ॥ १०० ॥ प्रल्हाद खरा करण्याला ।

स्तंभीं नरहरी प्रगटला । जनी चढवितां सुळाळा । त्याचें पाणी जहालें ॥ १ ॥ जनीचा मार देवा-
वर । माझा आहे तुज्वर । संतदेवांत अंतर । मुळीं नाही राहिलें ॥ २ ॥ देव तेची असती संत ।
संत तेची देव साक्षात् । मला लोक म्हणतात । शिष्य गजाननाचा ॥ ३ ॥ माझें कांहीं महत्त्व
नाहीं । तें अवघें तुझ्याठायीं । पुष्पामुळें क्रिंमत येई । जगीं सूत्राकारणें ॥ ४ ॥ तूं पुष्प मी आहे
सूत । तूं कस्तुरी मी माती सत्य । तुझ्यामुळेंच आलें येथ । संकट हें माझ्यावरी ॥ ५ ॥ आतां न
माझा अंत पाही । गुरुराया ! धांव घेई । या वठलेल्या वृक्षाठायीं । आणी पर्णें कोमल ॥ ६ ॥
लोकांस म्हणें पीतांबर । करा सद्गुरूंचा नामगजर । जय जय गजानन साधुवर । शेगांवच्या
अवलिया ॥ ७ ॥ लोक अवघें गजर करती । तो पालवी फुटली वृक्षाप्रती । जन नयनी पाहती ।
त्या अगाध कौतुकाला ॥ ८ ॥ कोणी म्हणती असेल स्वप्न । तें जें पडलें आपणांलागून । पहा
चिमटा घेऊन । आपुल्याला करांनीं ॥ ९ ॥ चिमटे घेऊन पाहाती । तों निमाली स्वप्नभ्रांति ।
यावरी कोणीं ऐसे म्हणती । ही नजरबंदी असेल ? ॥ ११० ॥ गारुड्याच्या खेळांत । वाघा होती
सर्प सत्य । खापऱ्या असून दृष्टीप्रत । त्यांचें रुपये दिसती कीं ॥ ११ ॥ तोही भ्रम निमाला ।
तोडून पाहतां पर्णाला । फांदीवाटे तत्काळ आला । चीक शुभ्रसा बाहेर ॥ १२ ॥ मग मात्र खात्री
झाली । वाळल्या वृक्षा पालवी फुटली । श्रीगजानन माऊली । खरीच आहे महासंत ॥ १३ ॥
आतां पितांबराविशीं । शंका न धरणें मानसीं । चला घेऊन गांवासी । हा त्यांचा शिष्य असे ॥ १४ ॥
याच्यायोगें करून । कधीं तरी गजानन । येतील कोंडोलीकारण । वांसरासाठीं गाय जैसी
॥ १५ ॥ तें अवघ्यांस मानवले । पितांबरासी मिरवीत नेले । ऐसें जेव्हां दिव्य झालें । तेव्हां



भाव उदेला ॥ १६ ॥ जैसा समर्थांनीं आपुला । शिष्य डोमगांवीं पाठविला । कल्याण नामें करून
भला । कल्याण करण्या जगाचें ॥ १७ ॥ तैसेंच केलें गुरुवरें । श्रीगजाननें साजिरे । उदेलें हें भाग्य
खरें । त्या कोंडोली गांवचे ॥ १८ ॥ श्रोते अजूनपर्यंत । तो आंबा आहे कोंडोलींत । इतरांपेक्षां
असंख्यात । फळें येती तयाला ॥ १९ ॥ त्या पितांबराचे भजनी । कोंडोली गांव लागला जाणी ।
जेथें जाईल हिरकणी । तेथें ती मोल पावे ॥ १२० ॥ मठ पितांबराचा । कोंडोलीत झाला साचा ।
आणि अंतही तयाचा । ते ठायीं झाला हो ॥ २१ ॥ आतां इकडे शेगांवांत । महाराज
आपुल्या मठांत । एकें दिनीं उद्विग्न चित्त । होऊनिया बैसले ॥ २२ ॥ शिष्य त्याचें कारण । पुसूं
लागलें कर जोडून । महाराज आपुलें मन । कां हो अस्थिर जाहलें ? ॥ २३ ॥ तैं महाराज
वदलें लोकांला । आमचा कृष्णा पाटील गेला । जो चिकणसुपारी आम्हाला । रोज आणून देत असे
॥ २४ ॥ त्याची झाली आठवण । राम त्याचा मुलगा लहान । आतां सुपारी चिकण । कोण देतो या
ठायां ? ॥ २५ ॥ राम थोर झाल्यावरी । करील माझी चाकरी । म्हणून मी या मठांतरीं । आतां
ना तयार राहावया ॥ २६ ॥ ऐसें महाराज बोलतां । जनांलागीं लागली चिंता । महाराजांचा
विचार आतां । दिसतो येथून जाण्याचा ॥ २७ ॥ म्हणून कसेंही करून । जाऊं न द्यावें त्याकारण ।
चला आपण धरूं चरण । महाराजांचें येवेळां ॥ २८ ॥ ऐसा विचार मिळून केला । मंडळी आली
मठाला । श्रीपतराव बंकटलाला । ताराचंद मारुती ॥ २९ ॥ मंडळींनीं धरिले चरण । महाराज
आम्हां सोडून । तुम्ही आपलें ठिकाण । राहण्याचें अन्य करूं नये ॥ १३० ॥ तुमची इच्छा असेल

जेथ । तेथेंच राहा शेगांवांत । परी सोडण्याचें मनांत । ग्राम हें आणूं नका ॥ ३१ ॥ तैं महाराज-वाणी निघाली । तुमच्या गांवांत आहे दुफळी । मला कोणाची जागा मुळीं । नको येथें रहावया ॥ ३२ ॥ जी कोणाची नसेल । ऐसी जागा जरी घाल । तरीच राहणें होईल । माझें या शेगांवीं ॥ ३३ ॥ ऐसी गोष्ट ऐकिली । तेव्हां मंडळी चिंतावली । समर्थांनीं आज्ञा केली । मोठ्या पेचाची आपणा ॥ ३४ ॥ कोणाच्या जागेंत । राहण्या तयार नाहींत । सरकार यांच्या प्रीत्यर्थ । जागा ती देईल कशी ? ॥ ३५ ॥ भूषण आपल्या साधूचें । सरकारास नाहीं साचें । बंकटलाल बोलला वाचें । ऐसें संकट घालूं नका ॥ ३६ ॥ सरकार धार्मिक कृत्याला । जागा देईल हा न उरला । भरवंसा तो आम्हांला । हें राज्य परक्याचें ॥ ३७ ॥ म्हणून आम्हापैकीं कोणाची । जागा घ्या मागून साची । आहे तयारी आमुची । ती तुम्हां द्यावयास ॥ ३८ ॥ समर्थें केलें भाषण । कांय तुमचें अज्ञान । जमिनीची मालकी पूर्ण । आहे सच्चिदानंदाची ॥ ३९ ॥ राजे कित्येक भूमीवरी । आजवरी झाले तरी । जागा कशाची सरकारी । इचा मालक पांडुरंग ॥ १४० ॥ व्यवहारदृष्ट्या मालकपण । येते राजालागून । त्याचें नाहीं भूषण । तुम्ही प्रयत्न करा जा ॥ ४१ ॥ जागा मिळेल प्रयत्न करितां । पुढें नका बोलूं आतां । हरी पाटलाच्या हातां । यश येईल निःसंशय ॥ ४२ ॥ हरी पाटलाकडे आली । मंडळी ती अवघी भली । त्याच्या सल्ल्यानें मागितली । जागा अर्ज करून ॥ ४३ ॥ बुलढाण्याचा सर्वाधिकारी । साहेब होता नामें 'करी' । त्यानें एक एकर जागा खरी । अर्जावरून दिली असे ॥ ४४ ॥ आणि ऐसें म्हणाला ।



तुम्ही दोन एकरांस्तव अर्ज केला । परी मी तूर्त तुम्हांला । एक एकर देतसे ॥ ४५ ॥ तुम्ही एक वर्षांत । जागा केल्या व्यवस्थित । तुमचा मी पुरवीन हेत । जागा आणिक देऊनिया ॥ ४६ ॥ तो ठराव सरकारचा । आहे दप्तरीं नमूद साचा । समर्थांच्या वाणीचा । प्रभाव खचित लोकोत्तर ॥ ४७ ॥ मग हरी पाटील, बंकटलाला । निघते झाले वर्गणीला । द्रव्यनिधी क्षणात जमला । आणि काम झालें सुरूं ॥ ४८ ॥ विठू पाटील डोंगरगांवचा । लक्ष्मण पाटील वाडेगांवचा । जगु आबा शेगांवचा । हे पुढारी वर्गणीचे ॥ ४९ ॥ या पुढील अवघे वृत्त । येईल पुढल्या अध्यायांत । सत्पुरुषाचा पुरविण्यात हेत । देव राहे तत्पर सदा ॥ १५० ॥ श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । ऐका श्रोते सावचित्त । निजकल्याण व्हावया ॥ १५१ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति द्वादशोऽध्यायः समाप्तः ॥

❃ ❃ ❃ ❃

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य द्वादशोऽध्यायः समाप्तः ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १३



श्रीगजानन महाराजांच्या प्रसादाने महारोगीसुद्धा बरे झाले.

श्रीगणेशाय नमः ॥ हे संतवरदा श्रीधरा । हे दयेच्या सागरा । हे गोपगोपीप्रियकरा । तमालनीळा पाव हरी ॥१॥ तुझें ईशत्व पाहण्याकरितां । जेव्हां झाला विधाता । गाई वासरें चोरितां । यमुनातटीं गोकुळांत ॥ २ ॥ तेव्हा तूं निजलीलेंकरून । गाई वासरें होऊन । ब्रह्मदेवाकारण । आपलें ईशत्व दाविले ॥ ३ ॥ दुष्ट ऐशा कालियाला । यमुनेमाजी तुडवून भला । रमणकद्वीपा धाडिला । गोप निर्भय करण्यास ॥ ४ ॥ तेवीं माझ्या दुर्दैवा । तुडवूनीया वासुदेवा । दासगणू हा करावा । निर्भय सर्व बाजूंनी ॥ ५ ॥ मी अजाण भक्त तुझा हरी । परी देवा कृपा करी । मी आहे अनाधिकारी । योग्य न तुझ्या कृपेस ॥ ६ ॥ ऐसें जरी आहे सत्य । परी नको पाहूंस अंत । माझी चिंता वार त्वरित । आपुल्या कृपाकटाक्षें ॥ ७ ॥ आतां श्रोते सावधान । बंकट, हरी लक्ष्मण । विठ्ठ जगदेवादि मिळून । गेले वर्गणी जमवावया ॥ ८ ॥ भाविकांनी वर्गणी दिली । कुत्सितांनीं कुटाळी केली । वर्गणीची कां हो पडली । जरूर तुमच्या साधूस्तव ॥ ९ ॥ गजानन म्हणतां महासंत । जे न घडे तें घडवीत । मग त्यांच्या मठाप्रत । वर्गणी ही कशाला ? ॥ १० ॥ कुबेर त्यांचा भांडारी । मग कशास फिरता दारोदारी ? । चिठ्ठी कुबेराच्यावरी । करा म्हणजे काम झालें ॥ ११ ॥ ऐसें ऐकता भाषण । जगदेव बोलला हांसोन । या भिक्षेचें कारण । आहे तुमच्या बऱ्यासाठीं ॥ १२ ॥ श्रीगजाननासाठीं । नको बांधणें मठ-मठीं । ह्या अवघ्या आटाआटी । तुमचें कल्याण व्हावयास ॥ १३ ॥ स्वामी गजाननाचा । त्रैलोक्य हाचि मठ साचा । अवघीं वनें हा बगीचा । पलंग ज्यांचा मेदिनी ॥ १४ ॥ अष्टसिद्धी दासीपरी । राबताती ज्याच्या घरीं ।

तो न तुमची पर्वा करी । त्याचें वैभव निराळें ॥ १५ ॥ सविता सूर्यनारायण । त्यासी दीप कोठून । प्रकाश देऊ शकेल जाण । प्रतिकार करण्या तमाचा ॥ १६ ॥ तो मुळींच प्रकाशमयी । त्याला दीपाचें काज नाहीं । हलकारा तो कोठून होई । सार्वभौमा भूषवितां ? ॥ १७ ॥ इच्छा ऐहिक वैभवाची । असते मानवांप्रति साची । ती आहे व्हावयाची । पूर्ण या पुण्यकृत्यानें ॥ १८ ॥ रोग बरा करण्या भली । औषधाची योजना केली । प्राणासाठीं नसें झाली । ती हें ध्यानीं धरा हो ॥ १९ ॥ रोग भय शरीरास । नाहीं मुळींच प्राणास । जन्ममरण हेंही त्यास । नाहीं मुळीं राहिलें ॥ २० ॥ तैसी तुमची सुसंपन्नता । रक्षण व्हाया सर्वथा । पुण्यरूप औषधी आतां । मिळणें भाग आहे की ॥ २१ ॥ संपन्नता हें शरीर । रोग त्याचे अनाचार । त्याचा नाश होणार । या पुण्यरूप औषधींनें ॥ २२ ॥ म्हणून पुण्यसंचय करा । कुतर्क ना चित्तीं धरा । पुण्य मेदिनीमाजीं पेरा । करा आपुल्या संपत्तीचा ॥ २३ ॥ बीज पेरिता खडकावर । तें वार्‍या जातें साचार । त्यास कधीं ना येणार । मोड हें ध्यानीं धरावें ॥ २४ ॥ अनाचार दुर्वासना । हे खडक असती जाणा । तेथें टाकिल्यावरी दाणा । तो किडे पांखरें भक्षिती ॥ २५ ॥ संतसेवेसमान कोणतें नाहीं पुण्य आन । स्वामी सांप्रत गजानन । मुगुटमणी संतांचें ॥ २६ ॥ संतकार्यास कांहीं देतां । अगणित होतें सर्वथा । एक दाणा टाकितां । मेदिनींमाजीं कणीस होतें ॥ २७ ॥ त्या कणसास दाणे येती । एकाचेच बहुत होती । तीच पुण्याची आहे स्थिती । हें बुध हो विसरूं नका ॥ २८ ॥ ऐसें बोलता साचार । कुटाळ झाले निरुत्तर । खरें तत्त्व असल्यावर । कुंठित गती तर्काची ॥ २९ ॥ नेता असल्या वजनदार । वर्गणी ती जमे



फार । क्षुल्लकाच्यानें न होणार । कार्य कधीं वर्गणीचें ॥ ३० ॥ असो मिळाल्या जागेवरी । कोट बांधिला सत्वरी । झटूं लागलें गांवकरी । मग वाण कशाची ? ॥ ३१ ॥ बांधकाम कोटाचें । चालतां शेगांवीं साचें । दगड चुना रेतीचें । सामान गाड्या वाहती ॥ ३२ ॥ त्या वेळी समर्थस्वारी । होती जुन्या मठावरी । त्यांनी विचार अंतरीं । ऐशा रीती केला हो ॥ ३३ ॥ आपण तेथें बसल्याविणें । काम न चालें झपाट्यानें । म्हणून कौतुक समर्थानें । केलें कसें परियेसा ॥ ३४ ॥ एका रेतीच्या गाडीवरी । समर्थांची बसली स्वारी । तो गाडीवान झाला दूरी । महार होता म्हणून ॥ ३५ ॥ तयीं महाराज वदले तयास । कां रे खाली उतरलास ? । आम्हां परमहंसांस । विटाळाची बाधा नसे ॥ ३६ ॥ महार बोले त्यावरी । महाराज तुमच्या शेजारी । मी न बसे गाडीवरी । तें आम्हा उचित नसे ॥ ३७ ॥ मारुती रामरूप झाला । परी रामासन्निध नाहीं बसला । तो उभाच पहा राहिला । कर जोडूनी रामापुढें ॥ ३८ ॥ बरें बापा तुझी मर्जी । त्यास हरकत नाहीं माझी । बैलांनों, नीट चला आजी । गाडीवाल्यामागून ॥ ३९ ॥ बैल तैसें वागले । नाहीं कशास बुजले । गाडीवाल्या-वांचून आले । नीट सांकेतिक स्थलास ॥ ४० ॥ समर्थ खालीं उतरलें । मध्यभागीं येऊन बसले । तेथेंच हल्लीं काम झालें । त्यांच्या भव्य समाधीचें ॥ ४१ ॥ ही जागा शेगांवांत । आहे दोन नंबरांत । त्रेचाळीस पंचेचाळीस । सातशे सव्हें नंबराच्या ॥ ४२ ॥ महाराज बसले ज्या ठिकाणीं । तीच यावी मेदिनीं । मध्यभागा म्हणुनी । हें करणें भाग पडलें ॥ ४३ ॥ त्या दोन नंबरांतून । जागा थोडथोडी घेऊन । साधिला तो मध्य जाण । ऐसें चतुर कारभारी ॥ ४४ ॥ एक एकराचा हुकूम झाला । परी

बांधकामाच्या वेळेला । समाधिमध्य साधण्याला । जागा थोडी पडली कमी ॥ ४५ ॥ त्यासाठी म्हणून । अकरा गुंठे जास्त जाण । जमीन ती घेऊन । बांधकाम चालविलें ॥ ४६ ॥ पुढाऱ्यांच्या होतें मनीं । वचन दिलें अधिकाऱ्यांनीं । आणिक एक एकर तुम्हांलागुनी । काम पाहून जागा देऊं ॥ ४७ ॥ यास्तव केलें धाडस । अकरा गुंठे घेण्यास । परी तें गेलें विकोपास । एका दुष्टाच्या बातमीमुळें ॥ ४८ ॥ यामुळें पुढारी । थोडे घाबरले अंतरीं । त्यांत जो पाटील होता हरी । तो बोलला समर्थां ॥ ४९ ॥ अकरा गुंठे जागेचा । तपास करावया साचा । एक जोशी नांवाचा । आला असे अधिकारी ॥ ५० ॥ हांसत हांसत पाटलाला । समर्थांनें शब्द दिला । जागेबद्दल जो का झाला । दंड, तुम्हा तो माफ होईल ॥ ५१ ॥ त्या अधिकारी जोशाप्रती । समर्थांनें दिली स्फूर्ती । चाललेल्या प्रकरणावरती । शेरा त्यांनीं मारिला ॥ ५२ ॥ कीं हा दंड झालेला । विनाकारण आहे भला । दंड गजानन संस्थेला । परत द्यावा म्हणून ॥ ५३ ॥ मी करून आलों चौकशी । जाऊन त्या शेगांवासी । या घडलेल्या प्रकारासी । दंड होणें उचित नाहीं ॥ ५४ ॥ म्हणून तो माफ केला । ऐसा हुकूम जेव्हां आला । तैं हरी पाटलाला । आनंद झाला विशेष ॥ ५५ ॥ तो म्हणे समर्थांचे । वाक्य ना खोटें व्हावयाचें । मजवरी किटाळ महाराचें । येऊन गेलें तुकतें एक ॥ ५६ ॥ त्या वेळीं महाराजांनीं । भिऊं नकोस म्हणोनी । तुझ्या एकाही केसालागुनी । धक्का न त्याचा बसेल ॥ ५७ ॥ तेंच खरें अखेर । घडून आलें साचार । तैसाच हाही प्रकार । आज दिनीं झालासे ॥ ५८ ॥ समर्थवाक्य खोटें झालें । ऐसें कोणी न कधीं ऐकिलें । असो शेगांवाचे लागले ।



लोक भजनी स्वामींच्या ॥ ५९ ॥ आतां नव्या जागेंत आल्यावर । जें कांहीं घडले प्रकार । म्हणजे समर्थांचें चमत्कार । ते आतां वर्णितो ॥ ६० ॥ मेहेकरच्या सान्निध्याला । सवडद नामें ग्राम भला । त्या गांवीचा एक आला । गंगाभारती गोसावी ॥ ६१ ॥ यास होता महारोग । कुजून गेलें अवघें अंग । उरली न पडल्यावांचून भेग । जागा दोन्ही पायांला ॥ ६२ ॥ करपद बोटें झडून गेलीं । तनुप्रती चढली लाली । कानाच्या सुजल्या पाळी । कंडू सुटला तनूतें ॥ ६३ ॥ म्हणून गंगाभारती । त्या महारोगा त्रासला अती । समर्थांची ऐकोन कीर्ति । शेगांवासी पातला ॥ ६४ ॥ श्रोते त्या गोसाव्याप्रत । लोक आडवूं लागले बहुत । तुला रक्तपिती आहे सत्य । तूं न जावें दर्शना ॥६५॥ महाराज दिसतील ऐशा ठायीं । उभा राहून दर्शन घेई । कधींही ना जवळ जाई । त्यांचे चरण धरावया ॥ ६६ ॥ हा स्पर्शजन्य रोग फार । म्हणून वैद्य डॉक्टर । सांगती याचा विचार । तूं आपुल्या मनीं करी ॥ ६७ ॥ परी एके दिनी गंगाभारती । चुकवून अवघ्या लोकांप्रती । येता झाला सत्वर गती । प्रत्यक्ष दर्शन घ्यावया ॥ ६८ ॥ डोई ठेविता पायावर । समर्थांनी चापट थोर । मारिली त्याच्या डोक्यावर । अति जोरानें विबुध हो ॥ ६९ ॥ म्हणून तो उभा ठेला । समर्थांस न्याहाळू लागला । स्वामींनीं त्याचे थोबाडाला । दोन्ही करें ताडिलें ॥ ७० ॥ फडाफड मारिल्या मुखांत । आणिक वरती एक लाथ । खाकरोनी बेडक्याप्रत । थुंकले त्याच्या तनूवरी ॥ ७१ ॥ तोच त्याने मानिला । समर्थांचा प्रसाद भला । बेडका होता जो कां पडला । तयाचिया अंगावर ॥ ७२ ॥ तो त्याने घेऊन करी । चोळून अवघ्या शरीरी । लाविता झाला मलमापरी ।

आपुल्या सर्व अंगास ॥ ७३ ॥ तो प्रकार पाहतां । एक कुटाळ तेथें होता । तो गोसाव्यासी बोलतां । झाला! पहा येणें रीति ॥ ७४ ॥ आधीच शरीर नासलें । तुझें आहे बापा मलें । त्यावरीं यांनीं टाकिलें । या अमंगळ बेडक्यातें ॥ ७५ ॥ तो तूं प्रसाद मानिला । अवघ्या अंगातें चोळिला । जा लावून साबणाला । धुवून टाकी सत्वर ॥ ७६ ॥ हे ऐसे वेडेपीर । विचरूं लागतां भूमीवर । त्यांशीं अंधश्रद्धेचे नर । साधू ऐसे मानिती ! ॥ ७७ ॥ त्याचा परिणाम ऐसा होतो । अविधि कृत्यांस ऊत येतो । तो येतां सहज जातो । समाज तो रसातळां ॥ ७८ ॥ यासी तुझेंच उदाहरण । तूं औषध घेण्याचे सोडून । आलास की रे धांवून । या वेड्यापाशी ॥ ७९ ॥ गोसावी तें ऐकतां । हसूं लागला सर्वथा । म्हणे तुम्ही येथेंच चुकतां । याचा करा विचार ॥८०॥ अमंगळ साधूपासी । कांहीं न राहातें निश्चयेसी ! कस्तुरीच्या पोटाशी । दुर्गंधी ना वसे कदा ॥ ८१ ॥ तुम्हां दिसला बेडका । तो हा प्रत्यक्ष मलम देखा । कस्तुरीच्या सारखा । सुवास येतो यालागीं ॥ ८२ ॥ तुम्हां संशय असल्यास । पहा माझ्या अंगास । हात लावूनिया खास । म्हणजे कळून येईल कीं ॥ ८३ ॥ त्यांत थुंक्याचें नांव नाहीं । अवघी औषधी आहे पाही । मी इतुका वेडा नाहीं । बेडक्यास मलम मानणारा ॥ ८४ ॥ तुझा त्यासी संबंध नव्हता । म्हणून बेडका दिसला तत्त्वतां । समर्थांची योग्यता । त्वां न मुळीं जाणिली ॥ ८५ ॥ त्याचें पाहण्या प्रत्यंतर । चाल जाऊं एकवार । स्नान केलेल्या जागेवर । वेळ आतां करूं नको ॥ ८६ ॥ समर्थ स्नान प्रतिदिवशीं । करतील ज्या जागेसी । तेथल्या ओल्या मातीसी । मी लावितों





निजांगा ॥ ८७ ॥ ऐसा संवाद तेथें झाला । दोघे गेले स्नानस्थला । तो कुटाळासी आला । अनुभव गोसाव्यापरीच ॥ ८८ ॥ मृत्तिका स्नानस्थलाची । दोघांनींही घेतली साची । तो गोसाव्याच्या हातीं । बैसली औषधी होऊन ॥ ८९ ॥ कुटाळाच्या हातांत । ओलीच माती आली खचित् । दुर्गंधीही किंचित् । येत होती तियेला ॥ ९० ॥ तो प्रकार पाहाताक्षणीं । कुटाळ घोटाळला मनीं । कुत्सित कल्पना सोडूनी । शरण गेला समर्थां ॥ ९१ ॥ असो कोणी गोसाव्यातें । जवळ बसूं देत नव्हते । हा दूर बसून भजनातें । करी स्वामीपुढें नित्य ॥ ९२ ॥ आवाज गंगाभारतीचा । पहाडी गोड मधुर साचा । अभ्यास होता गायनाचा । त्या गंगाभारतीला ॥ ९३ ॥ ऐसे पंधरा दिवस गेले । रोगाचे स्वरूप पालटलें । लालीनें तें सोडिले । जयाचिया अंगाला ॥ ९४ ॥ चाफे झाले पूर्ववत् । भेगा पर्दीच्या निमाल्या समस्त । दुर्गंधीचा मोडला त्वरित । ठाव त्याचा श्रोते हो ॥ ९५ ॥ गोसाव्याचे ऐकून भजन । होई संतुष्ट समर्थमन । प्रत्येक जिवाकारण । गायन हें आवडतें ॥ ९६ ॥ बायको गंगाभारतीची । अनुसूया नांवाची । ती शेगावीं आली साची । न्याया निज पतीला ॥ ९७ ॥ संतोषभारती कुमार । होता तिच्या बरोबर । येऊन पतीस जोडिले कर । चला आतां गांवातें ॥ ९८ ॥ तुमची व्याधी बरी झाली । ती मी दृष्टीं पाहिली । समर्थ साक्षात् चंद्रमौळी । आहेत हेंच खरें असें ॥ ९९ ॥ मुलगा तेंच बोलला । म्हणे बापा गांवीं चला । पुसून गजानन महाराजाला । येथें राहणें पुरें झालें ॥ १०० ॥ गंगाभारती म्हणे त्यावर । मला नका जोडू कर । आजपासून साचार । मी तुमचा खचित नाहीं ॥ १ ॥ ही अनाथांची माउली । स्वामी

गजानन येथें बसली । त्यानें माझी उतरली । धुंदी, चापट मारून ॥ २ ॥ राख लाविली अंगाप्रत । आणि चित्त तुझें संसारांत । केलीस विटंबना बहुत । या भगव्या वस्त्राची ॥ ३ ॥ ऐसें संकेतें बोलले । थापव्या मारून जागे केलें । आतां डोळे उघडिले । संसाराचा संबंध नको ॥ ४ ॥ हे संतोषभारती कुमारा । तूं तुझ्या आईस नेईं घरा । येथें नकोस राहूं जरा । सवडद जवळ करावें ॥ ५ ॥ हिचें जीवमान जोंवरी । तोंवरी हिची सेवा करी । ही तुझी माय खरी । हिला अंतर देऊं नको ॥ ६ ॥ मातोश्रींची करितां सेवा । प्रिय होतो वासुदेवा । पुंडलिकाचा ठेवावा । इतिहास तो डोळ्यांपुढें ॥ ७ ॥ मी येतां सवडदांत । पुन्हां रोग होईल पूर्ववत् । म्हणून त्या आग्रहांत । तुम्हीं न पडावें दोघांनीं ॥ ८ ॥ आजवरी तुमचा होतो । आतां देवाकडे जातो । नरजन्माचा करून घेतों । कांहीं तरी उपयोग ॥ ९ ॥ हा वार्या गेला खरा । नराचा जन्म साजिरा । चुकेल चौऱ्यांशींचा फेरा । ऐसें साच सांगितलें ॥ ११० ॥ समर्थकृपेनें निश्चिती । झाली मला ही उपरती । या परमार्थखिरींत माती । टाकूं नका रे मोहाची ॥ ११ ॥ ऐसे सांगून कुटुंबाला । मुलासह सवडदाला । दिले धाडून राहिला । आपण तसाच शेगांवीं ॥ १२ ॥ पदपदांतरें समर्थांची । आवडीनें म्हणावी साची । त्याला कला गायनाची । येत होती विबुध हो ॥ १३ ॥ प्रत्यहीं तो अस्तमाना । एकतारा घेऊन जाणा । समर्थांच्या सान्निधाना । बैसून भजन करीतसे ॥ १४ ॥ ऐकून त्याचें भजन । इतरांचेंही हर्षे मन । वस्तु अशीच आहे गान । रंजविणारी सर्वांतें ॥ १५ ॥ हा गंगाभारती बरा झाला । रोगाचा पत्ता मोडला । मलकापुरास पुढें



गेला । गजाननाच्या आज्ञेने ॥ १६ ॥ असो एकदां पौषमासी । श्यामसिंग आला शेगांवासी । बोलतां झाला समर्थांसी । माझ्या गावांस चला हो ॥ १७ ॥ मम भावाच्या गृहाला । अडगांवीं नेण्याला । मी आलों होतों आपणाला । तयीं आपुला करार ॥ १८ ॥ ऐसा होता समर्था । मी नाहीं येत आतां । नको करूं आग्रह वृथा । पुढें मागें येईन ॥ १९ ॥ त्याला दिवस झालें बहुत । आतां चला मुंडगांवांत । मी आहे आपुला भक्त । माझी इच्छा पूर्ण करा ॥ १२० ॥ मुंडगांवांत माझें घरीं । कांहीं दिवस राहा तरी । मी अवघी करून तयारी । न्याया आलो आपणा ॥ २१ ॥ श्यामसिंगाबरोबर । मुंडगांवीं आले साधुवर । दर्शना लोटले नारीनर । तो न आनंद वर्णवे ॥ २२ ॥ श्यामसिंगानें भंडारा । घातिला असे थोर खरा । मुंडगांव झाले गोदातीरा । दुसरें कीं हो पैठण ॥ २३ ॥ पैठणामाजी एकनाथ । मुंडगांवीं गजानन संत । भजनी दिंड्या अमित । आल्या भजन करावया ॥ २४ ॥ आचारी लागले स्वैंपाका । अर्धा स्वैंपाक झाला निका । तैं महाराज बोलले देखा । ऐसे श्यामसिंगासी ॥ २५ ॥ श्यामसिंगा, आज चतुर्दशी । मुळींच आहे रिक्त तिथी । भोजनाच्या पंक्ती । पौर्णिमेला होऊं दे ॥ २६ ॥ श्यामसिंग बोलला यावर । स्वयंपाक झाला तयार । लोक जमले आहेत फार । आपला प्रसाद घ्यावया ॥ २७ ॥ स्वामींनी केलें बोलणें । तुझें व्यवहार-दृष्टीनें । योग्य परी हें न माने । त्या जगदीश्वराला ॥ २८ ॥ श्यामसिंगा, हें अन्न । न येईल उपयोगा-कारण । तुम्हां प्रापंचिकालागून । आपलेंच व्हावें वाटतें ॥ २९ ॥ पंक्ती बसल्या भोजना । तों एका-एकी आकाश जाणा । भरून आलें गर्जना । होऊं लागली मेघांची ॥ १३० ॥ चमके वीज माथ्यावरी ।

झंझावात सुटला भारी । कडकडा तीं कांतारीं । लागलीं झाडें मोडावया ॥ ३१ ॥ घटकेंत पाणी पाणी झालें । अन्न अवघे वाया गेलें । मग श्यामसिंगानें विनविलें । महाराजांस येणें रीतीं ॥ ३२ ॥ आतां महाराज उद्यां तरी । मुळीं न व्हावें आजच्या परी । हिरमुष्टी होऊन बसली खरी । अवघी मंडळी गुरुराया ॥ ३३ ॥ निवारा या पर्जन्याला । हा नव्हे पावसाळा । आगांतुक बेटा आला । आमचा नाश करावया ॥ ३४ ॥ आतां पाऊस पडेल । तरी शेतीचें होईल । वाटोळें तें पाहा सकळ । मग म्हणतील लोक ऐसें ॥ ३५ ॥ श्यामसिंगानें केलें पुण्य । हा भंडारा घालून । तें भोवलें आम्हा-लागून । वा खूप तऱ्हा पुण्याची ॥ ३६ ॥ तैं महाराज म्हणाले श्यामसिंगा ! । ऐसा सचिंत होसी कां गा । तुला न उद्यां देईल दगा । हा पर्जन्य कधींही ॥ ३७ ॥ आतां मी वारितो त्यासी । ऐसें बोलोन आकाशाशी । पाहूं लागला पुण्यराशी । तों आभाळ फांकलें ॥ ३८ ॥ मेघ क्षणांत निघून गेले । सर्व ठायीं ऊन पडलें । हें एका क्षणांत झालें । अगाध सत्ता संतांची ॥ ३९ ॥ दुसरे दिवशीं पौर्णिमेला । थोर भंडारा पुन्हां झाला । तो नियम चालला । अजून त्या मुंडगांवीं ॥ १४० ॥ श्यामसिंगानें आपली । इस्टेट सर्व अर्पण केली । महाराजांचे चरणी भली । त्या मुंडगाव ग्रामांत ॥ ४१ ॥ लोक त्या मुंडगावांत । समर्थांचें झाले भक्त । पुंडलिक भोकरे म्हणूनी त्यांत । एक जवान पोऱ्या असे ॥ ४२ ॥ हा उकिरड्या नामक कुणब्याचा । पुत्र एकुलता एक साचा । भक्त झाला महाराजांचा । ऐन तारुण्यामाझारीं ॥ ४३ ॥ हें उकीर्डा नाम वऱ्हाडांत । पोर नसल्या वांचत । लोक नवसे ठेवितात । ऐसा प्रघात त्या प्रांतीं ॥ ४४ ॥ तें पेंठय्या तेलंगणांत । केर पुंजा महाराष्ट्रांत ।



तैसा उकीर्डा वऱ्हाडांत । नांव ठेविती बालकाचें ॥ ४५ ॥ हा पुंडलिक वद्य पक्षासी । करावया वारीसी । येत नियमें शेगांवासी । घ्याया दर्शन समर्थांचें ॥ ४६ ॥ जैसें कां ते वारकरी । वद्यपक्षा-माझारीं । जातीं इंद्रायणीचें तीरीं । देहू आळंदी गांवाला ॥ ४७ ॥ तैसाच हा वऱ्हाडांत । वारी वद्यपक्षांत । करी येऊन शेगावांत । परम भावभक्तीनें ॥ ४८ ॥ असो एकदां वऱ्हाडांत । रोग ग्रंथिक सन्निपात । बळावला अत्यंत । गांव बाहेर पडले कीं ॥ ४९ ॥ या तापांत ऐसें होतें । प्रथमतां थंडी वाजते । अंग ज्वरानें तप्त होतें । डोळें होती लाल बहु ॥ १५० ॥ आणि कोठें तरी सांध्यावर । ग्रंथि उठे सत्वर । ती होता करी जोर । वात तिच्या मागूनी ॥ ५१ ॥ मग रोगी बरळतसे । शुद्धि न कांहीं राहतसे । तलखी अंगाची होत असे । बेशुद्ध होई क्षणाक्षणां ॥ ५२ ॥ पूर्वी हा रोग विपरीत । नव्हता भरतखंडांत । त्याचा वास युरोपांत । होता मोठ्या प्रमाणीं ॥ ५३ ॥ ती सांथ इकडे आली । गांवोगांव पसरली । त्याच्या प्रतिकारा सोडून दिलीं । लोकांनीं तीं घरेंदारें ॥ ५४ ॥ त्या दुर्धर सांथीची स्वारी । आली पाहा मुंडगांवावरी । तों पुंडलिकाची आली वारी । शेगांवास निघाला ॥ ५५ ॥ कसकस त्याला घरींच आली । परी ती त्यानें चोरिली । शेगांवाची वाट धरली । आपुल्या पित्यासमवेत ॥ ५६ ॥ येतां पांच कोसांवर । शरीरासी भरला ज्वर । एक पाऊल भूमीवर । तयाच्यानें टाकवेना ॥ ५७ ॥ गांठ उठली बगलेंत । हैराण झाला रस्त्यात । ऐसें पाहून पुसें तात । कां रे पुंडालिका ऐसें करिशी ? ॥ ५८ ॥ पुंडलिक म्हणे बापाला । बाबा मशीं ताप आला । गोळा एक काखेला । उठला आहे येधवा ॥ ५९ ॥

शक्ति सारी क्षीण झाली । आतां मशीं न चालवें मुळीं । काय करूं ही राहिली । वारी हाय रे दुर्दैवा ॥ १६० ॥ हे स्वामी दयाघना ! । वारीस खंड पाडी ना । दाव तुझ्या दिव्य चरणा । भक्त-वत्सला कृपानिधी ॥ ६१ ॥ वारी सांग झाल्यावर । मग येऊं दे खुशाल ज्वर । जरी सांडले शरीर । तरी न त्याची पर्वा मला ॥ ६२ ॥ माझा पुण्यठेवा हीच वारी । ती रक्षण आतां करी । ही झाली सांथ वैरी । नाश तिचा करावयातें ॥ ६३ ॥ शरीरसामर्थ्य जोंवर । परमार्थ घडें तोंवर । बापही झाला चिंतातुर । ती मुलाची पाहून स्थिती ॥ ६४ ॥ तोही रडूं लागला । हा एकुलता एक पुत्र मला । देवा न दिवा नेई मला । हा माझ्या वंशाचा ॥ ६५ ॥ उकिर्डा म्हणे पुत्रास । गाडीघोडे बसावयास । आणूं कां या समयास । तुला बाळा बसावया ॥ ६६ ॥ पुंडलिक वदे तयावरी । झाली पाहिजे पायींच वारी । उठत बसत कसे तरी । जाऊं चला शेगांवा ॥ ६७ ॥ मध्येंच मृत्यु झाल्यास । शव तरी ने शेगांवास । नको करूं शोकास । हेंच आतां सांगणें ॥ ६८ ॥ बसत उठत पुंडलिक आला । अति कष्टे शेगांवाला । पाहून स्वामी समर्थाला । घातलें त्यानें दंडवत ॥ ६९ ॥ तो समर्थांनीं माव केली । एका हातानें दाबिली । कांख त्यांनींच आपुली । अति जोर करोनिया ॥ १७० ॥ आणि केलें मधुरोत्तर । पुंडलिका ! तुझें गंडांतर । टळलें आतां तिळभर । चिंता त्याची करूं नको ॥ ७१ ॥ तैसे महाराज वदतां क्षणीं । पुंडलिकाची गांठ जाणी । गेली जागच्या जागी जिरोनी । ताप तोही उतरला ॥ ७२ ॥ कंप अशक्ततेनें । राहिला देहाकारणें । करीं पुंडलिकाच्या मातेनें । आणिला नैवेद्य बाढून ॥ ७३ ॥ घास त्या नैवेद्याचे ।



समर्थें घेतां दोन साचे । कांपरें तें पुंडलिकाचें । गेले बंद होवोनिया ॥ ७४ ॥ पुंडलिक झाला पूर्ववत् । अशक्तता राहिली किंचित् । हें गुरुभक्तीचें फळ सत्य । उघडा डोळे अंधांनो ! ॥ ७५ ॥ गुरु योग्य असल्यावरी । वायां न जाई सेवा खरी । कामधेनु असल्या घरीं । कां न इच्छा पुरतील ! ॥ ७६ ॥ सांग करून वारीला । पुंडलिक गेला मुंडगांवाला । हें जो चारित्र वाची भला । त्याचें टळेल गंडांतर ॥ ७७ ॥ संतचरित्र ना कहाणी । अनुभवाची खाण जाणी । मात्र अविश्वास मनीं । संतकथेचा न यावा हो ॥ ७८ ॥ श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । सुखद होवो भाविकांप्रत । हेंच देवा मागणें ॥ १७९ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति त्रयोदशोऽध्यायः समाप्तः ॥

* * * *

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य त्रयोदशोऽध्यायः समाप्तः ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १४.



श्रीगजानन महाराजांच्या कृपेने प्रत्यक्ष नर्मदादेवीने सर्वांचे रक्षण केले.

श्रीगणेशाय नमः ॥ हे कौसल्यात्मजा रामराया । हे रघुकुलभूषणा करुणालया । सीतापते करा दया । आतां या लेंकरासी ॥ १ ॥ त्राटिका त्वां उद्धरली । अहिल्या शिळा सजीव केली । शबरीची पुरविली । इच्छा तूं दाशरथे ॥ २ ॥ भक्तरक्षणा कारण । सोडिलें नृपसिंहासन । वानर केलेस बलवान । केवल आपुल्या कृपेनें ॥ ३ ॥ शिळा तरल्या सागरी । तुझ्या नामें रावणारी । बसविलास गादीवरीं । भक्त आपला बिभीषण ॥ ४ ॥ जो जो आला शरण पदा । तुझ्या कीं हे आनंदकंदा । दैन्य, दुःख, आपदा । त्याच्या त्वां वारिल्यास ॥ ५ ॥ हें मनीं आणावें । दासगणूस सांभाळावें । बाळकाने धावावें । जननिविण कोणाकडे ? ॥ ६ ॥ तूं जननी जनिता सद्गुरु । तूं भक्तांना कल्पतरु । भवनदीचें भव्य तारूं । तूंच कीं रे रामराया ! ॥ ७ ॥ एक खेडेगांवचा । रहिवासी मेहकर तालुक्याचा । बंडूतात्या नांवाचा । ब्राह्मण होता विबुध हो ॥ ८ ॥ हा बंडूतात्या ब्राह्मण । सदाचारसंपन्न । उदार होते ज्याचें मन । गृहस्थाश्रम चालवी ॥ ९ ॥ श्रोते या प्रपंचांत । संकटें येती अतोनात । परी नाहीं पहा सुटत । लोभ त्याचा मानवा ॥ १० ॥ या बंडूतात्या घरीं । पाहुणें येती वरच्यावरी । तो अवघ्यांची साच करी । सरबराई निजांगें ॥ ११ ॥ ऐसा क्रम चालला । संचय अवघा संपला । आली पाळी बिचाऱ्याला । कर्ज काढणें साहूचें ॥ १२ ॥ घरदार पडलें गहाण । अगणित झाले तया ऋण । लोकांप्रती दावण्या वदन । लाज वाटूं लागली ॥ १३ ॥ विकावया न कांहीं उरलें । सदन अवघे साफ झालें । भांडें-कुंडें तेंही गेलें । काय विपत्ती वर्णावी ? ॥ १४ ॥ तगादे करिती सावकार । शिपाई धाडून वरच्यावर । भागवण्यासी दोन प्रहर । अडचण पडे

लागली ॥ १५ ॥ कांता चोळें टाकून । मुलें करिती अपमान । पत गेली उडून । उसने न कोणी देती हो ॥ १६ ॥ ऐशा तापें तापला । जीव द्याया तयार झाला । पैसा संपतां प्रपंचाला । कांहीं नसे किंमत ॥ १७ ॥ जें सुखाचे वाटे स्थान । तेंच दुःखाचें निकेतन । संपून गेल्यावरी धन । सहज होतें न्याय हा ॥ १८ ॥ बंडूतात्या विचार करी । जीव कोठें देऊं तरी । अफू खाऊन मरूं जरी । तरी ती घ्याया पैसा नसे ॥ १९ ॥ जरी जाऊन विहिरीवरी । जीव हा मी देऊं तरी । तितुक्यांत कोणी येऊन वरी । जरी मला काढल्यास ॥ २० ॥ जीवही ना जाईल । उलटी फजिती होईल । सरकार शिक्षा देईल । आत्महत्यारा म्हणून मला ॥ २१ ॥ यापेक्षां हिमालया । जावे वाटे जीव द्याया । आत्महत्येचा ते ठायां । दोषही ना लागेल ॥ २२ ॥ ऐसा करूनि विचार । पडला घराच्या बाहेर । अखेरचा तो नमस्कार । केला त्यानें प्रपंचाला ॥ २३ ॥ एक लंगोटी घातली । राख अंगाला लाविली । तयानें ही युक्ति केली । ओळख आपुली बुजवावया ॥ २४ ॥ श्रोते अन्नदारासी । जननिंदेचे मानसी । भय वाटे अहर्निशीं । हें सकळांसी ठाऊक ॥ २५ ॥ बंडूतात्या म्हणे मनीं । हे दीनदयाळा चक्रपाणी । अवकृपा मजलागोनी । कां रे ऐसी केलीस ? ॥ २६ ॥ तुझ्यावरी विश्वास माझा । पूर्ण होता अधोक्षजा । तूं रंकाचा करिसी राजा । ऐसें ऐकिलें पुराणीं ॥ २७ ॥ ते सर्व खोटें झालें । प्रत्ययासी माझ्या आले । व्यर्थ कवींनीं रंगविलें । चरित्र तुझें नारायणा ॥ २८ ॥ आतां जीव देतो परी । तुझ्यावरी मी श्रीहरी । याचा विचार कांहीं करी । हत्या नको घेऊं मम ॥ २९ ॥ ऐसें मनी बोलला । तिकीट घ्याया लागला । तों एक भेटला । विप्र त्यासी स्टेशनांत ॥ ३० ॥ आतांच हरिद्वाराचें । तिकीट



नको घेऊं साच । घेऊन दर्शन संताचें । मग जावें हरिद्वारा ॥ ३१ ॥ आपल्या वऱ्हाड प्रांतांत । श्रीगजानन महासंत । आहेत अवतरले सांप्रत । त्यांच्या दर्शना जाय तूं ॥ ३२ ॥ संतदर्शन आजवरी । वायां न गेलें भूमीवरी । उगीच त्रासून अंतरीं । भलतें कांहीं करूं नको ॥ ३३ ॥ ऐसें बोलतां ब्राह्मण । तात्या गेला गोंधळून । म्हणे हा मनुष्य कोण ? । अवचित मसी भेटला ॥ ३४ ॥ किंवा यानें ओळखिलें । मी बंडूतात्या म्हणून भलें । कांहीं न माझा तर्क चाले । पुसूं तरी यातें कसा ? ॥ ३५ ॥ कांहीं असो शेगांवासी । जाऊन वंदूं समर्थांसी । ऐसें बोलून मानसी । शेगांवासी पातला ॥ ३६ ॥ दर्शना गेला ब्राह्मण । तो महाराज वदले हांसून । कां रे देशी जाऊन प्राण । हिमालयासी बंडूतात्या ॥ ३७ ॥ अरे आत्महत्या करूं नये । हताश कदापि होऊं नये । प्रयत्न करण्या चुकूं नये । साध्य वस्तु साधण्यास ॥ ३८ ॥ आतां जरी दिलास प्राण । प्रपंचाशीं त्रासून । तरी येशील घेऊन । जन्म पुन्हां ते भोगावया ॥ ३९ ॥ नको जाऊं हिमालया । गंगेमाजीं प्राण द्याया । परत आपुल्या घरीं जाया । वेळ वेड्या करूं नको ॥ ४० ॥ तिकीट घेतां जो भेटला । स्टेशनावरी ब्राह्मण तुला । ओळखिलें कां सांग त्याला ? । तो कोण होता हें कांहीं ॥ ४१ ॥ जा आतां घरीं परत । राहूं नको लवही येथ । बापा तुझ्या मळ्यांत । आहे एक म्हसोबा ॥ ४२ ॥ त्या म्हसोबाच्या पूर्वेसी । बाभुळीच्या झाडापाशी । खोदून पहा मेदिनीसी । दोन प्रहर रात्रीला ॥ ४३ ॥ काम जमीन खोदण्याचें । तूंच एकटा करी साचें । खालीं तीन फुटांचें । द्रव्य तुजला सांपडेल ॥ ४४ ॥ त्यांतून थोडे कर्जदारां । देऊनी ऋणमुक्त होई खरा । नको सोडूंस बायकापोरां । उसनें वैराग्य वाहूं नको

॥ ४५ ॥ ऐसें बोलतां गजानन। आनंदला तो ब्राह्मण। आला खड्यास परतून। राख पुसून
अंगाची ॥ ४६ ॥ रात्रीचिया वेळेला। मळ्यांत म्हसोबापासी आला। बाभुळीखालीं लागला।
जमीन खोदाया कारण ॥ ४७ ॥ तों तीन फुटांवर। लागली श्रोते घागर। एक तांब्याची साचार।
वेळणी होती जिच्या मुखा ॥ ४८ ॥ त्या तांब्याच्या घागरींत। मोहरा सोन्याच्या चार शत।
पडल्या त्याच्या दृष्टीप्रत। मग काय विचारितां ? ॥ ४९ ॥ करीं घागर घेऊनियां। लागला तेथेंच
नाचावया। जय जय गजानन गुरुराया। ऐसें मुखें बोलून ॥ ५० ॥ त्याच द्रव्येंकरून। फेडिलें
त्यानें अवघें ऋण। मळा होता पडला गहाण। तोही आणिला सोडवोनी ॥ ५१ ॥ घडीं बसली
प्रपंचाची। ही गजाननकृपेनें साची। वृत्ति बंडूतात्याची। गेली अती आनंदून ॥ ५२ ॥ जेवीं मृत्यूची
घटका भरतां। अमृतकलश यावा हातां। वा सागरामाजीं बुडतां। तारूं दृष्टीस पडावें ॥ ५३ ॥
बंडूतात्यास तैसें झालें। दुःखाचे ते दिवस सरले। मन त्यानें पुढें केलें। येणें पहा शेगांवा ॥ ५४ ॥
दानधर्म तेथें केला। मोठ्या प्रमाणामाजीं भला। गजाननाच्या पदीं झाला। लीन अनन्यभावानें
॥ ५५ ॥ तईं महाराज वदले त्यासी। आम्हांस कां रे वंदिसी ?। ज्यानें दिला आहे तुसी। द्रव्य-
घट तो वंदी तया ॥ ५६ ॥ आत तरी येथून। खर्च करावा सांभाळून। उगे न करी उधळेपण।
त्यांत नसे सार कांहीं ॥ ५७ ॥ जन सुखाचे सोबती। निर्वाणीचा श्रीपती। त्याची सदैव करी
भक्ती। तो न उपेक्षी कदा तुला ॥ ५८ ॥ ऐसा उपदेश ऐकिला। समर्थासी वंदून भला। बंडूतात्या
गांवास गेला। आपुल्या अती आनंदें ॥ ५९ ॥ एकेकालीं सोमवती। पर्व आलें निश्चिती। जी



कां अमावास्या येती। सोमवारी ती सोमवती हो ॥ ६० ॥ या सोमवतीचें माहिमान। पुराणांत
केलें कथन। या दिवशीं नर्मदास्नान। अवश्य म्हणती करावें ॥ ६१ ॥ म्हणून शेगांवची मंडळी।
नर्मदेस जाया तयार झाली। तयारी त्यांनीं अवघी केली। पडशा वगैरे भरून ॥ ६२ ॥ मार्तंड
पाटील बंकटलाल। मारुती चंद्रभान बजरंगलाल। यांनीं केला एक मेळ। ओंकारेश्वरीं जाण्याचा
॥ ६३ ॥ बंकटलाल म्हणे अवघ्यांसी। आपण जातो नर्मदेसी। घेऊं सांगातें महाराजांसी। स्नान
कराया नर्मदेचें ॥ ६४ ॥ चौघे मठामाजीं आले। समर्थां विनवूं लागले। ओंकारेश्वरी गुरुमाऊले।
चला आमुच्यासमवेत ॥ ६५ ॥ तुम्ही असल्या बरोबर। काळाचाही नाहीं दर। घाला आम्हांस
पायांवर। त्या ओंकारेश्वराच्या ॥ ६६ ॥ हा अधिकार मातेविना। नाहीं पाहा इतरांना। आमुची
विनंती हीच चरणा। न्यावें आम्हा नर्मदेसी ॥ ६७ ॥ तुम्ही आल्यांवाचून। आम्ही न हालूं येथून।
बालहट्टालागून जननी तीच पुरवितसे ॥ ६८ ॥ महाराज म्हणाले तयासी। आहे नर्मदा माझ्यापाशीं।
उगीच त्रास द्यायासी। जाऊं कशाला तिला मग ? ॥ ६९ ॥ मी या मठांत बैसून। करीन
नर्मदेचें स्नान। तुम्ही या सारे जाऊन। श्रीओंकारेश्वराला ॥ ७० ॥ तेथें राजा पूर्वकालीं।
मान्धाता भाग्यशाली। होऊन गेला महाबली। दिगंत ज्याची कीर्ति असे ॥ ७१ ॥ श्रीशंकराचार्य
गुरुवर। यांनीं कराया जगदोद्धार। तेथेंच दीक्षा साचार। परमहंसाची घेतली ॥ ७२ ॥ जा जा
तुम्ही तया स्थला। भेटा माझ्या नर्मदेला। मात्र नेऊं नका मला। उगाच आग्रह करून ॥ ७३ ॥
आतां पर्वाचे प्रयोजन। नाहीं राहिलें मजलागून। ऐसें ऐकतां चवघेजण। घट्ट धरिती पायांला

॥ ७४ ॥ कांहीं असो तेथवरी । चला आम्हुच्या बरोबरी । लगेच येऊं माघारी । स्नान करूनी नर्मदेचें ॥ ७५ ॥ महाराज म्हणाले ठीक ठीक । तुम्ही दिसतां दांभिक । नर्मदेचें आहे उदक । या आपुल्या विहिरीमध्यें ॥ ७६ ॥ तिला टाकून आपण । तेथें कराया गेलों स्नान । तरी राग येईल दारुण । माझ्या त्या नर्मदेला ॥ ७७ ॥ म्हणून सांगतो तुम्हीच जावें । मला न आग्रहा करावें । माझें वचन मानावें । यांत तुमचें कल्याण ॥ ७८ ॥ मग मारुती चंद्रभान । करूं लागला भाषण । आम्ही घेतल्यावांचून । आपणां न जाऊं कीं ॥७९॥ समर्थ म्हणाले मी तेथ । आल्या होईल विपरीत । मग तुम्ही दोष मात्र । देऊं नये आम्हांला ॥८०॥ ऐसें मठांत बोलणें झालें । अवघे ओंकारेश्वरा आले । पर्वासाठीं मिळाले । लोक तेथें अपार ॥८१॥ नर्मदेचें अवघे घाट । स्त्रीपुरुषांनीं भरले दाट । मुंगीलाही नसे वाट । जाया हराच्या मंदिरीं ॥८२॥ कोणी स्नानास उतरले । कोणी संकल्प ऐकूं लागले । कोणी घेऊन बेलफुलें । जाऊं लागले मंदिरांत ॥ ८३ ॥ कोणी बर्फी पेढे खवा । बसून खाऊं लागले मेवा । थव्यामागें लागला थवा । तेथें भजनकऱ्यांचा ॥ ८४ ॥ पर्व संपेपर्यंत । अभिषेकाची मंदिरांत । गर्दी झाली अत्यंत । शब्द कोणाचा कोणा न कळे ॥ ८५ ॥ रम्यशा त्या ओंकारीं । समर्थांची बैसली स्वारी । पद्मासन घालूनी कांठावरी । त्या महानदी नर्मदेच्या ॥ ८६ ॥ चौघे दर्शन घेऊन आले । समर्था विनवूं लागले । आतां पाहिजे सोडिलें । जाणें सडकेनें आपणा ॥ ८७ ॥ कां कीं भीड झाली फार । गाड्या मोडती वरचेवर । बैल गाडीचे बुजार । आहेत आपुल्या त्यांतूनी ॥८८॥ खेडीघाट



स्टेशनाला । जाण्यायेण्याच्या करार केला । गाडीवाल्यानें तो भला । न सांगतां गुण बैलांचें ॥ ८९ ॥ बसतां आले कळून । आपण होतां म्हणून । पोंचलों येथें येऊन । बैल द्वाड गाडीचे ॥ ९० ॥ परत ते बसून गाडींत । जाणें न निर्भय वाटत । म्हणून या नावेंत । बसून जाऊं स्टेशनाला ॥ ९१ ॥ गर्दी झाली रस्त्यांनीं । नदींतून जाऊं शांतपणीं । ऐसेंच केलें कित्येकांनी । त्या पाहा नावा चालल्यात ॥ ९२ ॥ तुम्हांस वाटेल तेच करा । आम्हां न कांहीं विचारा । मी वचनांत गुंतलो खरा । तुम्ही बसाल तेथे येऊं ॥ ९३ ॥ ऐसें समर्थ बोललें । त्यांच्यासवें नावेंत बैसलें । नदींतून जाऊं लागले । खेडीघाट स्टेशनला ॥ ९४ ॥ तों नदींत मध्यंतरी । नांव आदळली खडकावरी । फळी फुटून गेली सारी । तिच्या बुडाची एक हो ॥ ९५ ॥ छिद्र पडलें आरपार । येऊं लागले आंत नीर । नावाड्यानें सत्वर । नदींत उड्या टाकिल्या ॥ ९६ ॥ परी महाराज निर्धास्त होतें । 'गिनगिन गणांत बोते' । ऐसें भजन मुखातें । चाललें होतें अखंड ॥ ९७ ॥ मार्तंड बजरंग मारुती । घाबरून गेले अती । उडूं लागली धडधडा छाती । बंकटलालाची विबुध हो ॥ ९८ ॥ चवघे समर्थां बोलले । आम्ही अपराधी आहों भले । आम्ही न तुमचें ऐकिलें । शेगांवांत दयाळा ॥ ९९ ॥ त्याचें दिलें आम्हा फळ । तुम्ही आज तात्काळ । नर्मदाच झाली काळ । आम्हांलागी बुडवावया ॥ १०० ॥ गुरुराया आपुली वाणी । वेदतुल्य मानूं येथूनी । वांचवा संकटांतूनी । शेगांव दृष्टी पडूं द्या ॥ १ ॥ ऐसें जों ते बोलतात । तों निम्म्यावरी पाण्यांत । नाव बुडाली लोटत लोटत । एक फर्लांग गेली हो ॥ २ ॥ कांहीं लोक बोलती ऐसे । मेली ही पांच माणसें । आता

यांचा भरंवसा नसे । अथांग पाणी नर्मदेला ॥ ३ ॥ तई म्हणाले गजानन । नका होऊं हैराण । तुमच्या जीवालागून । धक्का न लावी नर्मदा ॥ ४ ॥ ऐसें म्हणून स्तवन केलें । नर्मदेचें त्यांनीं भलें । हे चवघे बैसले । हात जोडून नावेंत ॥ ५ ॥

श्लोक ( अनुष्टुप् छंद )

नर्मदे मंगले देवी । रेवे अशुभनाशिनी ।
मंतु[1] क्षमा करी यांचा । दयाळू होऊनी मनीं ॥

ऐसें स्तवन चाललें । तों आतील पाणी निघून गेलें । नर्मदेनें लाविलें । आपुल्या करास त्या छिद्रा ॥ ६ ॥ नाव श्रोते पहिल्यापरी । आली जलाचिया वरी । त्या नावेच्या बरोबरी । होती प्रत्यक्ष नर्मदा ॥ ७ ॥ कोळणीचा धरला वेष । मस्तकावरी कुरळ केश । भिजविलें जियेच्या वस्त्रास । कंबरेपर्यंत जलानें ॥ ८ ॥ नौका कांठास लागली । अवघ्यांनीं ती पाहिली । आश्चर्यचकित मुद्रा केली । पाहून तळाच्या छिद्राला ॥ ९ ॥ ही बाई होती म्हणून । आमुचे वांचले प्राण । बाई आपण कोठील कोण ? । हें कांहीं सांगा हो ॥ १० ॥ सोडा वस्त्र भिजलेलं । आम्ही नवें देतो भलें । तई नर्मदेनें पहा केलें । अशा रीतीनें भाषण ॥ ११ ॥ मी ओंकार कोळ्याची कन्यका । माझें नांव नर्मदा ऐका । आम्हां परिपाठ आहे देखा । ओलें वस्त्र नेसण्याचा ॥ १२ ॥ मी ओलीच राहातें निरंतर । माझेंच रूप आहे नीर । ऐसें बोलून नमस्कार । करून गेली गजानना ॥ १३ ॥



१ अपराध.

क्षणामाजीं नाहींसी । झाली ती नर्मदेसी । वीज चमकून आकाशीं । घनीं जैसी लीन होते ॥१४॥ तो पहाता प्रकार । चवघे आनंदले फार । कळला स्वामींचा अधिकार । नर्मदा आली दर्शना ॥ १५ ॥ बंकट विचारी खोदून । समर्था ही स्त्री कोण ? । तें सांगावें फोडून । गुप्त कांहीं ठेवू नका ॥ १६ ॥ तई महाराज वदले तत्त्वतां । तुम्ही जे कां विचारितां । तो कथिला आहे गाथा । नर्मदेनें तुम्हांस ॥ १७ ॥ कोळी जो का ओंकार । तोच हा ओंकारेश्वर । माझेंच रूप आहे नीर । ऐसें नर्मदा वदली ना ? ॥ १८ ॥ अरे ती प्रत्यक्ष नर्मदा । संशय तेथें न घ्यावा कदा । संकटामाजी देते सदा । हात ती आपुल्या भक्तांतें ॥ १९ ॥ म्हणून तिचा जयजयकार । करा मोठ्यानें एक वार । जय जय नर्मदे निरंतर । ऐसेंच रक्षण अंबे करी ॥ २० ॥ ऐसें ऐकतां वचन । बंकटलालादी चवघे जण । समर्थांचे दिव्य चरण । वंदूं लागलें क्षणाक्षणां ॥ २१ ॥ परत आले शेगांवांत । ज्यांना ज्यांना हीच मात । होऊनिया हर्षभरित । सांगूं लागले विबुध हो ॥ २२ ॥ सदाशिव रंगनाथ वानवळे । एक्या गृहस्थासमवेत भले । शेगांवांत येते झाले । महाराजांच्या दर्शना ॥ २३ ॥ या सदाशिवाकारण । टोपण नांव तात्या जाण । हे माधवनाथाचे छात्रगण । चित्रकूटाच्या होते हो ॥२४॥ या माधवनाथाप्रत । योगांगें होती अवगत । ज्यांचा शिष्यगण माळव्यांत । आहे मोठ्या प्रमाणीं ॥ २५ ॥ सदाशिव आले शेगांवाला । जेव्हां श्रीच्या दर्शनाला । तेव्हां महाराज भोजनाला । बसले होते मठांत ॥ २५ ॥ सदाशिवासी पाहून । माधवाची झाली आठवण । गजाननाकारण । संत संता जाणती ॥ २७ ॥ वानवळें येतांक्षणी । महाराज बोलले मोठ्यांनी । अरे नाथाच्या शिष्यालागुनी । बसवा आणून

माझ्यापुढें ॥ २८ ॥ त्यांचे गुरु माधवनाथ । गेले जेवून इतक्यांत । मठीं माझ्या समवेत । तो हें दोघे पातले ॥ २९ ॥ थोडा वेळ आधी जरी । हे आले असते तरी । भेट त्यांच्या गुरूची खरी । होती यांना मठांत ॥ १३० ॥ आतां हे मागून आले । गुरु त्यांचे निघून गेले । विडा न घेतां भले । त्याची करूं पूर्तता ॥ ३१ ॥ वानवळ्यासी आलिंगन । देते झाले दयाघन । पोरे बंधूचीं म्हणून । ऐसा तो संतप्रेमा ॥ ३२ ॥ रीतिप्रमाणें सत्कार केला । वानवळ्याचा शेगांवाला । जातांना त्या निरोप दिला । समर्थांनी येणें रीति ॥ ३३ ॥ तुम्ही माधवनाथाला । असेच जा भेटण्याला । त्यांचा येथें राहिला । विडा तो त्या द्यायास ॥ ३४ ॥ मी म्हणतों तेंच सांगा । पदरचे न घाला बघा । आमच्या वाक्यामाजी उगां । फरक तुम्ही करूं नये ॥ ३५ ॥ म्हणा "साथें भोजन हुवा । विडा तुम्हारा याही रहा । तो आम्ही आणिला पाहा । नाथा तुम्हां द्यावयास" ॥ ३६ ॥ हें सारें बोलणें । ऐकलें त्या वानवळ्यानें । घेऊन विड्याची दोन पानें । गमन करितां जाहला ॥ ३७ ॥ माधवनाथा हकीकत । त्याने कथिली इत्थंभूत । महाराज आपण शेगांवांत । आला होता कां ते दिनीं ? ॥३८॥ गजानन जें बोललें । तैसेंच आहे जाहलें । भोजनसमयीं त्यांनीं केलें । स्मरण माझें तीच भेट ॥ ३९ ॥ ऐशा रीतिं एकमेकां । आम्हीं भेटतों सदैव देखा । येथें शंका घेऊ नका । स्मरण तीच भेट होय ॥ १४० ॥ त्यांचा माझा एक प्राण । शरीरें ही मात्र भिन्न भिन्न । हें आहे खोल ज्ञान । तें न इतक्यांत कळें तुम्हां ॥ ४१ ॥ बरें झालें आणिला । आमुचा विडा तुम्हीं भला । जो होता राहिला । शेगांवीं शिष्य हो ॥ ४२ ॥



पानें देतां वानवळ्यांनीं । ती भक्षिलीं नाथांनीं । खलबत्त्यांत कुटूनी । थोडा प्रसाद दिला त्याला ॥ ४३ ॥ संतभेटी होती कैसी । हें चांगदेवपासष्टीसी । सांगते झाले ज्ञानराशी । श्रीज्ञानेश्वर महाराज ॥ ४४ ॥ तीं पासष्टी मनीं आणा । म्हणजे ह्या कळतील खुणा । स्वानुभवाच्या ठायीं जाणा । वाव न तर्काकारणें ॥ ४५ ॥ योगी वाटेल तेथोनी । भेटे एकमेकांलागूनी । भेट ठायींच बैसोनी । होते त्यांचे कौतुक हें ॥ ४६ ॥ शेख महंमद श्रीगोंद्यांत । तुकाराम होते देहूंत । आग लागतां मंडपाप्रत । देहूमाजीं कीर्तनाच्या ॥ ४७ ॥ ती शेख महंमदांनीं । विझविली श्रीगोंद्यांत बैसूनी । हें महिपतीनीं लिहूनी । ठेविलें भक्तिविजयांत ॥ ४८ ॥ जाऊन हळी खेड्यांत । विहिरींत बुडतां पाटीलसुत । वांचविले देऊन हात । महाराज माणिकप्रभूंनीं ॥ ४९ ॥ खरा योगी असल्याविना । ऐसें कौतुक होईना । हें न साधे दांभिकांना । त्यांनीं गप्पाच माराव्या ॥ १५० ॥ योग अवघ्यांत बलवत्तर । त्याची नये कोणां सर । करणें असल्या राष्ट्रोद्धार । त्याचा अवलंब करा हो ॥ ५१ ॥ श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । ऐकोत सदा प्रेमळ भक्त । निष्ठा ठेवून ग्रंथावरी ॥ १५२ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति चतुर्दशोऽध्यायः समाप्तः ॥

❀ ❀ ❀ ❀

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य चतुर्दशोऽध्यायः समाप्त ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १५.



श्रीगजानन महाराज उजव्या बाजूस खुर्चीवर बसलेले असून लो. टिळक भाषण करीत आहेत

श्रीगणेशाय नमः ॥ हें कश्यपात्मज वामना । हे बटुरूपधारी नारायणा । तूं बलीच्या घेऊनी दाना । कृतार्थ त्याला केलेंस ॥ १ ॥ राज्य मृत्युलोकींचें । घेतलें त्वां जरी साचें । तरी दिलें पाताळाचें । राज्य बलीकारणें ॥ २ ॥ आंवळा घेऊन नारळ दिला । तुम्ही त्या पुण्यवंत बलीला । आणि त्याच्या भक्तीस्तव झाला । द्वारपाल द्वारीं तुम्ही ॥ ३ ॥ या मन्वन्तरानंतर । बलीच आहे होणार । देवांचा राजराजेश्वर । देवा तुझ्या वरानें ॥ ४ ॥ एका घटकेंत अनंता । चहूं वेदांच्या संहिता । पठण केल्या बुद्धिमत्ता । केवढी तुझी अगाध तरी ! ॥ ५ ॥ अवघ्यां तुझ्या अवतारीं । हा सोंवळा अवतार श्रीहरी । कोणाचाही भूमीवरीं । वध न तुम्ही केलात ॥ ६ ॥ शत्रुमित्रांच्या घरीं दिवा । ये अवतारी लाविला बरवा । देव आणि दानवा । तूं वंद्य सारखाच ॥ ७ ॥ देव तेही आनंदविले । राक्षस तेही रक्षिलें । आपलें ईशत्व सांभाळिलें । याच अवतारी देवा तूं ॥ ८ ॥ तुला माझा नमस्कार । असो वामना वारंवार । मस्तकीं ठेवा वरदकर । तुम्ही दासगणूच्या ॥ ९ ॥ टिळक बाल गंगाधर । महाराष्ट्राचा कोहिनूर । दूरदृष्टिचा सागर । राजकारणीं प्रवीण जो ॥ १० ॥ निज स्वातंत्र्याच्यासाठी । ज्यानें अनंत केल्या खटपटी । ज्याची धडाडी असे मोठी । काय वर्णन तिचें करूं ? ॥ ११ ॥ करारी भीष्मासमान । आर्य महीचें पाहून दैन्य । सतीचें झाला घेतां वाण । भीड न सत्यांत कोणाची ॥ १२ ॥ वाक्चातुर्य जयाचें । बृहस्पतीच्या समान साचे । धाबें दणाणें इंग्रजांचें । पाहून ज्याच्या लेखाला ॥ १३ ॥ कृति करून मेळविली । ज्यानें लोकमान्य ही पदवी भली । ती न कोणी त्यांना दिली । ऐसा होता बहादर ॥ १४ ॥

तो एके काळीं अकोल्याला । शिवजयंतीच्या उत्सवाला । लोकाग्रहें येतां झाला । व्याख्यान द्याया कारणें ॥ १५ ॥ झाली तयारी उत्सवाची । त्या अकोल्यामध्यें साची । मोठमोठाल्या विद्वानांची । गेली गडबड उडून ॥ १६ ॥ दामले, कोल्हटकर, खापर्डे । आणखी विद्वान् बडेबडे । जमते झाले रोकडे । तया अकोल्या ग्रामासी ॥ १७ ॥ अध्यक्ष त्या उत्सवाचे । नेमिले होते टिळक साचे । नांव ऐकतां टिळकांचे । वऱ्हाड सारें आनंदलें ॥ १८ ॥ शिवरायाची जयंती । याच्या आधींच या प्रांतीं । झाली पाहिजे होती । त्याचे कारण ऐसें पहा ॥ १९ ॥ शिवाजीची जन्मदात्री । जी वीरमाता जिजा सती । ती वऱ्हाडीच आपुली होती । सिंधखेडीं जन्म जिचा ॥ २० ॥ त्या वीरगाजी शिवाजीला । जिनें पोटी जन्म दिला । वऱ्हाड-महाराष्ट्र एक झाला । या सतीच्या कर्तृत्वें ॥ २१ ॥ माता होती वऱ्हाडी । पिता महाराष्ट्री शहाजी गडी । अवघ्या दंपत्यांत ही जोडी । खचित होती अनुपम ॥ २२ ॥ आधींच उत्सव शिवाजीचा । जो कलिजा महाराष्ट्राचा । आणखी वरी अध्यक्ष त्याचा । टिळक बाळ गंगाधर ॥ २३ ॥ आधीं एक महिना तयारी । उत्सवाची चालली खरी । ज्याच्या त्याच्या अंतरीं । आनंद होत चालला ॥ २४ ॥ अध्यक्ष उपाध्यक्ष निवडले । स्वयंसेवक तयार झाले । तईं कइकांचें म्हणणें पडलें । ऐशा रीति विबुध हो ॥ २५ ॥ या शिवजयंती उत्सवाला । आणा शेगांवचे महाराजाला । श्रीस्वामी गजाननाला । म्हणजे दुधांत साखर पडेल कीं ॥ २६ ॥ शिवाजीच्या राष्ट्रोद्धारा । आशीर्वाद होता खरा । समर्थांचा साजिरा । म्हणून तडीस गेला तो ॥ २७ ॥ टिळकांचें राजकारण । हेंच जिजाई-हृदय रत्न । त्याला पाहिजे आशीर्वचन ।



समर्थांचें विबुध हो ॥ २८ ॥ ते कित्येकां पसंत पडलें । कित्येकांस नाहीं रुचलें । ज्यां न रुचलें ते बोलले । उघड येणें रीति ॥ २९ ॥ तो शेगांवाचा अवलिया । कशास आणितां ये ठाया । तो कांहीं तरी करूनियां । विक्षोभ करील सभेचा ॥ ३० ॥ फिरेल नागवा सभेंत । "गिण गिण गणांत" ऐसे म्हणत । मारील वाटे कदाचित् । तो लोकमान्याला ॥ ३१ ॥ कांहीं लोक बोलले । हें न म्हणणें चांगलें । गजाननाचीं पाउलें । लागली पाहिजेत सभेला ॥ ३२ ॥ त्याचें जें कां वेडे-पण । तें आहे वेड्याकारण । जे कोणी विद्वान् सज्जन । त्यासी न वदती वेड्यापरी ॥ ३३ ॥ खरेखुरे राष्ट्रोद्धारक । जरी टिळक असतील एक । तरी महाराज निःशंक । सभेसी येतील ये ठायां ॥ ३४ ॥ खऱ्याखोट्याची परीक्षा । साधूच हे करिती देखा । म्हणून सांगतो भिऊं नका । त्यांना आमंत्रण देण्यास ॥ ३५ ॥ ऐसी भवति न भवति झाली । मंडळी शेगांवास आली । आमंत्रण ते द्याया भली । सभेचे श्रीगजानना ॥ ३६ ॥ येतांच दादा खापर्ड्योसी । बोलते झाले पुण्यराशी । आम्ही येऊं सभेसी । तुमच्या शिवाजी उत्सवाच्या ॥ ३७ ॥ वेड्यापरी न तेथें करूं । जागीच बसून मौन धरूं । सुधारकांचा कधीं न करूं । मनोभंग मनाचा ॥ ३८ ॥ करावयासी राष्ट्रोद्धार । योग्य बाळ गंगाधर । याच्या परी न होणार । राष्ट्रप्रेमी पुरुष पुढे ॥ ३९ ॥ स्नेही त्या टिळकांचा । अण्णा पटवर्धन नांवाचा । शिष्य नरसिंहसरस्वतीचा । आळंदीचा असे जो ॥ ४० ॥ त्या दोघां पुरुषां पाहण्यास । आम्ही येऊं अकोल्यास । ते ऐकतां खापर्ड्यास । अती आनंद जाहला ॥ ४१ ॥ पाहा पाहा कोल्हटकरा । वऱ्हाडप्रांताचा ज्ञानहिरा । यानें वृत्तान्त जाणिला

सारा । जो का झाला अकोल्यात ॥ ४२ ॥ यावरून संतांचे । ज्ञान केवढें अगाध साचें । खऱ्या राष्ट्रपुरुषाचें । प्रेम यांना पाहा किती ॥ ४३ ॥ बोलावयाची आपणांस । जरूर पडली कांहीं न खास । तेच होऊन आपणांस । येतो म्हणून म्हणाले ॥ ४४ ॥ मुहुर्त या उत्सवाला । अती उत्तम लागला । चला वंदुन समर्थाला । आपण जाऊं अकोल्यास ॥ ४५ ॥ खापर्डे कोल्हटकर । निघून गेले साचार । आला आठ दिवसांवर । सभेचा तो दिवस पाहा ॥ ४६ ॥ वऱ्हाड सारे आनंदले । ज्यांना त्यांना वाटलें । कधीं टिळकांचीं पाउलें । पाहूं आम्ही अकोल्यांत ॥ ४७ ॥ शके अठराशें तिसासी । ती सभा होती वैशाखमासीं । वऱ्हाडप्रांतीं अकोल्यासी । उभारलेल्या मंडपांत ॥ ४८ ॥ सण अक्षय्यतृतीयेचा । वऱ्हाडप्रांतीं महत्त्वाचा । परी समुदाय जनांचा । मिळता झाला प्रचंड ॥ ४९ ॥ तोच अखेरीचा दिन । त्या सभेचा होता जाण । लोक आले लांबलांबून । लोकमान्यांसी पाहावया ॥ ५० ॥ शिवाय श्रोते त्या दिवशीं । महाराज येणार सभेसी । ऐसी खबर लोकांसी । आधींच होती विबुध हो ॥ ५१ ॥ मंडप चिकार भरून गेला । जो तो पाहूं लागला । म्हणती कां हो सभेला । अजूनी न आले महाराज ॥ ५२ ॥ परी ते सभा भरण्याआधीं । येऊन बसले मंडपामधीं । साधु आपल्या वाणीस कधीं । असत्यता न येऊं दे ॥ ५३ ॥ सभेमाजीं उच्च स्थानीं । बसले होते कैवल्यदानी । गादीस लोडा टेकूनी । जीवन्मुक्त साधूवर ॥ ५४ ॥ सिंहासनाच्या अग्रभागा । टिळकांस दिली होती जागा । त्यांच्या सन्निध बसले बघा । अण्णासाहेब पटवर्धन ॥ ५५ ॥ श्रीकृष्णाचा नंदन । गणेश ज्याचें नामाभिधान । खापर्डे कुलाचा कुलभूषण । एक्या बाजूस टिळकांच्या ॥ ५६ ॥



दामले कोल्हटकर त्या ठायीं । भावे व्यंकटराव देसाई । सभेचे पुढारी पाही । चमकत होते ते ठाया ॥ ५७ ॥ आणिक व्याख्याते विद्वानेतर । बसले होते सभोंवार । त्यांचें वर्णन कोठवर । करावें मी एक्या मुखें ॥ ५८ ॥ सभेलागीं आरंभ झाला । हेतु प्रथम निवेदिला । मग व्याख्यान-सिंह उठला । टिळक बोलावयातें ॥ ५९ ॥ दिवस “ आजचा धन्य धन्य । आहे पहा हो सज्जन । स्वातंत्र्यासाठीं ज्यानें प्राण । खर्चिले आपुले पूर्वकालीं ॥ ६० ॥ त्या धनुर्धर योद्ध्याची । वीर गाजी शिवाजीची । जन्म-जयंति आहे साची । म्हणून आपण मिळालों ॥ ६१ ॥ त्या रणगाजी शिवाजीला । रामदासें हातीं धरिला । म्हणून त्याचा बोलवाला । झाला भरतखंडामध्यें ॥ ६२ ॥ तेवींच आज येथें झाले । आशीर्वाद द्याया आले । श्रीगजानन साधु भले । आपुलिया सभेस ॥ ६३ ॥ म्हणून शिवाजीचे परी । सभा यशस्वी होवो खरी । अशाच सभेची जरुरी । आहे सांप्रत राष्ट्राला ॥ ६४ ॥ स्वातंत्र्यसूर्य मावळला । दास्यत्वाचा काळोख पडला । स्वातंत्र्य नाहीं जगीं ज्याला । तो समाज प्रेतवत् ॥ ६५ ॥ यासाठीं म्हणून । आहे करणें प्रयत्न । ज्या शिक्षणेंकरून । राष्ट्रप्रेम वाढेल हो ॥ ६६ ॥ ऐसें शिक्षण पुढिल्याप्रती । देणें भाग निश्चिती । तें शिक्षण हा भूपती । देईल कां हो अर्भकाला ?” ॥ ६७ ॥ ऐसें टिळक म्हणाले । महाराज आसनीं उठून बसले । गर्जून त्रिवार बोलले । नाहीं नाहीं ऐसें पहा ॥ ६८ ॥ आवेशाच्या भरांत । बोललें गंगाधरसुत । जें बोलणें किंचित् । टोचून होतें राजाला ॥ ६९ ॥ त्या भाषणाचा रोख भला । समर्थांनीं जाणिला । आणि हांसत हांसत शब्द केला । ऐशा रीतिं श्रोते हो ॥ ७० ॥ अरे अज्ञानेंच पडतात । काढण्या

दोन्ही दंडाप्रत । ऐसें बोलून गणगणांत । भजन करूं लागले ॥ ७१ ॥ सभा निर्विघ्न पार पडली । टिळकांची वाहवा झाली । खरें झालें त्याच सालीं । समर्थांचें भाकित ॥ ७२ ॥ भूपतीनें टिळकाला । एकशे चोवीसाखालीं धरिला । दोन्या पडल्या दंडाला । आला प्रसंग शिक्षेचा ॥ ७३ ॥ राजसत्तेचिया पुढें । कोणाचेंही न चाले घोडें । वकील होते बडे बडे । ते झटूं लागले टिळकांस्तव ॥ ७४ ॥ प्रेमी मंडळी टिळकांची । जी कां होती जिव्हाळ्याची । त्यांनीं पारमार्थिक उपायांची । केली योजना एक अशी ॥ ७५ ॥ दादासाहेब खापर्डे । हेही होते गृहस्थ बडे । ते उमरावतीहून मुंबईकडे । जाऊं लागलें खटल्यास्तव ॥ ७६ ॥ अकोल्याच्या स्टेशनावरी । कोल्हटकरास मधुरोत्तरीं । बोलतें झाले ऐशापरी । तें थोडकें सांगतों ॥ ७७ ॥ तुम्ही जावें शेगांवासी । समर्थां विनंती करा ऐसी । सोडवा बाळ टिळकासी । प्रसंग मोठा दुर्धर ॥ ७८ ॥ मीच गेलों असतों तेथें । परी मी जातों मुंबईतें । तुम्ही जाऊन शेगांवातें । विनंती करी महाराजा ॥ ७९ ॥ लगेंच बसला गाडींत । कोल्हटकर टिळक-भक्त । येतां झाला शेगांवांत । स्वामी गजाननाकडे ॥ ८० ॥ तई महाराज मठातें । निज आसनीं निजून होते । तीन दिवस जहाले पुरते । परी न उठले यत्किंचित् ॥ ८१ ॥ कोल्हटकराहि तोंवरी । बसला मठाभीतरीं । जो का असेल बिगारी । तो न ऐसें वागे कदा ॥ ८२ ॥ कळकळ टिळकाविषयींची । कोल्हटकरा पूर्ण साची । कमाल त्यानें चिकाटीची । केली असे आपुल्या ॥ ८३ ॥ जाळावांचून नाहीं कड । मायेवाचून नाहीं रड । ऐसी आहे एक जाड । म्हण



मराठी भाषेमध्यें ॥ ८४ ॥ चवथे दिवशीं समर्थ उठले । कोल्हटकरास बोलते झाले । तुम्हीं अलोट प्रयत्न केले । परी फळ न येईल त्या ॥ ८५ ॥ अरे छत्रपती शिवाजीला । रामदासांचा वाशिला । होता परी तो कैद झाला । बादशाही अमलांत ॥ ८६ ॥ सज्जनास त्रास झाल्याविना । राज्यक्रांति होईना । कंसाचा तो मनीं आणा । इतिहास म्हणजे कळेल ॥ ८७ ॥ ही मी देतों भाकर । ती खाऊं घाला लौकर । टिळकांप्रती अंतर । यांत कांहीं करूं नका ॥ ८८ ॥ या भाकरीच्या बळावरी । तो मोठी करील कामगिरी । जातो जरी फार दुरी । परी न त्याला इलाज ॥ ८९ ॥ ऐसें ऐकतां उत्तर । साशंक झाले कोल्हटकर । समर्थां करून नमस्कार । भाकर करीं घेतली ॥ ९० ॥ ती नेऊन मुंबईला । घातली टिळकास खावयाला । वृत्तान्त तोही कथन केला । अथपासून इतिवरी ॥ ९१ ॥ तो ऐकून लोकांप्रत । टिळक बोलले हंसत हंसत । स्वामींचें तें अगाध सत्य । ज्ञान आहे खचित पहा ॥ ९२ ॥ यश तुमच्या प्रयत्नांसी । नाहीं निश्चयेसी । आपली बाजू रक्षण्यासी । सरकार न्याया पाळील ना ॥ ९३ ॥ जेव्हां स्वार्थाचा संबंध नसतो । तेव्हां न्याय आठवतो । हा जगाचा सिद्धांत तो । होईल खोटा कोठूनी ? ॥ ९४ ॥ माझ्या हातें कामगिरी । मोठी होणार आहे खरी । ऐसी समर्थांची वैखरी । बोलली हें गूढ एक ॥ ९५ ॥ भूत भविष्य वर्तमान । जाणताती साधुजन । आपण मनुष्य सामान्य । पाहूं पुढें काय होतें ॥ ९६ ॥ प्रसाद म्हणून भाकरी । ती कुसकरून भक्षिली खरी । दंत न मुखाभीतरीं । परी प्रसाद टाकवेना ॥ ९७ ॥ झाली शिक्षा टिळकांस । नेले ब्रह्मदेशीं मंडाल्यास । तेथें जन्मला गीतारहस्य । गीतेवरील ग्रंथ त्यांचा ॥ ९८ ॥ हीच मोठी

कामगिरी । झाली त्यांच्या हस्तें खरी । मान जगत् गुरूपरी । मिळता झाला टिळकातें ॥ ९९ ॥ या गीताशास्त्रावर । टीका झाल्या अपार । त्या सांगू तरी कोठवर ! । मति नाहीं दासातें ॥ १०० ॥ बुध हो प्रत्येक आचार्यांनीं । कालमानाते पाहूनी । केली गीतेची मांडणी । जगदोद्धार करावया ॥ १ ॥ कोणी लाविली अद्वैतपर । कोणी लाविली द्वैतपर । कोणी लाविली कर्मपर । त्याच एका गीतेला ॥ २ ॥ हीच मोठी कामगिरी । त्यांच्या हस्ते झाली खरी । या कामाची न ये सरी । कोणत्याही कृत्यातें ॥ ३ ॥ येणेंच बाळ गंगाधर । जगतीं होतील अजरामर । कीर्ति त्यांची दूरवर । पसरवील ग्रंथ हा ॥ ४ ॥ स्वातंत्र्य जरी मिळविलें असतें । तरी न ऐसी कीर्ति टिकते । पहा करून चित्तातें । पूर्णपणें विचार ॥ ५ ॥ स्वातंत्र्य हें साचार । येते जाते वरच्यावर । त्यांत फारसें नाहीं सार । तो व्यवहार लौकिकीं ॥ ६ ॥ गीताशास्त्राचें तसें नाहीं । तें मोक्षपदाप्रती देई । आणि समाजाची बसवी पाही । विस्कळीत घडी हें ॥ ७ ॥ यावच्चंद्रदिवाकर । पुरुष बाळ गंगाधर । चिरंजीव निरंतर । राहील कीर्तिरूपानें ॥ ८ ॥ असो करवीर कोल्हापुरीचा । द्विज चित्पावन जातीचा । श्रीधर गोविंद नांवाचा । काळे उपनांव जयाचें ॥ ९ ॥ तो गरीबीच्या स्थितींत । गेला इंग्रजी शाळेंत । आंग्लविद्या शिकण्याप्रत । मॅट्रिक परीक्षा पास झाला ॥ ११० ॥ पुढें कॉलेजांत गेला । परी इन्टर नापास झाला । म्हणून फिरत राहिला । वर्तमानपत्रें वाचीत ॥ ११ ॥ तों ' केसरी ' पत्रांत । वाचलें ओयामा टोगो चरित्र । तेणें त्याच्या मनांत । वृत्ति एक उठली अशी ॥ १२ ॥ आपण जावें विलायतेला । यंत्रविद्या ही शिकण्याला । उगे भार भूमीला । होण्यामाजीं अर्थ काय ? ॥ १३ ॥ टोगो



यामा दोघेजण । प्रथमतः ज्ञान संपादून । अभ्युदयाकारण । जपान आणीते जहाले ॥ १४ ॥ तैसें आपण करावें । मायभूमीला उद्धरावें । ऐसा विचार त्याच्या जीवें । घेतला परी इलाज ना ॥ १५ ॥ द्रव्याची न लागे संगत । कोणींहीं ना करी मदत । घरची गरीबी अत्यंत । काय करितो बिचारा ॥ १६ ॥ तो आपल्या मित्रासी । आला भेटण्या भंडाऱ्यासी । जो मन्रो हायस्कुलासी । होता एक शिक्षक ॥ १७ ॥ त्यासी विचार आपुला । श्रीधरानें कळविला । तोही त्याला पसंत पडला । परी पैशाची वाट काय ? ॥ १८ ॥ मित्रा, एक पैशाविणें । कांहीं नाहीं जगीं होणें । दरिद्यानें मनींच करणें । मनोराज्य बापा रे ॥ १९ ॥ चला जाऊं गांवाला । आपल्या जन्मभूमीला । त्या करवीर कोल्हापुराला । इकडे उन्हाळा विशेष ॥ १२० ॥ दोघे बसले गाडींत । समर्थांची ऐकून कीर्त । उतरते झाले शेगांवांत । साधु कसा तो पहावया ॥ २१ ॥ पोस्टमास्तराच्या दारीं । सामान ठेविलें सत्वरी । आतुरता मोठी अंतरी । समर्थाला पहाण्याची ॥ २२ ॥ दोघे आले मठांत । समर्था केलें दंडवत । बैसते झाले जोडून हात । स्वामींचिया सन्मुख ॥ २३ ॥ मनोदय श्रीधराचा । समर्थांनी जाणिला साचा । म्हणाले उगींच परदेशाचा । विचार वेड्या करूं नको ॥ २४ ॥ अवघेच कांहीं आहे येथ । अर्थ ना भौतिक शास्त्रांत । सेवी अध्यात्मविद्येप्रत । म्हणजे कृतार्थ होशील तूं ॥ २५ ॥ त्यायोगें विचारक्रांति । श्रीधराच्या झालीं चित्तीं । कोल्हापूरची एक व्यक्ती । आठवली या समयास त्या ॥ २६ ॥ ते स्वामी कुंभारगल्लीचे । होते कोल्हापुरीचे । बोलणें याच परीचें । होतें हमेशा भक्तांसी ॥ २७ ॥ तैसेच हेही गुरुमूर्ती । भक्तांसवें भाषण करिती । याचा

उलगडा चित्तीं । कांहींच माझ्या होईना ॥ २८ ॥ ऐसें श्रीधर आणिता मनीं । महाराज वदले गर्जोनी । हिंदुस्थाना सोडूनी । उगाच कोठें जाऊं नको ॥ २९ ॥ अगणित करावें पुण्य । तेव्हांच होतें येथें जनन ।.या भौतिक शास्त्राहून । योगशास्त्र समर्थ असे ॥ १३० ॥ तें योगशास्त्र येतें ज्याला । तो न मानी या भौतिकाला । योगशास्त्राहून भला । अध्यात्मविचार श्रेष्ठ असे ॥ ३१ ॥ तो जमल्यास करून पाही । कोठें न आतां जाई येई । ऐसें समर्थ बोलतां पाही । श्रीधर चित्तीं आनंदला ॥ ३२ ॥ पश्चिमेचा मावळला । तोच पूर्वेकडे आला । विचार-सूर्य त्याचा भला । श्रीधरा सुखी करण्यास ॥ ३३ ॥ एक संतावांचून । विचाराचें परिवर्तन । कोणी न करूं शके आन । सत्य एक त्यांना कळे ॥ ३४ ॥ महाराज म्हणाले या ठायीं । तुझा अभ्युदय होईल पाही । कांता वाट पहाते गेहीं । तुझी कोल्हापुराला ॥ ३५ ॥ जा आता मित्रांसहित । आपुल्या कोल्हापुराप्रत । तेंच पुढें झालें सत्य । श्रीधर लौकिका चढले हो ॥३६॥ श्रीधर बी. ए., एम्. ए. झाले । प्रिन्सिपॉल त्या नेमिलें । शिवपुरी कॉलेजाशीं भले । सिंधाचिया राज्यांत॥३७॥ संत साक्षात् ईश्वर । चालते बोलते भूमीवर । त्यांच्या कृपेचा आधार । जया मिळे तोच मोठा ॥ ३८ ॥ पहा काळे श्रीधराला । दर्शनाचा योग आला । म्हणून वृत्तींत फरक पडला । खरें तेंच शोधावया ॥३९॥ हें पीक संतांचें । याच देशीं यावयाचें । वृक्ष नंदनवनींचे । अन्य ठायीं न येती हो ॥१४०॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । दावो सर्वदा सत्पथ । परम भाविकांकारणें ॥ १४१ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति पंचदशोऽध्यायः समाप्तः ॥



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १६.



श्रीगजानन महाराजांना कवरपुत्र त्र्यंबक कांदा–भाकरीचे जेवण देत आहे.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी परशुधरा । हे जमदाग्नीच्या कुमरा । परशुरामा परमेश्वरा । आतां उपेक्षा करूं नको ॥ १ ॥ तूं सहस्रार्जुनातें वधून । केलें द्विजांचें संरक्षण । ब्राह्मणांचा अपमान । सहन झाला नाहीं तुला ॥ २ ॥ आतां मात्र डोळे मिटिसी । कां रे देवा ब्राह्मणांविशीं ? । काय आहे लागली तुसी । गाढ निद्रा येघवां ॥ ३ ॥ म्हणून डोळे मिटूं नका । स्वस्थ ऐसे बसूं नका । आणीबाणीचा प्रसंग देखा । आहे हरी सांप्रत ॥ ४ ॥ तुझ्या वशिल्यांवाचून । अत्रर्थी कृत्यें आहेत क्षीण । आर्यसंस्कृतीचें रक्षण । होणें नाहीं तुझ्याविण ॥ ५ ॥ गजाननमाया अघटित । कोण जाणे तिजप्रत । महाराजांचा एक भक्त । पुंडलिक नामें मुंडगांवीं ॥ ६ ॥ हा शेगांवची करी वारी । समर्थांविषयीं प्रेम भारी । हमेश त्याचें चिंतन करी । एकाग्रशा मनानें ॥ ७ ॥ त्याच गांवीं भागाबाई । एक ठाकरीण होती पाही । निष्ठा तिची एक्याही । ठिकाणासीं बसत नसे ॥ ८ ॥ ती दांभिक होती फार । सदा दंभाचा बाजार । भरवून भोंदी नारीनर । हाच धंदा तियेचा ॥ ९ ॥ ती बोलली पुंडलीकाला । तुझा जन्म वांया गेला । का कीं तूं नाहीं केला । सद्गुरू तो आपणातें ॥ १० ॥ गजाननाच्या वाऱ्या करिसी । सद्गुरु त्याला मानिसी । परी त्यानें सांग तुसी । मंत्र कानीं कथिला कां ? ॥ ११ ॥ अरे विधीवांचून । गुरु न होत कधीं जाण । शेगांवचा गजानन । वेडापिसा साच असे ॥ १२ ॥ तुझा ताप बरा झाला । म्हणून तूं मानिसी त्याला । या काकतालीयन्यायाला । बळी पुंडलिका पडूं नको ॥ १३ ॥ 'गिन गिन गणातें' हें भजन । पिशापरी आचरण । कोणाचेंही खाई जाण । ऐसा मुको भ्रष्ट तो ॥ १४ ॥ म्हणून तुला

सांगतें । चाल अंजनगांवाते । केकाजींच्या शिष्यातें । आपण दोघे गुरू करू ॥ १५ ॥ उद्यां त्यांचें कीर्तन । अंजनगांवीं असें जाण । तें ऐकावया कारण । उठून जाऊं प्रातःकाळीं ॥ १६ ॥ गुरु असावा महाज्ञानी । चातुर्य-शास्त्र-चिंतामणी । गुरु असावा परमगुणी । भक्तिपथाते दावितां ॥ १७ ॥ यांतील लक्षण एकही । गजाननाच्या नसे ठायीं । म्हणून वेळ न करी कांहीं । चाल अंजनगांवातें ॥ १८ ॥ तो भोकरे पुंडलिक । होता मनाचा भाविक । भागीच्या भाषणें देख । चित्त त्याचें घोटाळलें ॥ १९ ॥ त्यानें ऐसा विचार केला । उदईक अंजनगांवाला । जाऊं कीर्तन ऐकण्याला । पुढचा विचार पुढें करूं ॥ २० ॥ ऐसा विचार करून । भागीसी बोलला जाण । अंजनगांवालागून । चाल येतों तुझ्यासवें ॥ २१ ॥ दोघांचा विचार झाला । पुंडलिक रात्रीं स्वस्थ निजला । तो तीन प्रहर रात्रीला । काय घडलें तें ऐका ॥ २२ ॥ पुंडलिकाच्या समोर । एक पुरुष दिगंबर । उभा राहिला साचार । थेट समर्थांच्या परी ॥ २३ ॥ पुरुष म्हणे रे पुंडलिका । अंजन-गांवासी जातोस कां ? । गुरु करायातें निका । त्या भागीच्या सल्ल्यानें ॥ २४ ॥ जातोस तरी जावें त्वरित । त्याचें नांव काशीनाथ । तेथें जातां फिटेल भ्रांत । तुझी वेड्या निश्चयें ॥ २५ ॥ कानांत कांहीं बोलला । म्हणून कां तो गुरु झाला । लोक कानगोष्टीला । किती तरी करतात ॥ २६ ॥ मग ते एकमेकांचे । काय गुरु होती साचे । नादीं दंभाचाराचे । त्वां पुंडलिका पडूं नये ॥ २७ ॥ तूं इकडे करी कान । मंत्र देतो तुजकारण । 'गण गण' ऐसें बोलून । महाराज स्तब्ध जहाले ॥ २८ ॥ आणखी काय आहे आस । ती मी आज पुरवीन खास । ऐसें ऐकतां पुंडलिकांस । आनंद अति जहाला ॥ २९ ॥



पाहूं लागला निरखून । स्वप्नीं त्या पुरुषालागून । तों पाहिलें गजानन । शेगांवचे स्वामी पहा ॥ ३० ॥ पुंडलिक म्हणे गुरुराया । पादुका द्या ह्या मला सदया । नित्य पूजा करावया । यावीण आणखी आस नसे ॥ ३१ ॥ बरें ! उद्यां दोन प्रहर । दिवस येतां साचार । पादुकांची पूजा कर । ह्या मी दिधल्या घेई तुला ॥ ३२ ॥ पादुका त्या घ्यावयाला । स्वप्नीं पुंडलिक उठून बसला । तोंच आली तयाला । साक्षात् जागृति श्रोते हो ॥ ३३ ॥ जागा होऊनी सभोंवार । पाहूं लागला साचार । तो कोणीच दिसेना अखेर । नाहीं पत्ता पादुकांचा ॥ ३४ ॥ उलगडा कांहीं होईना । संशय मनींचा जाईना । म्हणे स्वामींच्या भाषणा । बाट न लागला आजवरीं ॥ ३५ ॥ स्वप्नीं येऊन दर्शन । त्यांनीं दिलें मजकारण । कशी भागी ठाकरीण । तेंही स्वप्नीं कथन केलें ॥ ३६ ॥ तैसेच उद्यां दोन प्रहरीं । पादुकांची पूजा करी । ऐसें बोलले साक्षात्कारी । त्याचा समजूं काय अर्थ ? ॥ ३७ ॥ किंवा नव्या पादुका करून । म्यां करावें पूजन । ऐसें त्यांचें आहे मन । हें कांहीं कळेना ॥ ३८ ॥ मी पदींच्या मागितल्या । पादुका त्या होत्या भल्या । त्याच त्यांनीं मसी दिल्या । मग नव्या घेऊं कशास ? ॥ ३९ ॥ ऐसें नाना तर्क करी । पुंडलिक आपल्या अंतरीं । तो इतक्यांत आली घरीं । भागी ठाकरीण बोलावण्या ॥ ४० ॥ अंजनगांवीं चाल आतां । मोक्ष गुरु करण्याकरितां । दिसूं लागला आहे आतां रस्ता । अरुणोदयाचे प्रकाशें ॥ ४१ ॥ पुंडलिक म्हणे भागाबाई । मी कांहीं येत नाहीं । मर्जी असल्यास तूंच जाई । अंजनगांवाकारणें ॥ ४२ ॥ मीं जो एकदां गुरु केला । श्रीगजानन महाराजाला । तो न आतां सोडी भला । हाच माझा

निश्चय ॥ ४३ ॥ तें ऐकतां भागाबाई । अंजनगांवास गेली पाही . । आतां मुंडगांवाचें ठाई । काय झालें तें ऐका ॥ ४४ ॥ श्यामसिंग रजपूत । गेला होता शेगांवांत । दर्शन स्वामींचें घेण्याप्रत । दोन दिवस याच्या आधीं ॥ ४५ ॥ तो जेव्हां मुंडगांवाला । येण्या परत निघाला । तई बाळाभाऊला । ऐसें बोलले महाराज ॥ ४६ ॥ या पादुका पुंडलिकासी । द्याया देई याच्यापासी । समर्थ आज्ञा होतां ऐशी । तैसेंच केलें बाळानें ॥ ४७ ॥ करीं घेऊन पादुका । श्यामसिंगास बोलला देखा । मोकरे जो का पुंडलिका । तुमच्या गांवींचा असे हो ॥ ४८ ॥ त्यास ह्या द्या नेऊन । करायासी पूजन । तें श्यामसिंगें ऐकून । पादुका घेतां जाहला ॥ ४९ ॥ श्यामसिंग आला मुंडगांवांत । तों पुंडलिक भेटला वेशींत । पुसूं लागला त्याप्रत । कुशलवृत्त समर्थांचें ॥ ५० ॥ प्रसाद मला द्यावयासी । कांहीं दिला का तुम्हापासी ? । हें ऐकतां श्यामसिंगासी । महदाश्चर्य वाटलें ॥ ५१ ॥ सर्वें घेऊन पुंडलिकाला । श्यामसिंग घेऊनी घरीं गेला । खोदून विचारूं लागला । तूं ऐसें कां विचारलें ? ॥ ५२ ॥ पुंडलिकानें स्वप्नाची । गोष्ट त्याला कथिली साची । ती ऐकतां श्यामसिंगाची । भ्रांति नष्ट झाली हो ॥ ५३ ॥ लगेंच पादुका काढिल्या । पुंडलिकाच्या हातीं दिल्या । त्याच अजून आहेत भल्या । मुंडगांवांत त्याच्या घरीं ॥ ५४ ॥ दोन प्रहरीं पूजन । पुंडलिकानें केलें जाण । मनोभावें करून । त्या प्रसादी पादुकांचें ॥ ५५ ॥ पहा श्रोते खरें संत । सांभाळिती आपुले भक्त । आडमार्गानें किंचित् । जाऊं न देती तयांला ॥ ५६ ॥ निज भक्तांचे मनोरथ । समर्थ कैसे पुरवितात । तें येईल ध्यानांत । या कथेतें



ऐकतां ॥ ५७ ॥ एक माध्यंदिन ब्राह्मण । कवर राजाराम म्हणून । होता धंदा करून । अकोल्यांत सराफीचा ॥ ५८ ॥ सोनें चांदी मुसार । घेणें देणें साचार । मध्यम प्रतीचा सावकार । हा राजाराम कवर असे ॥ ५९ ॥ या राजारामाप्रती । महाराजांची होती भक्ती । म्हणून त्याची संतती । मानूं लागली समर्थां ॥ ६० ॥ या कवराकारण । दोन पुत्र होते जाण । गोपाळ त्र्यंबक म्हणून । लव्हांकुशां-सारिखे ॥ ६१ ॥ कनिष्ठ पुत्र त्र्यंबकाप्रती । भाऊ व्यवहारीं बोलती । तो हैद्राबादेप्रती । गेला डॉक्टरी शिकावया ॥ ६२ ॥ लहानपणापासून । भाऊस होतें देवध्यान । म्हणजे त्र्यंबकालागून । हें येथें विसरूं नका ॥ ६३ ॥ कांहीं संकट पडल्यावरी । तो समर्थांचा आठव करी । राहून त्या भागानगरीं । मुसा नदीच्या कांठाला ॥ ६४ ॥ एवंच भाऊ भक्तिमान । होता लहानपणापासून । त्याचें दैवत गजानन । स्वामी शेगांवग्रामींचें ॥ ६५ ॥ तो सुटीमाजीं आला घरीं । इच्छा उपजली अंतरीं । जाऊनिया शेगांवनगरीं । जेवूं घालावें महाराजा ॥ ६६ ॥ पदार्थ त्यांच्या आवडीचे । करोनिया सर्व साचे । परी हें कैसें व्हावयाचें ? । हाच विचार पडला कीं ॥ ६७ ॥ भाऊ म्हणे गुरुनाथा । काय तरी करूं आतां । मरून गेली माझी माता । लहानपणींच दयाळा ॥ ६८ ॥ घरीं माझें नाहीं कोणी । एक बंधूची कामिनी । जिचें नांव आहे नानी । स्वभाव तापट तियेचा ॥ ६९ ॥ माझ्या आहे ऐसें मनीं । आपणा करावी मेजवानी । आपुल्या आवडीचें करोनी । पदार्थ सारे गुरुराया ! ॥ ७० ॥ भाकरी ती जवारीची । कांदा भाजी अंबाड्याची । ऊन पिठलें हिरवी मिर्ची । ऐसें तयार करावें ॥ ७१ ॥ हे पदार्थ करण्याला । सांगूं कसा मी भावजयीला ? ।

हट्ट एक करण्याला । माता तेंच स्थान असे ॥ ७२ ॥ ऐसा विचार करीत । भाऊ राहिला निवांत । तो कांहीं कामानिमित्त । नानी आली ते ठायां ॥ ७३ ॥ नानी दिराला बोलली । चिंता कशाची लागली ? । मुखश्री ती म्लान झाली । तुमची कशानें ये वेळां ? ॥ ७४ ॥ भाऊ वदे दीनवाणी । काय तुला सांगूं वहिनी ? । माझे जे कां आले मनीं । विचार ते ये वेळा ॥ ७५ ॥ पूर्ण सत्तेवांचून । मनोरेथ ना होती पूर्ण । म्हणून तुला सांगून । काय करणें आहे गे ॥ ७६ ॥ नानी म्हणे त्यावर । सांगून पहा एकवार । तूं माझा धाकटा दीर । मशीं पडदा ठेवूं नये ॥ ७७ ॥ ज्येष्ठ भ्राता पित्यापरी । तत् कांता माय खरी । मानिली पाहिजे साजिरी । तें तुम्ही जाणतसा ॥ ७८ ॥ तें ऐकून भाऊ हंसला । नानीप्रती बोलता झाला । नानी माझ्या मनाला । आज ऐसें वाटतें ॥ ७९ ॥ गजाननाच्या आवडीचें । सर्व पदार्थ करून साचे । आहेत मला न्यावयाचे । त्यांना द्याया शेगांवीं ॥ ८० ॥ तें तूं जरी करशील । तरी तुलाही लागेल । पुण्य आणि होईल । काम माझें त्यायोगें ॥ ८१ ॥ तें ऐकतां बोले नानी । दिराप्रती हास्यवदनीं । यासाठींच कां हो मनीं । सचिंत तुम्ही बैसलात ? ॥ ८२ ॥ सांगा आहे काय करणें । मजला स्पष्ट शब्दानें ? । कांहीं ना आपुल्या गेहीं उणें । कृपेनें गजाननाच्या ॥ ८३ ॥ मग भाऊनें सर्व कांहीं । निवेदन केलें तिला पाही । तीही लागली लवलाही । आनंदानें स्वयंपाका ॥ ८४ ॥ भाजी चून भाकर । हिरव्या मिरच्या ओंजळभर । ठेविल्या आणून समोर । आपुल्या त्या दिराच्या ॥ ८५ ॥ भाकरी तीन कांदे तीन । हरभऱ्याचें चून जाण । लोणी ठेविलें माखून । प्रत्येक त्या भाकरीला ॥ ८६ ॥ नानी





म्हणाली दीराला। आतां शेगांवाला । वेळ थोडका राहिला । आहे पाहा गाडीस ॥ ८७ ॥ ती गाडी चुकल्यावरी । वाया जाईल तयारी । भोजनाच्या वेळेवरी । गेलात तरी उपयोग ॥ ८८ ॥ ऐसें नानी बोलतां । भाऊ निघाला तत्त्वतां । पुसूनिया आपुल्या ताता । येतां झाला स्टेशनासी ॥ ८९ ॥ तों गाडी बाराची । निघूनिया गेली साची । तेणें चित्तवृत्ति भाऊची । होती झाली शोकाकुल ॥ ९० ॥ अति हिरमोड त्याचा झाला । पाणी आलें लोचनांला । म्हणे महाराज कां हो केला । अव्हेर माझा ये कालीं ? ॥ ९१ ॥ मी मुळींच हीन दीन । कोठून घडावें मला पुण्य ? । आम्हा कावळ्यांकारण । लाभ केवी मानसाचा ॥ ९२ ॥ अक्षम्य ऐसी कोणती । चुकी झाली माझ्या हातीं । म्हणून माझी गुरुमूर्ति । गाडी चुकली ये वेळां ? ॥ ९३ ॥ हाय हाय रे दुर्दैवा ! । त्वां माझा साधिला दावा । माझ्या करीं गुरुसेवा । घडूं न दिली आज तूं ॥ ९४ ॥ ही माझी शिदोरी । ऐशीच आज राहिली जरी । नाहीं करणार भोजन तरी । सत्य सत्य त्रिवाचा ॥ ९५ ॥ गुरुराया कृपाराशी । नका उपेक्षूं लेकरासी । ही शिदोरी सेवण्यासी । यावें धांवून सत्वर ॥ ९६ ॥ थोर आपुला अधिकार । क्षणांत पाहतां केदार । मग याया येथवर । कां हो अवमान करितसां ? ॥ ९७ ॥ मी न आज्ञा तुम्हां करितों । प्रेमानें हाका मारितों । म्हणूनिया हा न होतो । अपमान तुमचा यत्किंचित् ॥ ९८ ॥ तीन घंटे अजून । अवकाश गाडीकारण । तोंवरी आपुलें भोजन । होईल ऐसें वाटतें ॥९९॥ ऐसा विचार करीत । तेथेंच बैसला उपोषित । चतुर्थ प्रहरी शेगांवात । आला तिहीच्या गाडीनें ॥ १०० ॥ कवर गेला दर्शना । तई तो योगीराणा । न करितां भोजना । बसला होता आसनीं ॥ १ ॥

नैवेद्याचीं अतोनात । ताटें होतीं मठांत । पक्वान्नांनीं परिप्लुत । तीं वर्णावीं कोठवरी ? ॥ २ ॥ कोणाच्या जिलब्या घीवर । कोणाचा तो मोतिचूर । कोणाची ती नुसती खीर । श्रीखंड पुऱ्या कोणाच्या ॥ ३ ॥ परी त्या नैवद्याला । समर्थांनीं ना स्पर्श केला । वरच्यावरीं ताटाला । बाळा आणून ठेवी पुढें ॥ ४ ॥ आणि म्हणे हें करा ग्रहण । गेला एक वाजून । आपलें न झाल्या जेवण । प्रसाद भक्तां मिळतो कसा ? ॥ ५ ॥ त्याची ते वाट पाहती । करण्या आपणां विनंति । त्यांची नसे होत छाती । म्हणून मी बोललों ॥ ६ ॥ तैं महाराज म्हणती थांब जरा । आग्रह नको करूंस खरा । आज भोजन चौथे प्रहरा । माझें होणार आहे रे ॥ ७ ॥ मर्जी असल्या थांबावें । ना तरी खुशाल जेवावें । नैवेद्य घेऊनी घरा जावें । पर्वा नाहीं त्याची मला ॥ ८ ॥ ऐसा प्रकार तेथें झाला । तों इतक्यांत भाऊ आला । समर्थ पाहतां आनंदला । भाऊ आपल्या मानसीं ॥ ९ ॥ दुरावलेली माय जेवीं । बाळकें दृष्टि पहावी । झालें असे पहा तेवीं । भाऊ कवराकारणें ॥ ११० ॥ समर्थांसी नमस्कार । केला साष्टांग साचार । उभा राहिला जोडोनी कर । वाट पाहात आज्ञेची ॥ ११ ॥ त्या भाऊस पाहून । समर्थें केलें हास्यवदन । बरेंच दिलेंस आमंत्रण । ही कां वेळ जेवणाची ? ॥ १२ ॥ तुझ्या भाकेंत गुंतलों । मी उपोषित राहिलों । नाहीं अजून जेवलों । आण तुझी शिदोरी ॥ १३ ॥ ऐसें महाराज बोलतां । हर्षलासे कवर चित्ता । म्हणे काय करू गुरुनाथा । गाडी चुकली बाराची ॥ १४ ॥ कवरास म्हणे बाळाभाऊ । आता नको दुःखित होऊं । काय आणलें आहेस पाहूं ? । समर्थांसी जेवावया ॥ १५ ॥ ऐसें ऐकतां सत्वरीं । कांदे भाजी भाकरी ।



कवरानें ठेविल्या समोरी । स्वामी गजाननाच्या ॥ १६ ॥ त्यांतील भाकरी दोन । समर्थें केल्या भक्षण । एकीचा तो प्रसाद म्हणून । अवघ्या भक्तां वांटिली ॥ १७ ॥ तो प्रकार पाहतां । आश्चर्य झालें समस्तां । कळली स्वामींची योग्यता । खरेच भक्तवत्सल तें ॥ १८ ॥ जेवीं हस्तिनापुरांत । भगवंतानें ठेविला हेत । सोडून पक्वान्नाप्रत । विदुराच्या हुलग्यांवरी ॥ १९ ॥ तैसेंच येथे आज झालें । आमचें पक्वान्न नाहीं रुचलें । भाकरीवरी गुंतलें । चित्त कवराच्या स्वामींचे ॥ १२० ॥ भाऊनींही घेतला । समर्थप्रसाद शेगांवला । सद्भाव जेथें उदेला । तेथें ऐसेंच होणार ॥ २१ ॥ समर्थ बोलले कवरासी । जा आतां अकोल्यासी । पास होशील पुढचे वर्षीं । तूं डॉक्टरी परीक्षेंत ॥ २२ ॥ भाऊ म्हणे गुरुराया । आपली असूं द्यावी दया । यावीण दुसरें मागावया । मीं न आलों ये ठायीं ॥ २३ ॥ आपुले हे दिव्यचरण । हेच माझे धनमान । सर्वदा घडो चिंतन । आपल्या दिव्य मूर्तीचें ॥ २४ ॥ ऐसें बोलून अकोल्याला । भाऊ कवर निघून गेला । समर्थ आपल्या भक्ताला । नुपेक्षिती कधींहीं ॥ २५ ॥ शेगांवींचा राहणार । तुकाराम शेगोकार । एक होता भाविक नर । कृषिकर्म करीतसे ॥ २६ ॥ घरची गरीबी होती खरी । काम करोनी शेतांतरी । अस्तमानाचे अवसरी । दर्शना यावें मठांत ॥ २७ ॥ चिलीम द्यावी भरून । घ्यावें पदाचें दर्शन । कांहीं वेळ बसून । जावें पुन्हां शेतातें ॥ २८ ॥ ऐसा नित्यक्रम तयाचा । बहुत दिवस चाळला साचा । घाला विचित्र दैवाचा । तो न कोणा सोडितसे ॥ २९ ॥ जें जें असेल दैवांत । तें तें श्रोते घडून येत । एके दिनीं शेतांत । असतां तुकाराम आपुल्या ॥ १३० ॥ तों एक

आला शिकारी । बंदुक त्याच्या खांद्यावरी । नेम धरुन ससे मारी । छरे घालून बंदूकींत ॥ ३१ ॥ ती प्रभातींची होती वेळा । सूर्य नुकतां उदयाला । तुकाराम होता बसला । आपुल्या शेतीं शेकत ॥ ३२ ॥ तों त्याच्या मागें कुपाटिला । एक होता बसलेला । ससा शुभ्र तोचि पडला । शिकाऱ्याच्या दृष्टीसीं ॥ ३३ ॥ त्याची शिकार करण्या भली । शिकाऱ्यानें आपुली । नेम धरून झाडिली । खांद्यावरील बंदुक ॥ ३४ ॥ त्यायोगें ससा मेला । एक छरा लागला । त्या तुकाराम माळ्याला । कानामागें अवचित ॥ ३५ ॥ छरा मोठा जोरदार । मस्तकीं शिरला अखेर । थकले अवघे डॉक्टर । प्रयोग करुन त्याचेवरी ॥ ३६ ॥ कांहीं केल्या निघेना । छरा तो डॉक्टरांना । होऊं लागल्या यातना । तुकारामासी अतिशय ॥ ३७ ॥ मस्तक दुखे अहोरात्र । निद्रा न लागे किंचित् । नवस सायास केलें बहुत । परी गुण येईना ॥ ३८ ॥ ऐशाही अवस्थेंत । यावें त्यानें मठांत । तो समर्थांचा एक भक्त । ऐसें बोलला तयाला ॥ ३९ ॥ डॉक्टर वैद्य सोडा आतां । साधूंच्या सेवेपरता । नाही उपाय कोणता । उत्तम या जगामध्यें ॥ १४० ॥ कृपा त्यांची झाल्यास । चुकेल हा तुझा त्रास । झाडीत जा आसपास । या मठाच्या नित्य तूं ॥ ४१ ॥ तेव्हां सेवा ही घडेल । पुण्य तेंही लाधेल । कृपा झाल्या होशील । त्रासापासून मोकळा ॥ ४२ ॥ मात्र आपुल्या पित्यापरी । दांभिकतेनें हें ना करीं । शुद्ध भाव अंतरीं । सर्वकाळ धरावा ॥ ४३ ॥ तें तुकारामासी मानवलें । झाडणें त्याने सुरूं केलें । अवघ्या मठास ठेविलें । स्वच्छ त्यानें आरशापरी ॥ ४४ ॥ ऐसीं चौदा वर्षें झालीं । तुकारामाची सेवा भली । तई गोष्ट घडून आली । ऐशा रीती श्रोते हो ॥ ४५ ॥ झाडतां झाडतां कानांतून । छरा पडला गळून । जैसी का ती मोकरांतून । दाबितां सुटे आंठोळी ॥ ४६ ॥ तैसें साच येथें झालें । छरा पडतां थांबलें । दुखावयाचें मस्तक भले । ऐसा प्रभाव सेवेचा ॥ ४७ ॥ ही सेवा झाडण्याची । अखेरपर्यंत केली साची । प्रचीतिवीण कवणाची । परमार्थी न निष्ठा बसे ॥ ४८ ॥ ती एकदां बसल्यावर । मग मात्र होते स्थिर । संतसेवा महाथोर । हे भाविक जाणती ॥ ४९ ॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । तारक होवो भाविकांप्रत । भवसिंधुमाझारी ॥ १५० ॥ शुभं भवतु । श्रीहरिहरार्पणमस्तु ॥



॥ इति षोडशोध्यायः समाप्तः ॥

* * * *

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य षोडशोऽध्यायः समाप्तः ॥








श्रीगजानन महाराज बायकांच्या डब्यांतून खाली येऊन बसले स्टेशन मास्तर त्यांची विनवणी करीत आहेत

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी महामंगला । जयजयाजी भक्तपाला । जयजयाजी तमालनीला । पतितपावन नरहरे ॥ १ ॥ हिरण्यकश्यपु महाक्रूर । सज्जनांचा शत्रु थोर । तयाचें तूं फाडून उदर । मरण त्याचें साधिलें ॥ २ ॥ प्रल्हाद रक्षणासाठी । तूं जन्मलास स्तंभापोटी । रूप अनुपम जगजेठी । धारण तें करून ॥ ३ ॥ दांत दाढा भयंकर । आयाळ रुळे मानेवर । जेवीं खादिरांगार । ब्रह्मांड जाळू पाहाती ॥ ४ ॥ त्या भयंकर रूपाची । भीति नसे भक्ता साची । पिलें जेवीं वाघिणीचीं । अंगावर खेळती तिच्या ॥ ५ ॥ तुम्हां पाहून देवराया । लक्ष्मी न धजें पुढें यावया । ऐशा स्थितीत लागला पाया । भक्त तुझा नरहरे ॥ ६ ॥ तूं भक्तवत्सल लक्ष्मीकांत । ऐसे सांगत आले संत । पुरविशी भक्तमनोरथ । नाहीं न त्यासी म्हणसी कदा ॥ ७ ॥ त्या आपुल्या ब्रीदासी । जाग आतां हृषीकेशी । दासगणू लागला पायांसी । अभय अस्तुं दे पांडुरंगा ॥ ८ ॥ गजाननांचे परमभक्त । होते कांहीं अकोल्यात । तयांचीया सदनाप्रत । हमेशा यावें समर्थांनीं ॥ ९ ॥ चापडगांवचे बापू कृष्ण । खटाऊ शेटाचें कुटुंब जाण । गोंडुलालाचा नंदन । बच्चुलाल नाम ज्याचें ॥ १० ॥ जीजीबाई पंडित । आणीकही होते बहुत । त्यांचीं नांवें तुम्हांप्रत । किती सांगूं विबुध हो ॥ ११ ॥ एके वेळीं अकोल्यांत । आले गजाननस्वामी समर्थ । खटाऊच्या गिरणींत । मुक्काम त्यांनी ठेविला ॥ १२ ॥ एक भक्त मलकापुरीं । विष्णूसा नामें निर्धारी । त्याच्या वाटलें अंतरीं । समर्थ आणावें मलकापुरा ॥ १३ ॥ त्यानें आमंत्रणाचा वशिला । भास्कराच्या द्वारे लाविला । हाच भास्कर होता झाला । समाधिस्थ अडगांवीं ॥ १४ ॥

तो त्या वेळीं होता जवळ । करी कारमार अंगे सकळ । विष्णूसाला होतें वळ । याच भास्कर पाटलाचें ॥ १५ ॥ भास्कर म्हणे मलकापुरीं । चला समर्था लवकरी । भक्त विष्णूसाच्या घरीं । बोलावण्यास आला तो ॥ १६ ॥ मनोरथ येथील भक्तांचे । तुम्ही पुरविलें असती साचे । आतां मलकापुरींचे । लोक वाट पहाती ॥ १७ ॥ तई समर्थ म्हणाले भास्करा । सध्यांच मी मलकापुरा । येत नाहीं जाण खरा । तूं आग्रह करूं नको ॥ १८ ॥ फार आग्रह करशील । तरी फजीत पावशील । याचा विचार करी खोल । मी न बोललो कांहीं तरी ॥ १९ ॥ दोरीसी दिधल्या फार ताण । ती मध्येंच तुटतसे जाण । मी न हलणार येथून । तूं या फंदांत पडूं नको ॥ २० ॥ भास्कर बोले त्यावरी । कांहीं असो मलकापुरी । चला विष्णूसाचे घरीं । हीच विनंती गुरुराया ! ॥ २१ ॥ मी तुमचा लाडका । मसी धक्का देऊं नका । मी भरंवसा दिला देखा । तुम्हां घेऊनि येण्याचा ॥ २२ ॥ ती प्रतिज्ञा माझी पुरी । तुम्ही करावी आज खरी । चला आतां स्टेशना-वरी । गाडीत बसावयाकारणें ॥ २३ ॥ ऐसा आग्रह करुन । घेऊन आला गजानन । मलकापुरा-कारण । न्यावयासी श्रोते हो ! ॥ २४ ॥ भास्करानें विनवणी । स्टेशनमास्तरा करोनी । बारा जणांचा डबा त्यांनीं । खाली करविला संतास्तव ॥ २५ ॥ महाराज तैसेच बैसले । ते न कांहीं बोलले । जागेवरून नाही उठले । गाडी सुटेपर्यंत ॥ २६ ॥ तों गाडी सुटण्याचा । घंटा झाला अखेरीचा । डोळा चुकवून भास्कराचा । लीला केली ऐशा रीतिं ॥ २७ ॥ जो डबा मोकळा केला । तो त्यांनीं सोडून दिला । योगीराज जाऊन शिरला । बायकांच्या डब्यामध्यें ॥ २८ ॥ आधींच मूर्ति दिगंबर । स्त्रिया घाबरल्या असती फार । त्यांनीं वर्दी अखेर । दिली असे पोलिसाला ॥ २९ ॥ पोलिसाचा अधिकारी । तेथें आला सत्वरीं । महाराजाला धरून करीं । खाली ओढूं लागला ॥ ३० ॥ अरे वेड्या नंग्या पीरा । अक्कल कैसी तुज ना जरा । बायकांच्या डब्यांत खरा । येऊन कैसा बैसलास ? ॥ ३१ ॥ हिसडा देऊन त्याच्या हाता । तेथेंच बैसले तत्त्वतां । अधि-कार्‍याची भीति चिंता । मुळीं न त्यांच्या वाटली ॥ ३२ ॥ मग तो अधिकारी भला । स्टेशन-मास्तराकडे गेला । म्हणे डब्यापाशी आतां चला । बायकांच्या माझ्यासवें ॥ ३३ ॥ दोघे डब्या-जवळ आले । तों मास्तरानें पाहिलें । योगीराज बसलेले । बायकांच्या डब्यांत ॥ ३४ ॥ मास्तर पोलिसच्या अधिकार्‍याला । ऐशा रीति बोलला । तुम्ही जाऊं द्यावें याला । याच डब्यांत बसून ॥ ३५ ॥ हा आहे संत थोर । चालता बोलता ईश्वर । याच्या हातें न होणार । गुन्हा तो केव्हांही ॥ ३६ ॥ तें ऐकून अधिकारी । बोलता झाला ऐशापरी । मीं दिली आहे तार खरी । येविषयीं वरिष्ठाला ॥ ३७ ॥ आतां माझ्या हातांत । कांहीं न राहिलें यत्किंचित् । मीं वर्दी दिली तुम्हांप्रत । तुम्ही वाटेल तें करा ॥ ३८ ॥ स्टेशनमास्तरांनीं । आपली टोपी काढूनी । बहु आदर दाखवोनी । विनंति केली महाराजा ! ॥ ३९ ॥ तुम्हीं खालीं उतरावें । माझें एवढें ऐकावें । काय-द्याचें आणावें । प्रयोजन आपुल्या मानसीं ॥ ४० ॥ महाराज उतरले खालती । पुढें खटला भरला त्यांचेवरती । कायद्याप्रमाणें निश्चिती । जठारसाहेबासमोर ॥ ४१ ॥ त्यांनीं फिर्याद घेतली । त्याची तारीख नेमली । शेगांवावरती भली । चौकशीची श्रोते हो ! ॥ ४२ ॥ बापूसाहेब जठार ।

आले शेगांवाच्यावर । डाक बंगल्यात झाले स्थिर । करण्या चौकशी खटल्याची ॥ ४३ ॥ व्यंकटराव देसाई । अकोल्याचे होते पाही । तेही आले ते ठाई । कांहीं कामानिमित्त ॥ ४४ ॥ महाराजांच्या खटल्याची । गांवीं पुकार झाली साची । म्हणून मंडळी शेगांवाची । फार मिळाली बंगल्यावर ॥ ४५ ॥ तैं देसाई म्हणती जठारास । आज कोणता खटला विशेष । तुम्हांपुढे आहे खास । म्हणून मिळाले लोक हे ॥ ४६ ॥ जठार म्हणाले त्यातें । याचें कारण तुम्हांतें । कैसें न कळलें ? वाटतें । हेंच मला आश्चर्य ! ॥ ४७ ॥ तुमचे स्वामी गजानन । नंगे फिरती म्हणून । पोलिसांनी भरून । हा खटला पाठविला ॥ ४८ ॥ त्या खटल्याची चौकशी । होणार आहे आज दिवशीं । म्हणून वाटतें ऐसें मसी । लोक हे जमले असावेत ॥ ४९ ॥ हें ऐकतां भाषणे । व्यंकटराव झाले खिन्न । बोलते झाले कर जोडून । खटला हा न चालवावा ॥ ५० ॥ श्रीगजाननसाधूंची । योग्यता आहे थोर साची । ती मूर्ति भगवंताची । आहे पाहा प्रत्यक्ष ॥ ५१ ॥ तो विदेही पुरुष जाणा । बंधन त्याला कशाचें ना । तो योग्यांचा योगीराणा । वंदनीय अवघ्यांतें ॥ ५२ ॥ खटला भरला हीच केली । पोलिसांनीं चूक भली । ती पाहिजे दुरुस्त झाली । आज आपुल्या करानें ॥ ५३ ॥ जठार म्हणती वकिलाला । तुम्ही जाणतां कायद्याला । याचा पाहिजे होता केला । विचार तो पोलिसांनीं ॥ ५४ ॥ कारकुना म्हणती बोलावणें । धाडा गजाननाकारणें । तें ऐकूनी एक त्यानें । जवान पोलिस पाठविला ॥ ५५ ॥ तो येऊन समर्थांसी । म्हणे चला आतां कचेरीसी । अधिकाऱ्यानें तुम्हांसी । मज धाडिलें बोलावण्या ॥ ५६ ॥ बऱ्या बोलानें चलावें । फजितीस



ना करून घ्यावें । ना तरी मला लागेल न्यावें । तुमच्या हाता धरून ॥ ५७ ॥ तइं वदले गजानन । आम्हीं न उठू येथून । तुझें पहातों शिपाईपण । ये धरीं माझ्या करा ॥ ५८ ॥ शिपायाचा हात धरीला । तो ना सुटे किमपि त्याला । रक्त प्रवाह बंद झाला । त्या दाबाच्या योगानें ॥ ५९ ॥ हातासी लागली कळ । जीव झाला व्याकुळ । करूं लागला तळमळ । शिपाई तो त्याच ठाईं ॥ ६० ॥ शिपायासी वेळ झाला । म्हणून पाठविले वकिलाला । त्या व्यंकटराव देसायाला । समर्थांसी आणावया ॥ ६१ ॥ जठार म्हणती तुम्ही जावें । समर्थांसी घेऊन यावें । लोकांसी न जमूं द्यावें । बंगल्याभोंवती निरर्थक ॥ ६२ ॥ इतक्यांत आला समाचार । पोलिसाचा धरला कर । बसविला एक्या जागेवर । महाराजांनीं सहजलीलें ॥ ६३ ॥ मग देसाई तेथें आले । त्यांच्या भक्तांसी बोलले । या वेळीं नेसाविलें । पाहिजे समर्थां धोतर ॥ ६४ ॥ ऐसी सल्ला मिळतांक्षणी । धोतर नेसविले भक्तांनीं । तें टाकिले सोडोनी । समर्थांनीं रस्त्यांत ॥ ६५ ॥ गेले नागवे कचेरीस । सवें होता भास्करशिष्य । जठारांनीं पाहतां त्यास । दिली खुर्ची बसावया ॥ ६६ ॥ या महाराज बसा येथ । तुम्ही नागवे गांवात । कां फिरतां सदोदित । हें कांहीं बरें नव्हे ! ॥ ६७ ॥ नागवे फिरणें हा गुन्हा । कायद्यांनी ठरविला जाणा । म्हणून विनंति आपणा । द्या हें सोडून नंगेपण ॥ ६८ ॥ ऐसें जठाराचें भाषण । घेतलें स्वामींनीं ऐकून । आणि केलें हास्यवदन । उत्तर त्यासी द्यावया ॥ ६९ ॥ तुला काय करणें यासी । चिलीम भरावी वेगेंसी । उगीच नसत्या गोष्टीशीं । महत्त्व न यावें निरर्थक ॥ ७० ॥ तें ऐकतां भाषण । जठार गेलें विरघळोन । जनरीतीचें याला भान ।

मुळींच नाहीं राहिलें ॥ ७१ ॥ हा वृषभदेव भागवतीचा । किंवा शुकाचार्य साचा । किंवा नामदेवाचा । हा दुसरा अवतार ॥ ७२ ॥ हा निजानंदीं सदा रत । खाचित आहे जीवन्मुक्त । नये लावितां याप्रत । गुन्हा विचारें केव्हांही ॥ ७३ ॥ जेवीं अग्नीचा अग्नीपणा । अग्नि सोडीत नस जाणा । परी अग्निहोत्र्यांना । कुंडांत ठेवणें भाग त्यासी ॥ ७४ ॥ अग्निदेव म्हणोन । ठेविल्या कुंडावांचून । तो करील दग्ध सदन । हा दोष त्याचा नसे ॥ ७५ ॥ तैसें यांचे नागवेपण । आहे अग्नीचें समान । म्हणून यांचा शिष्यगण । आहे अपराधी येविषयीं ॥ ७६ ॥ वस्त्ररूपीं कुंडाठायीं । जरी हा ठेविला असतां पाही । तरी हरकत नव्हती कांहीं । सर्वांस सुखद होतें तें ॥ ७७ ॥ ऐसा विचार पूर्ण केला । जठारांनीं चित्तीं भला । आणि हुकूम फर्माविला । त्यांनीं पुढीलप्रमाणें ॥ ७८ ॥ महाराज मूळचे जीवन्मुक्त । त्या ठेवणें व्यवस्थित । भास्कराचे काम सत्य । होतें न तें केलें त्यांनीं ॥ ७९ ॥ म्हणून मी भास्कराला । पांच रुपये दंड केला । ऐसा खटल्याचा निकाल झाला । जठारांपुढें शेगांवीं ॥ ८० ॥ समर्थ म्हणाले भास्करासी । पुन्हां ऐशा आग्रहासी । करशील कां सांग मशीं । निज फजिती करून घ्याया ? ॥ ८१ ॥ भास्कर कांहीं न बोलला । मौन धरून राहिला । तेथोन मंडळींनीं केला । ऐशा प्रकारें विचार ॥ ८२ ॥ समर्थांसी अग्निरथीं । न बसवा येथून कल्पांतीं । विनाकारण कटकटी होती । तें कांहीं बरें नव्हे ॥ ८३ ॥ हा क्रम कित्येक दिवस । चालला असे शेगांवास । भक्त बैलांच्या गाडीस । बसवूं लागले महाराजा ॥ ८४ ॥ या रीतीं अकोल्यासी । आले एकदां पुण्यराशी । बापुरावाच्या सदनासीं ।



जाऊनिया उतरले ॥ ८५ ॥ याच वेळीं यवन जातीचा । साधु महेताबशा नांवाचा । होता कुरुम गांवीं साचा । मूर्तिजापुरासन्निध ॥ ८६ ॥ त्यानें बापुरावाप्रती । सांगितलें होतें ऐशा रीति । जेव्हां समर्थ अकोल्यास येती । तेव्हां आम्हां कळवावें ॥ ८७ ॥ अकोल्यांत आल्यावर । श्रीगजानन साधुवर । बापुरावानें सत्वर । मनुष्य धाडिला कुरुमासी ॥ ८८ ॥ तो ऐशा रीतिं घडून आलें । महेताबशा येण्या निघाले । अकोल्यास याया भले । समर्थांसीं भेटावया ॥ ८९ ॥ अकोल्याचा मनुष्य । मध्यें भेटला रस्त्यास । जो आला होता न्यावयास । महेताबशा कारणें ॥ ९० ॥ तो मनुष्य भेटतांक्षणीं । कीं पुसूं लागले मधुरवचनीं । त्या मनुष्यालागुनीं । महेताबशा श्रोते हो ! ॥ ९१ ॥ तूं न जावें कुरुमाला । बैस आमच्या गाडीला । आपण जाऊं स्टेश-नाला । मीच आहे महेताबशा ॥ ९२ ॥ पाहा संत आल्याचें वर्तमान । कळलें संतालागून । कोणी न सांगतां जाण । त्रिकालज्ञ ते खरोखरी ॥ ९३ ॥ महेताबशाच्या संगातें । दोन चार यवन होते । अवघे येऊन सदनातें । उतरले बापुरावाच्या ॥ ९४ ॥ दुसरें दिवशीं प्रातःकाळा । महेताबशा होता जेथें बसला । महाराज आले तया स्थळा । निजलीलें करून ॥ ९५ ॥ महेताबशाचे धरून केंस । समर्थांनी ताडिलें त्यास । त्या ताडण्याचा उद्देश । हाच होता विबुध हो ॥ ९६ ॥ यवनजातींत जन्मून । कांहीं न केला उपयोग जाण । यवनाचे आडदांडपण । नाहीं अजून गेलें रे ॥ ९७ ॥ या आडदांडपणानीं । तत्त्वघात होईल जाणी । मृत्युलोकींचे अवघे प्राणी । चिंताग्रस्त होतील ॥ ९८ ॥ तुझें महेताब आहे नांव । त्याची काय आठवण ठेव । दोषरूपी तमा वाव । तुझ्यापुढें मिळं

नये ॥ ९९ ॥ हा द्वेषरूपी अंधार । वाढत चालला वरचेवर । याची नाहीं तुला खबर । म्हणून तुजला ताडिलें ॥ १०० ॥ ऐसा मिळतां इशारा । महताबशा तोषला खरा । साधुच साधूच्या अंतरा । जाणताती निःसंशय ॥ १ ॥ जेव्हां महेताबशातें ताडिलें । तईं संगतीचे यवन भले । कावरेबावरे होते झाले । तो प्रकार पाहून ॥ २ ॥ महेताबशा बोलला त्यासी । तुम्ही न राहावें आम्हांपासी । जावें निघून कुरुमासी । हेंच आहे उत्तम ॥ ३ ॥ शेख कडू शिवाय जाण । गेले चौघे निघून । तों द्यावयासी आमंत्रण । बच्चुलाल पातला ॥ ४ ॥ म्हणें उद्यां दयाघना ! । यावें तुम्ही भोजना । या दासाचिया सदना । हीच आहे विनंति ॥ ५ ॥ दुसरे दिवशीं टांग्यांत । बसवूनीं समर्थांप्रत । मोठ्या थाटानीं मिरवित । निज सदना आणिलें ॥ ६ ॥ परीं समर्थ टांग्याखालीं । उतरलें नाहीत मुळीं । तेणें मंडळी चिंतावली । म्हणें कां न उतरती हे ॥ ७ ॥ तसाच टांगा नेला परत । बापुरावाच्या सदनाप्रत । मंडळी पडली घोटाळ्यांत । समर्थें ऐसें कां केलें ? ॥ ८ ॥ काल आमंत्रण घेतलें । आज टांग्याखालीं न उतरले । याचें कारण शोधिते झाले । आपापल्या बुद्धीने ॥ ९ ॥ त्यांत एक होता धूर्त । तो बोलला अवघ्यांप्रत । मला समजलें इंगित । या गोष्टीचे ये वेळां ॥ ११० ॥ महेताबशाला वगळीलें । म्हणून महाराज नाहीं उतरलें । भोजनाचें कां न केलें । महताबशाला आमंत्रण ॥ ११ ॥ आतां घेऊन दोघांसी । बसवून एका टांग्यासी । म्हणजे ते निश्चयेसीं । उभयताही येतील ॥ १२ ॥ तेंच वाक्य खरें झालें । दोघांलाही मिरवित नेलें । महताबशाला उतरविले । मंदिराजवळील थेटरांत ॥ १३ ॥ श्रीरामाच्या मंदिरीं ।



गजाननाची उतरली स्वारी । परी तेही गेले अखेरी । उठोनिया थेटरांत ॥ १४ ॥ अवघ्यांची झालीं भोजनें । मग महेताबशा लोकांस म्हणे । मला तुम्ही तिकिट देणें । पंजाबचें काढून ॥ १५ ॥ तैं शेख कडू बोलला । त्या महेताबशा फकीराला । तुम्ही कुरुमच्या मशीदीला । टाकून कैसें जातां हो ? ॥ १६ ॥ ती मशीद बांधून । पंजाबाशीं जावें आपण । काम अर्धें टाकून । जाणें उचित नसे तुम्हां ॥ १७ ॥ महेताब शेख कडूशीं । बोलता झाला प्रेमेशीं । आग्रह करूं नका मशी । ये वेळीं निरर्थक ॥ १८ ॥ गजाननाचा हुकूम झाला । मजसी पंजाबांत जाण्याला । आतां एक क्षणही या स्थळा । मी न राहूं शके हो ॥ १९ ॥ समर्थांच्या कृपेंकरून । मशिदीचें काम पूर्ण । होईल हें माझें वचन । सत्य तुम्हीं मानावें ॥ १२० ॥ धर्माविषयीं द्वैत । संताठाईं नसतें सत्य । तें अवघ्या धर्मांप्रत । समसमान मानिती ॥ २१ ॥ खुळें देऊळ मशिदीची । तुम्ही नका वाढवूं साची । ती वाढतां दोघांची । आहे हानि होणार ॥ २२ ॥ सामान देऊळ मशिदीचें । एकची आहे साचें । आकारानें भिन्नत्व त्याचें । मानून भांडू नये हो ॥ २३ ॥ यवन तेवढा खुदाचा । आणि हिंदु काय भूताचा ? । पोक्त विचार करा याचा । मनुष्यपण टिकवावया ॥ २४ ॥ तरीच होईल कल्याण । हिंदु आणि मुसलमान । हे एकाच देवापासून । निर्माण असती जाहले ॥ २५ ॥ धर्म बापा ज्याचा त्यांनीं । प्रिय मानावा प्राणाहूनी । परी विधर्म्यांच्या ठिकाणीं । अलोट प्रेम धरावें ॥ २६ ॥ हें न झालें जोंवरी । सौख्य लांब तोंवरी । जा मशीद होईल पुरी । गजाननाच्या कृपेनें ॥ २७ ॥ महेताबशा निघून गेले । पुन्हां न इकडे परत

आले । या गोष्टीचें पाहिजे केलें । मनन हिंदुयवनांनीं ॥ २८ ॥ पाहा महेताबशाला जरी । ताडिते झाले साक्षात्कारी । परी द्वेष नव्हता अंतरीं । प्रेम अलोट होतें हो ॥ २९ ॥ श्रहालागीं घेतल्या-विना । मोजना न गेला योगीराणा । हे मुद्दे मनीं आणा । या गोष्टींचे श्रोते हो ! ॥ १३० ॥ असो या बापुरावाची । कांता एक होती साची । तिला भानामतीची । बाधा होती विबुध हो ! ॥ ३१ ॥ मळवट यावा घटकेंत । घटकेमाजी कंठी तात । घटकेमाजी वस्त्राप्रत । अग्नी तो लागावा ॥ ३२ ॥ बिब्याच्या पाठीवर । फुल्या याव्या अपरंपार । कधीं दांडीवरील चीर । जळून जावे अकस्मात ॥ ३३ ॥ या भानामतीच्या त्रासांनीं । ती बापुरावाची कामिनी । क्षीण गेली होवोनी । अन्नपाणी न रुचे तिला ॥ ३४ ॥ भानामती काढण्याला । बापुरावें जाणत्याला । आणलें बाहून अकोल्याला । परी न झाला उपयोग ॥ ३५ ॥ खर्चही झाला अतोनात । गुण न आला किंचित् । अखेर त्यानें जोडिले हात । श्रीगजाननस्वामीला ॥ ३६ ॥ महाराज माझ्या कुटुंबाला । भानामतीचा त्रास झाला । केले नाना उपायाला । आतां मात्र कंटाळलों ॥ ३७ ॥ तुझीं पाउलें माझ्या घरा । आज लागलीं गुरुवरा ! । तेथेंच का आसरा । भानामतीस मिळावा ? ॥ ३८ ॥ ज्या दरींत पंचानन । बसला आहे येऊन । तेथेंच कां ओरडून । दिमाख दाखवावा कोल्ह्यांनीं ॥ ३९ ॥ जेथें कस्तुरी दरवळली । तेथेंच कां हो राहावी मळी । गुरुराया ही ओंगळी । घाण भानामतीची ॥ १४० ॥ ऐसी विनंति ऐकून । गजाननांनीं अवलोकन । केलें निजकृपें करून । बापुराव कांतेला ॥ ४१ ॥ त्यायोगें श्रोते तिची । भानामती निमाली साची । नाही किंमत माकडाची । सिंहाचिया पुढें हो ॥ ४२ ॥ असो एकदां



फिरत फिरत । महाराज आले आकोटांत । नरसिंगजीला भेटण्याप्रत । बंधु आपला म्हणोनि ॥ ४३ ॥ त्याच्या मठाशेजारीं । एक विहीर होती खरी । जाऊन त्या विहिरीवरी । बसले गजानन महाराज ॥ ४४ ॥ पाय आंत सोडिले । डोकावून पाहूं लागले । आंतील जलालागीं भले । वरच्यावरी श्रोते हो ॥ ४५ ॥ पाहून त्यांची ऐशी कृति । लोक साशंक झाले चित्तीं । नरसिंग महाराज विचारती । अरे हे काय करतोस ? ॥ ४६ ॥ गोदा यमुना भागीरथी । तुम्हांसाठीं येथें असती । आणखी तीर्थें आहेत किती ? । हें पाहातों डोकावून ॥ ४७ ॥ तुला त्यांचें घडतें स्नान । मी कां राहूं तसाच जाण ? । या तीर्थांनीं मला स्नान । आज येऊन घालावें ॥ ४८ ॥ त्यांनीं स्नान घातल्याविना । मी न येथून हले जाणा । ऐशा ऐकून भाषणा । कैक म्हणाले या रीतिं ॥ ४९ ॥ खरोखरी हा आहे पिसा । शेगांव नादीं लागला कैसा । जरा थांबा येथेंच बसा । काय करी हा पाहूं पुढें ॥ १५० ॥ तों विहिरींतील जलाप्रत । उकळ्या उठल्या अगणित । श्रोते एका निमिषांत । विहीर भरली पाण्यानें ॥ ५१ ॥ हजारी कारंजाच्या परी । गजाननाच्या अंगावरीं । वर्षूं लागलें पहा वारी । त्या विहिरीचें तेधवां ॥ ५२ ॥ लोकां म्हणती गजानन । यारे स्नानालागून । नाहीं उरलें प्रयोजन । त्या विहिरीमाजी उतरण्याचें ॥ ५३ ॥ गंगा यमुना गोदावरी । वरती आली आहे खरी । स्नान साधा ये अवसरीं । या पुण्य सरितेचें ॥ ५४ ॥ भाविकांनीं केलें स्नान । निंदकांनीं खालीं मान । घातली तो पाहून । प्रकार त्या पाण्याचा ॥ ५५ ॥ संत जें जें आणती मनीं । तें तें पुरवी चक्रपाणी । त्यांच्या वाणीलागुनीं । असत्यता न दे परमात्मा ॥ ५६ ॥ स्नान होतां समर्थ

उठले । पाणी पहिल्यापरी झालें । विहिरीच्या त्या तळास गेलें । उकळ्या बंद जाहल्या ॥ ५७ ॥
नरसिंगजीसी भेटून । निघून गेले दयाघन । शेगांवासीं बैसून । मनोवेगाच्या वारूवरी ॥ ५८ ॥
स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । तारक होवो भवाब्धींत । भाविक भक्तांकारणें ॥ १५९ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥



॥ इति सप्तदशोऽध्यायः समाप्तः ॥

* * * *



श्रीगजानन विजय ग्रंथ–अध्याय १८.



श्रीगजानन महाराजांनी पंढरीस बापू काळचाला श्रीविठ्ठल स्वरूपांत दर्शन दिले.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी चिद्विलासा । हे गोविंदा श्रीनिवासा । हे आनंदकंदा परेशा । पाहि माम् दीनबंधो ॥ १ ॥ केशवा केशीमर्दना । हे माधवा मधुसूदना । हे पूतनाप्राण-शोषणा । पांडुरंगा रुक्मिणीपते ॥ २ ॥ काय माझ्या आहे मनीं । तें तूं जाणसी चक्रपाणी । तेंच कां रे तुजलागुनी । बोलून दावूं पद्मनाभा ॥ ३ ॥ भक्त जी जी इच्छा करी । ती तूं पुरविसी श्रीहरी । ऐसें पुराणाभीतरीं । आहे वर्णन बहुसाळ ॥ ४ ॥ म्हणून माझ्या मनोरथा । पूर्ण करा पंढरीनाथा । सोडा मनीची कठोरता । दासगणू हा तुझा असे ॥ ५ ॥ अकोटाचे शेजारी । मुंडगांव नामें एक नगरी । तेथें बायजा नामें खरीं । समर्थांची भक्तीण असे ॥ ६ ॥ हळदी माळ्याच्या वंशांत । इचा जन्म झाला सत्य । शिवराम नामें इचा तात । भुलाबाई जननी असे ॥ ७ ॥ बायजाचे बाळपणीं । लग्न झालें होतें जाणी । ललाटी जें विधात्यानीं । लिहिलें असेल तेंच घडे ॥ ८ ॥ बायजा आली तारुण्यांत । गर्भाधान करण्याप्रत । घेऊन गेला तिचा तात । जामाताच्या गृहासी ॥ ९ ॥ परी उपयोग नाहीं झाला । जामात षंढ होता भला । तेणें जनक-जननीला । शोक झाला अनावर ॥ १० ॥ बायजेकडे पाहून । जननी करी रोदन । माझ्या बाईचें तारुण्य । वांझ पाहूं राहातें ॥ ११ ॥ भुली म्हणे शिवरामासीं । बायजा न ठेवा ऐशी । दुसरा नवरा करून इसी । देणें आहे भाग पहा ॥ १२ ॥ शिवराम म्हणे त्यावर । ऐसा नको सोडूं धीर । हा पुरुषत्वाचा प्रकार । खरा एकदम कळेना ॥ १३ ॥ कांहीं दिवस वाट पाहूं । नको ऐसी अधीर होऊं । बायजासी येथेंच ठेवूं । तिच्या सासरवाडीला ॥ १४ ॥ नपुंसकत्व अधोपरी । आले

असेल त्याला जरी । तें औषधानें होईल दुरी । वाट पाही यास्तव ॥ १५ ॥ ऐसें उभयतां बोलून । बायजासी तेथें ठेवून । आले मुंडगांवाकारण । आपुल्या घरातें ॥ १६ ॥ बायजाचें वय पंधरासोळा । वर्ण काळासावळा । तारुण्यानें मुसमुसलेला । होता जिचा शरीरभाग ॥ १७ ॥ डोळे नाक पाणीदार । बांधा उंच मनोहर । जिला पाहतां अंदर । कामुकाचें मोहित होई ॥ १८ ॥ तिच्या थोरल्या दिरासी । पाहुनिया बायजासी । इच्छा झाली मानसीं । संभोग तिचा करावया ॥ १९ ॥ त्यानें प्रयत्न केले नाना । वळवावया तिच्या मना । म्हणूं लागला क्षणाक्षणा । ऐसें बायजाकारणें ॥ २० ॥ हताश ऐसी मुळीं न होई । मीच तुला पतीचें ठायीं । आमरण करीन पाही । तुझें वेडे संगोपन ॥ २१ ॥ झुरणें दे हें सोडून । आनंदित ठेवी मन । वेडे आजपासून । मीच नवरा समज तुला ॥ २२ ॥ ऐसें त्यानें सांगावें । चाळे नाना करावे । कांहीं आमिष दावावें । चित्त तिचें भुलवावया ॥ २३ ॥ परी उपयोग होईना । बायजीच्या न हें येई मना । ती म्हणे हे नारायणा ! । कां रे दैन्य मांडलेस ? ॥ २४ ॥ बालपणापासून । ध्याइले मीं तुझें चरण । त्याचेंच कां हे मजलागून । फळ दृष्टीं पडावें ? ॥ २५ ॥ जयाचा मी हात धराला । तो ना पुरुष कळून आला । दैवयोग समजून चुकला । संसार नशिबी नाहीं मम ॥ २६ ॥ बरें झालें तुझ्या ठायीं । चित्त आतां रमेल पाही । कृपा करी रे शेषशायी । स्पर्श पुरुषाचा न होवो मला ॥ २७ ॥ ज्येष्ठ दीर एके दिवशीं । येतां झाला बायजापासी । आपला हेतु कळविण्यासी । रात्रींचिया समयाला ॥ २८ ॥ तो बायजानें इन्कार



करुन केलें उत्तर । कैसी लाज तिळभर । नाहीं उरलीं चित्तीं तुझ्या ॥ २९ ॥ तूं माझा ज्येष्ठ दीर । पित्यापरीस साचार । सोड हा अविचार । स्वैर ऐसा होऊं नको ॥ ३० ॥ ह्या तियेच्या भाषणा । तो ना आणी मुळीं मना । होतां कामाची वासना । नीति विलया जातसे ॥ ३१ ॥ अंगावरी टाकण्या हात । जों तो पाही इतक्यांत । तयाचा तो थोरला सुत । माडीवरून पडला हो ॥ ३२ ॥ खोक पडली डोक्यासी । बायजेने धरिलें त्यासी । बसवून आपुल्या मांडीसी । औषध लावूं लागली हो ॥ ३३ ॥ बायजा म्हणे ज्येष्ठ दिरा । या गोष्टीचा विचार करा । अभिलाष तो नाहीं बरा । परस्त्रियेचा केव्हाही ॥ ३४ ॥ मुलगा पडलेला पाहून । भय पावलें त्याचें मन । अनुताप त्यासी झाला पूर्ण । केलिया कर्माचा ॥ ३५ ॥ त्यानें नाद सोडिला । सदनीं निवांत राहिला । पुढें शिवराम घेऊनि गेला । कन्येस आपुल्या मुंडगांवीं ॥ ३६ ॥ भुलाई म्हणे पतीसी । चला जाऊं शेगांवासी । महाराजांतें पुसायासी । पुढील भाकीत बायजेचें ॥ ३७ ॥ तें मानलें शिवरामासी । आला घेऊन कन्येसी । महाराजांतें पुसायासी । आपल्या त्या कांतेसह ॥ ३८ ॥ बायजा घातली पायांवर । केली विनंति जोडून कर । कृपा करा या मुलीवर । पुत्रपौत्र द्यावे हिला ॥ ३९ ॥ तें समर्थांनी ऐकिलें । शिवरामासी हांसत वदले । अरे नशिबीं नाहीं लिहिलें । विधात्यानें पुत्र हिच्या ॥ ४० ॥ जेवढे पुरुष जगतांत । तेवढे असती हिचे तात । उगे न पडा फंदांत । लग्न हिचें करण्याच्या ॥ ४१ ॥ तें ऐकतां शिवरामाला । अनावर शोक झाला । घेऊन त्या बायजाला । परत आला मुंडगांवीं ॥ ४२ ॥ परी त्या समर्थवचनांनीं । बायजा आनंदली मनी । निष्ठा गजाननाच्या चरणीं । जडली तेव्हांपासून ॥४३॥

समर्थांचा एक भक्त । पुंडलिक नामें मुंडगांवांत । त्याच्या संगें शेगांवांत । बायजा येऊं लागली ॥ ४४ ॥ पहिल्या प्रथम अडथळा । जनर्नाजनकें नाहीं केला । शेगांवास जाण्याला । पुंडलिकाचे बरोबर ॥ ४५ ॥* त्यांना ऐसें वाटलें । साधुचरण इने धरिलें । तेच तिच्या करतील भले । निज कृपेनें कल्याणा ॥ ४६ ॥ पुरुषत्व देतील जामातासी । अशक्य ना कांहीं संतांसी । ऐसा विचार मानसीं करून राहिले स्वस्थ ते ॥ ४७ ॥ पुंडलिकाचे बरोबरी । बायजा जाऊं लागली खरी । तेणें पुकार जगभरी । ऐशा रीति जाहला ॥ ४८ ॥ हें शेगांवच्या वारीचें । ढोंग आहे दोघांचें । तरुणपणीं मानवाचें । मन परमार्थीं लागेना ॥ ४९ ॥ बायजा आहे तरणीज्वान । पुंडलिकासीही तारुण्य । यांची वारी विषयभान । हीच आहे निःसंशय ॥ ५० ॥ परस्परें प्रीति जडली । विषय-सुखाची नवाळी । भोगाया ही युक्ति केली । वाटते या उभयतांनीं ॥ ५१ ॥ पुंडलिक जरी माळी असतां । तरी हा संबंध योग्य होता । बायजाच्या धरण्या हाता । कां की तरुण दोघेही ॥ ५२ ॥ पुंडलिक आहे मराठी । ही माळ्याच्या आली पोटीं । म्हणून यांची ताटातुटी । केलीच पाहिजे जातीस्तव ॥ ५३ ॥ या दोघांचें अंतर । शुद्ध होते साचार । नव्हता कामाचा विकार । मनीं उत्पन्न जाहला ॥ ५४ ॥ भुलाई म्हणे बायजासी । तूं कां कारटे अहर्निशीं । पुंडलिकाच्या घरा जासी । हें कांहीं कळेना ? ॥ ५५ ॥ ऐशा तरुण वयांत । तुम्हां कशाचा परमार्थ ? । कोल्हा न उपोशित । उंसाचिया फडामधीं ॥ ५६ ॥ वा पाहून बाटुकाला । बैल नाहीं पुढें गेला । कारटे आमुच्या नांवाला । काळें उगे लावूं नको ॥ ५७ ॥ भुलाई म्हणे नवऱ्यासी । हिला नका ठेवूं ऐसी ।



लावून द्यावे मोहतरासी । पाहा पोरगा माळ्याचा ॥ ५८ ॥ ही पुंडलिकाच्या घरी जातें । सदा त्यासी हितगुज करिते । एकमेका पाहून भरतें । येत दोघां प्रेमाचें ॥ ५९ ॥ जाऊं चला शेगांवास । घेऊन या कारटीस । सांगू अवघे महाराजांस । चाळे या बायजीचे ॥ ६० ॥ संतांसी अवघें कळतें । ते सन्नीतीचे चाहाते । पोटामाजीं कधीं न निघते । चंदनाच्या दुर्गंधी ॥ ६१ ॥ भुला शिवराम बायजाबाई । पुंडलिक भोकऱ्या आला तोही । चौघे येऊन लागले पायीं । शेगावीं श्रीसमर्थांच्या ॥ ६२ ॥ पुंडलिकासी पाहून । बोलूं लागले दयाघन । कीं बायजा तुझी बहीण । पूर्व-जन्मी पुंडलिका ॥ ६३ ॥ लोक निंदा जरी करिती । तरी अंतर न द्यावें इजप्रती । दोघे मिळून हीं करा भक्ति । सच्चिदानंद हरीची ॥ ६४ ॥ भुले आपुल्या पोरीस । लावूं नको भलता दोष । हीं बहीण–भाऊ आहेत । मुळींच पूर्वजन्मींचे ॥ ६५ ॥ शिवाय या बायजाला । कोठेंही न नवरा भला । ही राहील ब्रह्मचारी । अशीच गे जन्म-ही न आली करायला । संसार मुळीं जगामध्यें ॥ ६६ ॥ ही शरण वरी । जनाबाई पंढरपुरीं । अशाच रीतिं राहिली गे ॥ ६७ ॥ तिनें नामदेव गुरू केला । ही शरण आली आम्हांला । माझ्या जनाबाईला । कोणी ना आतां छळावें ॥ ६८ ॥ ऐसें समर्थांचें भाषण । शिवरामानें ऐकून । गेला असे गहिंवरून । शब्द न कांहीं बोलवे ॥ ६९ ॥ घेऊन आपुल्या मुलीला । शिवराम मुंडगांवासी आला । पुढें बायजाच्या वारीला । अडथळा कोणी केला नसे ॥७०॥ महाराज आपुल्या भक्ताप्रत । सदैव रक्षण करितात । तें कसें, ही थोडक्यांत । गोष्ट सांगतो ये ठाईं ॥ ७१ ॥ भाऊ राजाराम कवर । एक होता डॉक्टर । पहा खामगांवावर । दवाखान्याचा अधिकारी ॥ ७२ ॥

त्यास दुर्धर फोड झाला । आणविले मोठ्या डॉक्टराला । औषधपाणी करायला । खामगांवा-
माझारीं ॥ ७३ ॥ बुलढाणा अकोला अमरावती । येथून डॉक्टर आणिले असती । शस्त्रक्रिया
करण्याप्रती । त्या भाऊच्या फोडाला ॥ ७४ ॥ नाना औषधें पोटांत दिलीं । विविध पोटीसे
बांधिलीं । शस्त्रक्रियाही असे केली । त्या झालेल्या फोडाला ॥ ७५ ॥ कशाचा ना उपयोग
झाला । फोड वाढूं लागला । वडील बंधूस धाक पडला । त्या भाऊच्या दुखण्याचा ॥ ७६ ॥ भाऊ
तळमळे शय्येवरी । व्याधि असह्य झाली खरी । शेवटी त्यानें अंतरीं । विचार ऐसा केला हो ॥ ७७ ॥
आतां हाच उपाय । आठवावे सद्गुरुपाय । याविणे दुसरी सोय । कांहीं नसे राहिली ॥ ७८ ॥
पडल्या पडल्या जोडी हात । म्हणे धांव धांव हे सद्गुरुनाथ । या लेंकराचा वृथा अंत । किमपि
आतां पाहूं नको ॥ ७९ ॥ ऐसी श्रोते विनवणी । करूं लागला क्षणोक्षणीं । रात्र गेली उलटोनी ।
सुमारें समय एकाचा ॥ ८० ॥ तमानें भरलें अंबर । रात्रीचा तो शब्द किर्र । कोल्हे-हुकेनें
कांतार । दणाणून गेलें हो ॥ ८१ ॥ तों एक दमणी आली । तट्टयावरी लागलेली । गाडीस होती
जुंपली । जोडी खिलाऱ्या बैलांची ॥ ८२ ॥ कंठामाजी घांगरमाळा । वाजूं लागल्या खळखळा ।
मागें पुढें सोडिला । होता पडदा दमणीस ॥ ८३ ॥ दवाखान्याच्या दारापाशीं । दमणी आली
निश्चयेंसी । डॉक्टर पहात होता तिसी । पडून आपल्या शय्येवर ॥ ८४ ॥ तों एक उतरला ।
ब्राह्मण दमणीच्या खालीं भला । दार ठोठावूं लागला । डॉक्टराच्या बंगल्याचें ॥ ८५ ॥ डॉक्ट-
राच्या बंधूंनी । दार उघडलें ते क्षणीं । प्रश्न केला कोठूनी । आपण आलात ये ठायां ? ॥ ८६ ॥



ब्राह्मण बोले त्याकारण । माझें गजा नामाभिधान । तीर्थ अंगारा घेऊन । शेगांवाहून आलो
मी ॥ ८७ ॥ डॉक्टर भाऊ कवराला । जो आहे फोड झाला । हा अंगारा पाठविला ।
लावण्या त्या फोडासी ॥ ८८ ॥ प्यावयासी दिलें तीर्थ । हें घ्या आपुल्यां हातांत ।
मी जातो आतां परत । वेळ न मशी राहावया ॥ ८९ ॥ तीर्थ अंगारा देऊन । निघून
गेला ब्राह्मण । त्या शोधायाकारण । भाऊनें शिपाई पाठविला ॥ ९० ॥ परी न पत्ता लागला ।
गाडी न दिसली कवणाला । भाऊ मनीं घोटाळला । कशाचा ना तर्क चाले ॥ ९१ ॥
फोडास लाविता अंगारा । तो तात्काळ फुटला खरा । येऊं लागला भरभरा । पूं त्या श्रोते
फोडातुन ॥ ९२ ॥ एक घटका गेल्यावर । पूं गेला निघून पार । पहा किती आहे जोर । सम-
र्थांच्या अंगाऱ्याचा ! ॥ ९३ ॥ भाऊस निद्रा लागली । व्याधी पुढें बरी झाली । हळूं हळूं शक्ति
आली । भाऊ झाला पूर्ववत् ॥ ९४ ॥ दर्शना गेला शेगांवास । तों समर्थ वदले ऐसें त्यास । माझ्या
गाडी बैलास । तुसता न चारा दिलास तूं ॥ ९५ ॥ हें सांकेतिक भाषण । कळलें भाऊलागून ।
हृदय आलें उचंबळून । त्या भाऊ कवराचें ॥ ९६ ॥ त्या रात्रीचा ब्राह्मण । खचित माझा गजानन ।
लेंकरासाठीं धांवून । खामगांवास आला ही ॥ ९७ ॥ कवरें केलें अन्नदान । त्या व्याधीच्या
निमित्त जाण । अंतर्ज्ञानी असती पूर्ण । श्रीगजानन अवलिया ॥ ९८ ॥ असो एकदां समर्थ-
स्वारी । निघती झाली पंढरपुरीं । त्या श्रीचंद्रभागेतीरीं । विठ्ठलासी भेटावया ॥ ९९ ॥
मंडळी बरोबर । दिवस वारीचा साचार । स्पेशल गाड्या वरचेवर । जाऊं लागल्या

केला । दानधर्म जोशांनीं ॥ ७२ ॥ बाळाभाऊचियापासीं । ब्राह्मणभोजन घालण्यासी । कांहीं
रुपये अतिहर्षी । जोशी देते जाहले ॥ ७३ ॥ साकल्ये कथिलें वर्तमान । बाळाभाऊलागून । हे
नवसाचे ब्राह्मण । तुम्ही घाला माझ्यास्तव ॥ ७४ ॥ कां कीं मला रजा नाहीं । काम जरुरीचें पाही ।
ऐसें सांगून लवलाही । जोशी गेले निघून ॥ ७५ ॥ एक यादव गणेश सुभेदार । होता हिंगणीचा
राहणार । हा करितसे व्यापार । वऱ्हाडांत कापसाचा ॥ ७६ ॥ यास एके सालीं भला । दहा
हजार तोटा आला । त्या चिंतेनें क्षीण झाला । कांहीं न सुचे मानसी ॥ ७७ ॥ परी व्यापार
सोडवेना । चिंता मनींचीं जाईना । फायदा कांहीं होईना । त्याच्या मताप्रमाणें ॥ ७८ ॥ फायद्या-
साठीं खटपट करी । नाना प्रकारें साजिरी । स्वस्थ ना बसती व्यापारी । राहाती सदा प्रयत्नांत ।
॥ ७९ ॥ हा एकदां वर्ध्यांत । आला कांहीं कामानिमित्त । उतरण्या गेला घरांत । विनायक असिर-
कराच्या ॥ ८० ॥ तों इतक्यांत तेथें आला । एक भिकारी बुध हो भला । भिक्षा कांहीं मागण्याला ।
असिरकराच्या घरांत ॥ ८१ ॥ पोषाख अवघा मराठी । करामाजीं भव्य काठी । डोईस होती
टोपी मोठी । बनातीची मळकट ॥ ८२ ॥ कंपवायूनें शरीर । कांपत होतें वरच्यावर । त्यांस पाहतां
असिरकर । चित्तीं परम कोपले ॥ ८३ ॥ जा बेट्या मागल्या द्वारीं । तेथें मिळेल भिक्षा खरी ।
नको चढूंस पायरी । ओसरीची ये वेळां ॥ ८४ ॥ परी हे बोल त्याचे । भिक्षेकरी न मानी साचे ।
येऊन वरती ओसरीचे । यादवासन्निध बैसला ॥ ८५ ॥ घाल भिक्षा कांहीं तरी । असे म्हणून
पुढें करी । भिक्षापात्र भिकारी । यादव सुभेदाराच्या ॥ ८६ ॥ यादव म्हणे मनांत । भिकारी हा



लोचट बहुत । नको म्हणत असतां तेथ । हा बैसला येऊन ॥ ८७ ॥ त्यातें पहातां न्याहाळून ।
तई तो भासला गजानन । सुभेदाराकारण । शेगांवचा राजयोगी ॥ ८८ ॥ दृष्टीस तेज अत्यंत ।
स्वरही त्यांच्या परी सत्य । फरक इतुकाच होता त्यांत । कंप होता तनूला ॥ ८९ ॥ तेज
मुद्रा बोलणें । होते समर्थांप्रमाणें । तें पाहून ऐसें म्हणे । सुभेदार निज चित्तीं ॥ ९० ॥ हा जरी
मानूं गजानन । तरीं ते गेले समाधिस्थ होऊन । आतां महाराज कोठून । पडतील आमुच्या
दृष्टीशीं ? ॥ ९१ ॥ कांहीं असो पैसे दोन । देऊं भिकाऱ्याकारण । श्रीगजानन समजून । ऊहापोह
ज्याचा नको ॥ ९२ ॥ पैसे घेतले भिकाऱ्यानें । आणिक कांहीं देई म्हणे । श्रीगजाननाकारणें ।
शेरणी वाट गुळाची ॥ ९३ ॥ ते वायदे करिसी वरचेवर । ते मी न आतां मानणार । तोटा दहा
हजार । तुज व्यापारीं आला ना ? ॥ ९४ ॥ त्याचा विचार अंतरीं । करून देई कांहीं तरी । रुपये
मजला लवकरी । काढ पाकींट खिशांतून ॥ ९५ ॥ ऐसें भिकारी बोलतां । सुभेदार झाला देतां ।
कांहीं रुपये तत्त्वतां । पाकीटाचे काढून ॥ ९६ ॥ भिकारी म्हणे ते अवसरी । संतुष्ट मी इतक्यावरी ।
होत नाहीं दे लवकरी । आणखी रुपये कांहीं मला ॥ ९७ ॥ पुन्हां रुपये काढिले । भिकाऱ्यासी
अर्पिले । तो इतुक्यांत घरांत गेले । विनायकराव असिरकर ॥ ९८ ॥ यादवराव एकटा बसला ।
होता असिरकराच्या ओसरीला । तें पाहून बोलला । सुभेदारासी येणें रीतीं ॥ ९९ ॥ संशय
गजाननाविषयीं । कां घेतोस चित्तीं पाही ? । कपडे काढून उभा राही । माझ्यापुढें ये वेळां ॥१००॥
तुझ्या अवघ्या अंगावार । दृष्टि पडूं देई एकवार । माझी तेणें होईल दूर । व्याधि तुझी यादवा ॥ १ ॥

तूं मजला मुलापरी। कां रे लाजसी अंतरीं ?। ऐसें म्हणून पाठीवरी। हात फिरविला तयांनीं ॥ २ ॥
फिरविला नखशिखांत। अंगावरुन त्यानें हात। तो आले इतक्यांत। असिरकर ओसरीला ॥ ३ ॥
रुपये घेऊन भिक्षेकरी। गेला द्वाराच्या बाहेरी। यादवानें बहुतापरी। तपास केला गांवांत ॥ ४ ॥
परी न थांग लागला। शेवटीं त्यानें निश्चय केला। ऐसा आपुल्या चित्ताला। कीं हा असावा
गजानन ॥ ५ ॥ सुभेदार म्हणे मानसी। हें समर्थ असल्या आज दिवशीं। फायदा होईल व्यापारासी।
कांहींतरी निःसंशय ॥ ६ ॥ तो सुभेदाराच्या। गाड्या आल्या कापसाच्या। विकावयासाठीं
साच्या। वर्ध्याचिया बाजारीं ॥ ७ ॥ विक्री होता किंमत। येती झाली तया बहुत। तेणें यादव
चित्तांत। समाधान पावला ॥ ८ ॥ आणि निश्चय ऐसा केला। जो भिकारी भेटला। तो होता
समर्थ मला। श्रीगजानन योगीराज ॥ ९ ॥ समर्थ आपुल्या भक्तांसी। रक्षण करिती अहर्निशी। निष्ठा
मात्र त्यांचेविषयीं। दृढतर पाहिजे मनांत ॥ ११० ॥ भाऊ राजाराम कवर। खामगांवीं होता
डॉक्टर। त्याची तेल्हाऱ्यावर। बदली असे जाहली ॥ ११ ॥ म्हणून तेथें जाण्याला।
खामगांवाहून निघाला। सहकुटुंब मठांत आला। घ्याया श्रींचें दर्शन ॥ १२ ॥ गाडी केली
तेल्हाऱ्याची। तयारी केली निघण्याची। वेळ अस्तमानाची। असती झाली ते वेळां ॥ १३ ॥
बाळाभाऊ मठाधिपती। तो त्या बोलला येणें रीति। अहो ऐका माझी विनंति। प्रसाद घेऊन
जावें तुम्ही ॥ १४ ॥ तुम्ही आजपर्यंत। गेला न येथून उपोषित। आज ऐसें विपरीत। कां हो
मनीं आणिलें ? ॥ १५ ॥ ह्यांतून आहे व्यतिपात। हें आणावें मनांत। कवर सांगे त्याप्रत। मला



निकड आहे बहु ॥ १६ ॥ आज रात्रीं प्रसाद घेतों। मागल्या रात्रीं निघून जातों। नसता आग्रह
मला तो। तुम्ही न करा ये काळीं ॥ १७ ॥ बोलल्याप्रमाणें निघाला। तेल्हाऱ्यासी डॉक्टर भला।
घेऊन मुलांमाणसांला। दमणीमाजीं बसून ॥ १८ ॥ रात्र होती अंधारी। महा भयंकर साजरी।
वाटे निशा शोक करी। निज पतीच्या वियोगें ॥ १९ ॥ तों चमत्कार ऐसा झाला। तेल्हाऱ्याचा
रस्ता चुकला। कोणी न भेटे पंथाला। विचारावें कोणा जरी ॥ १२० ॥ गाडी अरुंद रस्त्यावर।
दोन्ही बाजूंस काटे फार। गाडी उभी कांठावर। एका भव्य तलावाच्या ॥ २१ ॥ म्हणतां झाला
गाडीवाला। साहेब रस्ता आहे चुकला। हें ऐकून कवराला। आश्चर्य वाटलें मानसीं ॥ २२ ॥
खालीं उतरून जों पाहात। तों अवघें दिसलें विपरीत। अपशब्द बोलला बहुत। तो त्या गाडी-
वाल्याला ॥ २३ ॥ तूं तेल्हाऱ्याचा म्हणून। तुझी गाडी केली जाण। आडमार्गें आणून।
आम्हां कैसें सोडिलें ? ॥ २४ ॥ काय होतास दारू प्याला। म्हणून हा रस्ता चुकला। वाट तुझ्या
डोळ्यांला। दिसली कशी ना सांग मज ? ॥ २५ ॥ तेल्हाऱ्याचा रस्ता थोर। आम्ही हमेशा वाहत्तों
साचार। मग आडामार्गावर। गाडी कैसी आली तुझी ? ॥ २६ ॥ ऐसें कवर बोलतां। गाडीवाला
जोडी हातां। कां हो मजला शिव्या देतां ?। म्यां न अपराध केला कीं ॥ २७ ॥ मी हमेश भाडें
करतों। तेल्हाऱ्याहून येथें येतों। वाटेल तेव्हां गाडी हांकतों। रस्ता अवघा माहीत मज ॥ २८ ॥
बैलही ना कोठें वळले। ते नीट येथेंच आले। तलाव पाहातां स्तब्ध झाले। हा न रस्ता तेल्हाऱ्याचा

॥ २९ ॥ मग कवर समजला मनांत । हें समर्थांचें आहे कृत्य । प्रसाद घेतल्याविरहित । कां कीं मी निघालों ॥ १३० ॥ बाळाभाऊच्या विनंतीला । मीं नाहीं मान दिला । म्हणून माझा रस्ता चुकला । आतां वाट गवसे कशी ? ॥ ३१ ॥ हें भयंकर कानन । येथें मशीं त्राता कोण । गजानना ! तुजवांचून । रक्षण माझें कराया ॥ ३२ ॥ तो तळ्याच्या दुसऱ्या बाजूला । घागरमाळांचा आवाज झाला । डॉक्टराच्या कानीं पडला । तेणें आला थोडा धीर ॥ ३३ ॥ गाडीवाल्यासी म्हणे कवर । रस्ता नाहीं फार दूर । या चाहुलीचा सुमार । धरून गाडी हाण आतां ॥ ३४ ॥ तें त्यानें ऐकिलें । काट्यांकुपाट्यांमधून नेलें । नीट रस्त्याला लाविलें । या आपल्या गाडीस ॥ ३५ ॥ हमरस्ता लागतां भली । डॉक्टरानें चौकशी केली । तों ऐशापरी समजली । गोष्ट त्या कवरातें ॥ ३६ ॥ हे शेगांवचें शिवार । आहे अजून साचार । मग म्हणाला डॉक्टर । चाल शेगांवीं परत आतां ॥ ३७ ॥ सूर्योदयाचे समयाला । शेगांवासी कवर आला । वृत्तान्त बाळाभाऊला । केला सर्व निवेदन ॥ ३८ ॥ मग बाळाभाऊ म्हणाले । हेंच आज बरें झालें । व्यतिपाती न जाऊं दिलें । समर्थांनी तुम्हांस ॥ ३९ ॥ आज प्रसाद ग्रहण करा । उद्यां जा हो तेल्हारा । करूं नये कधींच खरा । प्रसादाचा इन्कार ॥ १४० ॥ समर्थांचे तुम्ही भक्त । म्हणून तुम्हां आणिलें परत । मानवाचे अवघे बेत । सिद्धीस जाणें अशक्य ॥४१॥ संतांच्या जें असेल मनीं । तेंच येईल घडोनी । भरंवसा त्यांचे चरणी । ठेवून स्वस्थ असावें ॥ ४२ ॥ दुसरे दिवशीं प्रसादासी । घेऊन गेला तेल्हाऱ्यासी । आतां पुढील गोष्टीसी । अवधान द्यावें श्रवणातें ॥ ४३ ॥ एक रतनसा नामें नर । होता जातीनें



भावसार । तयाचा मुलगा दिनकर । होता एक वर्षाचा ॥ ४४ ॥ त्यासी सोबणीचा रोग झाला । कोण म्हणती सटावला । बालक अवघा सुकून गेला । रक्त न राहिलें अंगांत ॥ ४५ ॥ दिसूं लागलीं अवघीं हाडें । वरती नुसतें कातडें । वैद्य आणले बडेबडे । परी न झाला उपयोग ॥ ४६ ॥ मुलगें रडतां राहिना । दूधपाणी घेईना । ज्वर मुळींच सोडीना । पाहा तयाच्या तनूतें ॥ ४७ ॥ वैद्य म्हणती रतनसासी । आतां औषध न देई यासी । हा तुझ्या हातासी । लागणे आहे अशक्य ॥ ४८ ॥ शक्याशक्य विचार । सुज्ञें करावा निरंतर । उगीच पूल सागरावर । बांधावया जाऊं नये ? ॥ ४९ ॥ ऐसें ऐकून रतनसा । रडूं लागला ढसढसां । शेवटीं विचार त्यानें ऐसा । केला आपुल्या मानसीं ॥ १५० ॥ येवींतेवीं मरतें पोर । माझें आतां साचार । पाहूं करून एकवार । उपाय हा शेवटचा ॥ ५१ ॥ दिनकराचा अंतकाळ । आला होता अति जवळ । घरचीं माणसें सकळ । लागलीं श्रोते रडावया ॥ ५२ ॥ हातपाय गार झाले । नेत्रतेज मंदावलें । मनगटाचें सोडिलें । ठिकाण पाहा नाड्यांनीं ॥ ५३ ॥ ऐशा स्थितिमाझारीं । रतनसाने पुत्र करीं । घेऊन ठेविला असे द्वारीं । नेऊनिया समर्थांच्या ॥ ५४ ॥ आणि केला त्यांसी नवस । पुत्र माझा उठल्यास । शेरणी वांटीन तुम्हांस । मी पांच रुपयांची ॥ ५५ ॥ तुम्ही पावलां अवघ्याला । त्याचा अनुभव द्यावा मला । मीही आहे आपुला । माझी उपेक्षा करूं नका ॥ ५६ ॥ माझें मूल द्वारांत । तुझ्या जरी झालें मृत । तरी अवघ्या वऱ्हाडांत । तुझी होईल नाचक्की ॥ ५७ ॥ अमृतापरी तुझे चरण । आले सांगत आम्हां जन । हे स्वामी गजानन । कृपा करा या बाला ॥ ५८ ॥ पुत्र न माझा उठला जरी ।

मी डोकें फोडीन पायांवरी । तुझ्या आज निर्धारीं । ऐसा निश्चय मनींचा ॥ ५९ ॥ अमृततुल्य तुझी दृष्टि । त्याची करावी आज वृष्टि । नको करूस मला कष्टि । महापुरुषा गजानना ! ॥ १६० ॥ त्यास कांहीं वेळ झाला । तों प्रकार ऐसा घडून आला । मूल हातापायांला । हलवावया लागलें ॥ ६१ ॥ नाडी आली ठिकाणीं । रुदन करूं लागलें जाणी । तो प्रकार पाहुनी । लोक सारे आनंदले ॥ ६२ ॥ समर्थकृपा झाल्यावर । राहिल कोठून त्या दूर ? । सूर्याचिया समोर । तमाचा तो पाड नसे ॥ ६३ ॥ दिनकर थोडे दिवसांत । होता झाला पूर्ववत् । नवस असला श्रद्धायुक्त । तो फळे हा न्याय असे ॥ ६४ ॥ दादा कोल्हटकराचा । पुत्र राजा नांवाचा । आहे प्रसाद समर्थांचा । संतकृपा अमोल खरी ॥ ६५ ॥ कन्या रामचंद्र पाटलाची । चंद्रभागा नांवाची । ज्वान अठरा वर्षांची । लाडेगांव सासर जिचें ॥ ६६ ॥ ही असतां गरोदर । प्रसंग आला दुर्धर । प्रसूतीची वेळ फार । कठीण स्त्रीजातीला ॥ ६७ ॥ लाडेगांवाहून माहेरीं । चंद्रभागा आली खरी । प्रसूतीस्तव निर्धारीं । जनरीतीप्रमाणें ॥ ६८ ॥ मोठ्या कष्टाने प्रसूती । झाली तिची निश्चिती । तोंच चंद्रभागेवरती । ज्वरें अंमल बसविला ॥ ६९ ॥ तो होता नवज्वर । थकून गेले डॉक्टर । औषध-उपचार केले फार । आपुल्या मुलीस पाटलांनीं ॥ १७० ॥ थोडाबहुत गुण आला । व्याधि तितक्यापुरता दबला । परी नव्हता मुळींच झाला । नामशेष देहांतूनी ॥ ७१ ॥ चंद्रभागा आजारी । पडूं लागली वरच्यावरी । एकदां अकोल्या नेलें खरी । औषध तिला द्यावया ॥ ७२ ॥ वैद्य विधानें नाना करिती । कोणी नळसंग्रहणी बोलती । कोणी वैद्य ऐसें



म्हणती । क्षय झाला मुलीस या ॥ ७३ ॥ मेळ एकाचा एकाला । नाहीं मुळीं लागला । मग पाटलानें विचार केला । आतां वैद्य गजानन ॥ ७४ ॥ तारो अथवा मारो इसी । अंगारा लावा प्रति-दिवसीं । तीर्थ द्यावें प्यायासी । समर्थांच्या पायांचें ॥ ७५ ॥ पिता मोठा निष्ठावंत । समर्थांवरी अवघा हेत । हळूंहळूं त्या पोरीप्रत । गुण येता जाहाला ॥ ७६ ॥ तिला उठवत नव्हतें शय्येसी । तीच आली दर्शनासी । पायीं चालत मठासी । हें महत्त्व अंगाऱ्याचें ॥ ७७ ॥ निष्ठावंत ज्याचा भाव । तयाशीं पावे देव । उपास्यापदीं भाव । उपासकें ठेवावा ॥ ७८ ॥ रामचंद्राची अंगना । जानकाबाई सुलक्षणा । परी दैवयोग सुटेना । तो भोगल्यावांचुनी ॥ ७९ ॥ वाताचा झाला विकार । जानका-बाईस साचार । पोट दुखे वरच्यावर । कांहीं उपाय चालेना ॥ १८० ॥ औषध देतां दबे वात । पुन्हा उठे पूर्ववत् । ऐसा क्रम दिवस बहुत । चालला होता श्रोते हो ॥ ८१ ॥ त्या वाताची अखेरी । होती झाली मस्तकावरी । मेंदु बिघडला निर्धारी । गेली जाणीव मावळून ॥ ८२ ॥ वेड्यापरी करावें । वाटेल तें बोलावें । कधीं उपाशीं निजावें । कधीं बसावें जेवत ॥ ८३ ॥ कोणी म्हणती लागलें भूत । कोणी म्हणती रोग सत्य । कांहीं वदू लागलें तेथ । हा करणीचा प्रकार असे ॥ ८४ ॥ कां कीं जितके असती जमेदार । त्यांचें असतें वांकडें फार । दुबळा आपुला दावी जोर । चेटूककरणी करूनिया ॥ ८५ ॥ औषधउपाय बहुत केले । जाणतेही आणविलें । गंडे बहुत बांधिलें । करी जानका-बाईच्या ॥ ८६ ॥ पाटील घरचा श्रीमंत । तो सांपडला अडचणींत । म्हणून येतां झाला ऊत । अवघ्यां त्या दांभिकांना ॥ ८७ ॥ कोणी अंगात आणावें । वेडाचें निदान करावें । कांहीं तरी

सांगावें । धनास्तव पाटलाला ॥ ८८ ॥ तों बिचारा सारें करी । कांता बरी न होय परी । विचार त्यानें अखेरीं । ऐशी रीतीं ठरविला ॥ ८९ ॥ वैद्य आतां गजानन । जाणतां आता गजानन । देव ऋषि आतां गजानन. । तो जें वाटेल तें करो ॥ १९० ॥ माझी बायको सून त्याची । ही भावना माझी साची । आतां अन्य उपायांची । गरज नाहीं आम्हांला ॥ ९१ ॥ तूं उद्यांपासून । प्रातःकाळीं करीं स्नान । मठामाजीं जाऊन । घाली प्रदक्षिणा समाधीसी ॥ ९२ ॥ तें तिनें पतीचें वचन । सर्वथैव केलें मान्य । समर्थसमाधीलागून । घालूं लागली प्रदक्षिणा ॥ ९३ ॥ गेल्या न त्या मात्र वाया । दया आली सद्गुरुराया । वातविकार जाऊनिया । निर्दोष ती जाहली ॥ ९४ ॥ खऱ्या खऱ्या संतांची । सेवा न जाई वांया साची । परी निष्ठा मानवाची । जडणें तेथें अशक्य ॥ ९५ ॥ समर्थांच्या नंतर । बाळाभाऊ गादीवर । बसले त्यांचे चमत्कार । कांहीं थोडे जाहले ॥ ९६ ॥ हे वैशाख वद्य षष्ठीसी । शेगांवीं गेले वैकुंठासी । त्यांच्यामागून गादीसी । बसले येऊन नारायण ॥ ९७ ॥ बाळाभाऊ जेव्हां गेलें । तेव्हां नारायणा स्वप्न पडलें । नांदूरें ग्रामीं भलें । तें थोडें सांगतों ॥ ९८ ॥ हें माळीं नारायणा । तूं शेगांवास करी गमना । रक्षण्या भाविक जनांना । ऐसें मला वाटतें ॥ ९९ ॥ ऐसें स्वप्नीं सांगून । निघून गेले गजानन । म्हणून आले नारायण । शेगांवामाझारी ॥ २०० ॥ कांहीं दिवस यांनीही । अधिकार चालविला ते ठायीं । यांची समाधि झाली पाही । चैत्र शुद्ध षष्ठीला ॥ १ ॥ पूर्वसुकृतावांचून । संतसेवा न घडे जाण । संतसेवेचें महत्पुण्य । त्या पुण्या पार नसे ॥ २ ॥



श्रीगजाननलीलेचा । पार कधीं न लागायाचा । अंबरीच्या चांदण्यांचा । हिशोब कोणा न लागे कधीं ॥ ३ ॥ मी अज्ञान पामर । मति नाहीं तिळभर । मग हा लीलासागर । मुखीं केवीं वर्णूं हो ! ॥ ४ ॥ त्यानें जें जें वदविले । तें तें मी कथित केलें । लेखणीनें अक्षर लिहिलें । परी तें न तिचें सामर्थ्य ॥ ५ ॥ ती लेखणी ज्याच्या करीं । तोच अक्षरें काढी सारीं । निमित्ताकारण होते खरी । लेखणी ती लिहावया ॥ ६ ॥ तैसेंच येथें झालें । मी लेखणीचें काम केलें । लिहिते लिहविते स्वामी भले । श्रीगजानन महाराज ॥ ७ ॥ त्यांच्या कृपेंकरून । मी हें केलें लेखन । येथें माझें मोठेंपण । कांहींच नाहीं विबुध हो ! ॥ ८ ॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । आतां आला कळसाप्रत । कळसाध्याय पुढें असे ॥ २०९ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति विंशोऽध्यायः समाप्तः ॥

॥ इति श्रीगजाननविजयग्रंथस्य विंशोऽध्यायः समाप्त ॥







श्रीगजानन महाराज गोसाव्याच्या वेषांत रामचंद्र पाटलास दृष्टांत देत आहेत.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी अनंतवेषा । जयजया[illegible] अविनाशा । जयजयाजी परेशा । ब्रह्मांडाधीशा नमो तुशीं ॥ १ ॥ देवा ! तूं आपणांस । पति[illegible]न नाम खास । सर्वदा आहे धरिलेंस । याचा विचार करीं गा ॥ २ ॥ पाप्यावरी प्रेम अमित । तुझें देवा असतें सत्य । पापी जानांनीं तुजप्रत । महत्त्व आणिलें कृपाळा ॥ ३ ॥ म्हणून माझ्या पातकासी । पाहूं नका हो हृषिकेशी । धुणें येतें जलापासीं । स्वच्छ होतें म्हणून ॥ ४ ॥ म्हणून पतितांचा कंटाळा । करूं नको रे घननीळा । काय भूमीनें सांवारिला । दिलें आहे टाकून ॥ ५ ॥ तूंच पतिपावन । तूंच पुण्यपावन । या दोन्ही दोषांपासून । तुम्हीं अलग सर्वदा ॥ ६ ॥ सूर्य नाशी तमाप्रत । म्हणून का तो कष्टी होत । कांहीं न करावें लागत । तम नासण्या रवीशीं ॥ ७ ॥ तम जों जों भेटण्या येई । तों तों तेथें प्रकाश होई । अंधारत्व अवघें जाई । त्याचें तमाचें नारायणा ॥ ८ ॥ पापपुण्याची वासना । तूंच उपजविशी नारायणा । आपला रक्षण्या मोठेपणा । पापी तूंच निर्मिशी ॥ ९ ॥ कांहीं असो आतां तरी । चिंतारहित मजला करी । दासगणू हा घ्यावा पदरीं । हेंच आहे मागणें ॥ १० ॥ तुझ्यावांचून मजप्रत । नाहीं वशिला जगतांत । अवघेंच तुझ्या हातांत । आहे कीं रे पांडुरंगा ! ॥ ११ ॥ श्रोते आतां सावधान । हा कळसाध्याय परिसा पूर्ण । तुमचें भाग्य धन्य धन्य । संतकथा ऐकतसां ॥१२॥ एकविधा निष्ठा ज्याची । जडली गजाननपदीं साची । त्याच्या दुखःसंकटांची । होळीच होते निःसंशय ॥ १३ ॥ बांधीत असतां मंदिर । काम करीत शिखरावर । एक होता मजूर । हाताखालीं गवंड्याच्या ॥ १४ ॥ तो धोंडा देतां मिस्तरीला । एकाएकी झोंक

गेला । तीस फुटांवरून पडला । खालीं घडीव दगडावर ॥ १५ ॥ तो पडतां लोकांनीं पाहिला । जन म्हणती मेला मेला । उंचावरून खालीं पडला । आतां कशाचा वांचेल तो ? ॥ १६ ॥ परी घडलें अघटित । कोठें न लागलें त्याप्रत । जैसा चेंडू झेलितात । तैसें त्याचें जाहलें ॥ १७ ॥ सोपानसाह्ये ज्यापरी । जन उतरती भूमीवरी । तेथें झालें त्याचपरी । त्या मजुराकारणें ॥ १८ ॥ मजूर म्हणे लोकांला । माझा जेव्हां झोंक गेला । तेव्हां एकाने धरलें मला । पडतां पडतां करास ॥ १९ ॥ पाय भूमीसी लागतां क्षणीं । तो न दिसला मजलागूनी । हे वृत्त ऐकूनी । लोक अवघे आनंदले ॥ २० ॥ अभिश्राप कोणाचा । समर्थ ना घेती साचा । हा योग पडण्याचा । दैवानेंच आला तुज ॥ २१ ॥ या तुझ्या पडण्यानें । स्पर्श केला समर्थानें । तुझ्या कराकारणें । ऐसें भाग्य कोणाचें ! ॥ २२ ॥ असो एक बाई रजपुताची । जयपुराहून आली साची । बाधा होती भूताची । तया अबलेकारणें ॥२३॥ तिसी जयपूर ग्रामाला । दत्तात्रयांचा दृष्टान्त झाला । तूं या रामनवमीला । जाई शेगांवाकारणें ॥ २४ ॥ तेथें संत जागती ज्योत । श्रीगजानन सद्‌गुरुनाथ । ते या तुझ्या पिशाच्चाप्रत । मुक्ति देतील निःसंशय ॥ २५ ॥ या दृष्टान्तेंकरून । आपल्या दोन मुलांसी घेऊन । रामनवमीसाठीं जाण । बाई आली शेगांवी ॥ २६ ॥ प्रतिपदेपासून भला । उत्सवासी आरंभ झाला । अफाट समुदाय मिळाला । नवमीस श्रोतें शेगांवीं ॥ २७ ॥ काम सभामंडपाचें । चाललें होतें तेथ साचें । खांब मोठमोठे दगडाचे । उभे केले असती ॥ २८ ॥ दीड फूट जाडीचा । पांच फूट लांबीचा । प्रत्येक खांब दगडाचा । ऐसे होते किती तरी ॥ २९ ॥



उत्सवाच्या निमित्त भलें । काम भक्तांनी बंद केलें । खांब होतें बसविलेलें । नुसते मात्र ते ठाईं ॥३०॥ श्रीरामाचा जन्म झाला । प्रसादासाठीं लोटला । जनांना तो समुदाय भला । तो न मसी वर्णवे ॥३१॥ त्या गर्दीत ही बाई । उभी खांबास एक्या पायीं । होती तिला सोसली नाही । गर्दी ती यत्किंचित् ॥ ३२ ॥ म्हणून खांबाच्या आश्रया । गेली निर्भय व्हावया । गर्दी ती चुकवावया । परी झालें विपरीत ॥ ३३ ॥ तोंच खांब कोसळला । तिच्या शरीरा पडला । तो पाहातां लोकांला । ऐसें वाटूं लागलें ॥ ३४ ॥ तिचा बहुतेक गेला प्राण । ही बाई कोठील कोण ? । लहान मुलें दिसती दोन । खांबाखाली येधवां ॥ ३५ ॥ दहावीस जणांनीं । खांब काढिला अंगावरूनी । पाणी मुखात घालोनी । लोबोकडे पाठविलें ॥ ३६ ॥ ही लोबो डॉक्टरीण । शस्त्रविद्येंत अति प्रवीण । ही ज्ञातीने ख्रिश्चन । भक्त येशू ख्रिस्ताची ॥ ३७ ॥ तिनें या रजपुतीणीला । रीतीप्रमाणें उपचार केला । लोबो म्हणे ना लागला । मार इला कोठेंच ॥ ३८ ॥ हें आश्चर्य खरोखर । खांब दगडाचा होता थोर । त्याच्या खालीं शरीर । सुरक्षित राह्यवें कसें ? ॥ ३९ ॥ आश्चर्य वाटलें लोकांला । प्राण बाईचा वांचला । हा जो कांहीं प्रकार झाला । तो घडला इतुक्यास्तव ॥ ४० ॥ खांब पाडून अंगावरी । भूत जें होतें शरीरीं । त्या भूतास मुक्ति खरी । दिधली त्या गजाननें ॥ ४१ ॥ बाई होऊन पूर्ववत् । गेली जयपूर शहराप्रत । नांदूं लागली आनंदांत । ऐसा प्रभाव स्वामींचा ॥४२॥ ऐसेंच एका उत्सवासी । नाईक नवऱ्याच्या मस्तकासी । सोडीत असतां मंडपासी । लाकडी गोल पडला हो ॥ ४३ ॥ तोही गोल थोर होता । परी स्वामींची अगाध सत्ता । कोठेंही ना आघात

होतां । नाईक नवरा वांचला ॥ ४४ ॥ पुत्र कृष्णाजी पाटलाचा । रामचंद्र नांवाचा । परमभक्त समर्थांचा । एक असे शेगांवीं ॥ ४५ ॥ एके दिवशीं त्याच्या घरीं । येते झाले साक्षात्कारी । ऐन दुपारच्या अवसरीं । गोसाव्याच्या रूपानें ॥ ४६ ॥ भूक लागली मला देखा । अन्न कांहीं देता का ? । ऐसें म्हणून मारिली हांका । रामचंद्र पाटलातें ॥ ४७ ॥ पाटील मूळचा भाविक । त्यासी वाटलें कौतुक । गोसाव्याची ऐकून हांक । दारामाजीं पातला ॥ ४८ ॥ निरखून पाहता गोसाव्यासी । तों ते असावें पुण्यराशी । स्वामी गजानन निश्चयेंसी । ऐसें त्याला वाटलें ॥ ४९ ॥ गोसाव्याचा धरून हात । आला घेऊन घरांत । दिला बसण्यास पाट । पूजा केली पायांची ॥ ५० ॥ गोसावी म्हणे पाटलाला । आज मी मुद्दाम आलों मुला । कांहीं तुज सांगण्याला । तें तूं ऐके मनापून ॥ ५१ ॥ कर्जाचीं न चिंता करी । ते फिटून जाईल निर्धारीं । अरे उन्हाळ्यांत गोदावरी । थोडी कोरडी पडतसे ॥ ५२ ॥ तैसाच हाही प्रकार । संपन्नतेला येईल पूर । कृपाघन वर्षल्यावर । श्रीहरीचा समज हें ॥ ५३ ॥ उष्टें माझें जें ठायीं । पडेल बापा ते ठायीं । कशाचेंही कधीं पाहीं । कमी नाहीं पडणार ॥ ५४ ॥ आण ताट वाढून । सुग्रास देई भोजन । मर्जी असल्या पांघरूण । घाल एखादें अंगावरी ॥ ५५ ॥ पूजा अन्न दक्षिणा । याचकांसी दिल्या जाणा । तें पावतें नारायणा । येविषयी शंका नसे ॥ ५६ ॥ परी तो याचक । आधीं पाहिजे शुद्ध देख । त्यावांचून हें कौतुक । होणार नाहीं कधींही ॥ ५७ ॥ आणलें ताट वाढूनी । गोसावी जेवला प्रेमानीं । पांच रुपये पाटलांनीं । दक्षिणा ठेविली त्याच्या करां ॥ ५८ ॥



तैं गोसावी म्हणाला । ही दक्षिणा नको मला । तूं पाहिजे कारभार केला । गजाननाच्या मठांत ॥ ५९ ॥ तीच दक्षिणा मागण्यासी । मी आलों तुझ्यापासीं । ती आनंदें देई मसी । म्हणजे कल्याण होईल ॥ ६० ॥ समर्थसेवेची दक्षिणा । घेऊन तुष्टवी माझ्या मना । योग्य मनुष्य तुझ्याविणा । कोणी न येथें सांप्रत ॥ ६१ ॥ तुझी कांता आजारी । वरचेवरी पडते जरी । तीही होईल बापा बरी । ही दक्षिणा दिल्यानें ॥ ६२ ॥ बोलाव तुझ्या पुत्राप्रत । त्याच्या कंठीं एक ताईत । बांधितों म्हणजे चेटूकभूत । याची न बाधा होय त्यासी ॥ ६३ ॥ का कीं ही जमेदारी । कठीण आहे भूमीवरी । पाण्याशींच पाणी वैरी । ये ठाईं होत असे ॥ ६४ ॥ पाटीलकीचें तुझें वतन । हें बापाचें पांघरूण । त्याचा उपयोग करणें जाण । अति जपून रामचंद्रा ॥ ६५ ॥ द्वेषी मन असूं नये । सन्नीतीला सोडूं नये । राजाविरुद्ध जाऊं नये । उगीच भलत्या कामांत ॥ ६६ ॥ साधु कोण संत कोण ? । हें पहावें शोधून । दांभिकांच्या नादीं जाण । कदापीही लागूं नये ॥ ६७ ॥ ही व्रतें पाळल्यास । तुझा ऋणी श्रीनिवास । होईल या वचनास । असत्य माझ्या मानूं नको ॥ ६८ ॥ आय पाहून खर्च करी । दंभाचार कधीं न वरी । साधुसंत येतां घरीं । विन्मुख त्याला लावूं नये ॥ ६९ ॥ अपमान खऱ्या संतांचा । झाल्या कोप ईश्वराचा । होतसे बापा साचा । संत-चरणीं प्रेमा धरी ॥ ७० ॥ आपल्या वंशजाचें उणें । पाहूं नये कदा मनें । सोयऱ्याधायऱ्याकारणें । समयानुसार मान द्यावा ॥ ७१ ॥ कोप असावा बाह्यात्कारी । दया असावी अंतरीं । जैसें का ते फणसावरी । कांटे आंत गोड गरे ॥ ७२ ॥ मी तुझ्या पाठीस । आहे जाण

रात्रंदिवस । ताईत बांधून कंठास । गोसावी जाऊं लागला ॥ ७३ ॥ दाराबाहेर जातां मला । अंतर्धान पावला । पाहाता पाहाता झाला । दिसेनासा रस्त्यांत ॥ ७४ ॥ पाटील अवघ्या दिवसभर । मानसीं करी विचार । हा गोसावी कोणी इतर । नसावा ऐसें वाटतें ॥ ७५ ॥ श्रीगजाननस्वामी मला । आले उपदेश करायाला । घेऊन गोसावीवेषाला । हें आतां समजलें ॥ ७६ ॥ रात्रीं स्वप्नीं येऊन । संशय केला निरसन । ऐसें स्वामी गजानन । भक्त-वत्सल खरोखरी ॥ ७७ ॥ श्रीगजानन चरित्र । तारक असोनी परमपवित्र । अनुभव येण्या मात्र । सबळ निष्ठा पाहिजे ॥ ७८ ॥ या ग्रंथाची अवतरणिका । देतों आतां ही तुम्ही ऐका । वेळ उगा दवडूं नका । पूर्ण व्हावें सावधान ॥ ७९ ॥ प्रथमाध्यायीं मंगलचरण । देवगुरूचें वंदन । केलें पुढें निवेदन । गजाननाच्या पूर्वचरिता ॥ ८० ॥ माघमासीं सप्तमीसी । समर्थ आले शेगांवासी । देवीदासाच्या सदनापासी । दिसते झाले प्रथमतः ॥ ८१ ॥ बंकटलाल दामोदर । दोन होते चतुर नर । त्यांनीं परीक्षा अखेर । केली गजाननाची ॥ ८२ ॥ कथा द्वितीयाध्यायांत । येणेंपरी आहे सत्य । गोविंदबुवाच्या कीर्तनांत । महाराज येऊन बैसले ॥ ८३ ॥ पितांबर शिष्याला । रस्त्यांत चमत्कार दाविला । बंकटलालाच्या घराला । महाराज गेले शेवटीं ॥ ८४ ॥ कथा तृतीयाध्यायाला । गोसाव्यानें नवस केला । गांजाचा श्रीसमर्थाला । पाजण्याचा विबुध हो ॥ ८५ ॥ त्याची इच्छा पुरविली । प्रथा गांजाची पडली । तेथपासोनी भली । शेगांवचे मठांत ॥ ८६ ॥ जानराव देशमुखाचें । गडांतर टाळिलें साचें । देऊन तीर्थ पायांचे । आपुलें तें स्वामींनीं ॥ ८७ ॥ मृत्यूचे तें





प्रकार । तेथें कथिले सविस्तर । विठोबासी दिला मार । ढोंग करितो म्हणोनी ॥ ८८ ॥ कथा चतुर्था-ध्यायाठायीं । येणें रीतीं असें पाहीं । जानकीरामें दिला नाहीं । विस्तव चिलमीकारणें ॥ ८९ ॥ किडे पडले चिंचवण्यांत । अन्न गेले वांया सत्य । सोनारानें जोडून हात । केली विनंती समर्थाला ॥ ९० ॥ त्याचा अपराध क्षमा केला । पूर्ववत् केलें चिंचवण्याला । जानकीराम भक्त झाला । ते दिवसापासून ॥ ९१ ॥ होते दोन कान्होले । उतरंडीसी ठेविलेले । तेच समर्थें मागितलें । खाया चंदू मुकिंदासी ॥ ९२ ॥ चिंचोलीच्या माधवाला । यमलोक दावून मुक्त केला । शिष्या-हातें करविला । थाट वसंतपूजेचा ॥ ९३ ॥ कथा पंचमाध्यायांत । महाराज पिंपळगांवांत । बसले शंकराच्या मंदिरात । पद्मासन घालोनिया ॥ ९४ ॥ गुराख्यांनीं पूजा केली । गांवची मंडळी तेथें आली । महाराजांसी घेऊन गेली । पिंपळगांवाकारणें ॥ ९५ ॥ हें कळलें बंकटालाला । तो पिंपळगांवास गेला । महाराजांसी आणण्याला । परत शेगांवाकारणें ॥ ९६ ॥ समर्थांसी आणिले परत । कांहीं दिवस राहून तेथ । पुन्हां गेले अकोलींत । भास्करासी तारावया ॥ ९७ ॥ कोरड्या ठणठणीत विहिराला । जिवंत झरा फोडिला । एका क्षणांत आणिलें जला । त्या कोरड्या विहिरी-ठायीं ॥ ९८ ॥ भास्कराची उडवली भ्रांतीं । घेऊन आले तयाप्रती । शेगांवास गुरुमूर्ति । ही कथा पंचमांत ॥ ९९ ॥ षष्ठाध्यायीं ऐसी कथा । बंकटलालें सद्गुरुनाथा । मक्याचीं कणसें खाण्याकरितां । नेलें आपुल्या मळ्यांत ॥ १०० ॥ गांधीलमाश्या उठल्या तेथ । लोक होऊन भयभीत । पळूं लागले असती सत्य । जीव आपुला घेऊनी ॥ १ ॥ बाधा गांधीलमाश्यांची ।

महाराजा न झाली साची । घेतली असे शिष्यत्वाची । परीक्षा बंकटलालाची ॥ २ ॥ नरसिंगजीस भेटण्याला । स्वामी गेले अकोटाला । जो नरसिंगजी होता भला । शिष्य कोतशा अल्लीचा ॥ ३ ॥ कांहीं दिवस राहिले । अकोटामाजी भले । नरसिंगजीसी हितगुज केलें । बंधु आपुला म्हणून ॥ ४ ॥ चंद्रभागेच्या तीरीं । शिवरग्रामाभीतरीं । कृपा व्रजभूषणावरी । केली असे जाऊन ॥ ५ ॥ मारुतीच्या मंदिरांत । श्रावणमासाच्या उत्सवांत । समर्थ आले राहण्याप्रत । येथें षष्ठमाची पूर्णता ॥ ६ ॥ गांवीची पाटील मंडळी । अवघी आडदांड होती भली । हमेशा होई बोलाचाली । त्यांची समर्थांबरोवर ॥ ७ ॥ हरी पाटलासवें भले । महाराज कुस्ती खेळले । मल्लविद्येचें दाविले । प्रत्यंतर बहुतांला ॥ ८ ॥ उंसाचा चमत्कार । दाऊनिया साचार । अभिमानाचा परिहार । केला पाटील मंडळींच्या ॥ ९ ॥ भिक्यानामें दिला सुत । खंडू कडताजी पाटलाप्रत । आम्रभोजनाचें व्रत । चालवण्यास कथिलें पाटलाला ॥ ११० ॥ ऐशा कथा सप्तमाध्यायीं । कथन केल्या आहेत पाही । निष्ठा समर्थांच्या ठायीं । जडली पाटील मंडळींची ॥ ११ ॥ कथा आहे अष्टमांत । दुफळी पाटील देशमुखांत । अर्ज दिधला सरकारांत । महारांनीं विरुद्ध पाटलाच्या ॥ १२ ॥ खंडूवरी बालंट आलें । तें समर्थांनीं नासिलें । निर्दोष सुटते झाले । खंडू पाटील खटल्यांतून ॥ १३ ॥ तैलंगी ब्राह्मणाला । वेद म्हणून दाखविला । आपण कोण हा कळविला । सहज लीलेनें समाचार ॥ १४ ॥ कृष्णाजींच्या मळ्याशी । महाराज राहिले छपरासी । मंदिराच्या सान्निध्यासी । चंद्रमौळी हराच्या ॥ १५ ॥ ब्रह्मगिरी गोसाव्याला । अभिमानरहित केला " नैनं छिंन्दति " श्लोकाला । रहस्यासह



सांगून ॥ १६ ॥ जळत्या पलंगाच्यावर । महाराज बसते झाले स्थिर । न जाळे वैश्वानर । केव्हांही खऱ्या संताला ॥ १७ ॥ कथा नवमाध्यायाला । द्वाड घोडा शांत केला । खूण नवस करणाराला । दिली असे गांजाची ॥ १८ ॥ दासनवमीचे उत्सवासी । समर्थ बाळापुरासी । घेऊन आपल्या शिष्यांसी । बाळकृष्णाच्या घरां गेले ॥ १९ ॥ बाळकृष्णालागून । करविलें समर्थांचें दर्शन । संशयरहित केलें मन । तया रामदास्याचें ॥ १२० ॥ दशमाध्यायीं सुरेख । उमरावतीचें कथानक । उपरति झाली पुरी देख । तेथें बाळाभाऊला ॥ २१ ॥ गणेश आप्पा चंद्राबाई । यांनीं अर्पिला संसार पायीं । भावभक्तीनें लवलाहीं । श्रीगजाननस्वामींच्या ॥ २२ ॥ गणेश दादा खापर्ड्यांला । शुभ आशीर्वाद दिधला । छत्रीनें मारून बाळाला । परीक्षा त्याची घेतली ॥ २३ ॥ द्वाड गाय सुकलालाची । अति गरीव केली साची । दांभिक भाक्ति घुड्याची । कशी ती कथन केली ॥ २४ ॥ एकादशाध्यायीं कथन । भास्करासी डसला श्वान । आले त्र्यंबकेश्वरीं जाऊन । गोपाळदासा भेटले ॥ २५ ॥ श्यामसिंगाच्या विनंतीसी । देऊन मान आडगांवासी । येते झाले पुण्यराशी । श्रीगजाननमहाराज ॥ २६ ॥ निजधामा भास्कर गेला । त्याचा देह ठेविला । द्वारकेश्वरा सन्निध भला । सतीबाईचे शेजारीं ॥ २७ ॥ आज्ञा केली कावळ्यांला । तुम्ही न यावें या स्थला । वाचविलें गणु जवऱ्याला । सुरुंग उडतां विहिरीत ॥ २८ ॥ शेट बचुलालाची । कथा द्वादशाध्यायीं साची । मूर्ति निरिच्छपणाची । प्रत्यक्ष होते महाराज ॥ २९ ॥ स्वामींचें वस्त्र नेसला । पितांबर शिंपी कोंडोलीला । स्वइच्छेनें येता झाला । परमभक्त होता जो ॥ १३० ॥ पितांबरानें कोंडोलीसी ।

बळिरामाच्या शेतासी । वठलेलिया आंब्यासी । पानें फळें आणविलीं ॥ ३१ ॥ पितांबर राहिला कोंडोलीत । तेथेच झाला समाधिस्त । नवा मठ झाला स्थापित । शेगावीं समर्थ इच्छेनें ॥ ३२ ॥ विचार करून मानसीं । बसून रेतीच्या गाडीसी । महाराज नव्या मठासी । आले जुन्या मठांतून ॥ ३३ ॥ श्यामसिंगानें मुंडगांवाला । नेलें गजाननस्वामीला । पर्जन्यानें घोटाळा । भंडाऱ्याचा केला असे ॥ ३४ ॥ श्यामसिंगानें आपुली । इस्टेट समर्था अर्पिली । पुंडलिकाची निमाली । गांठ प्लेगाची श्रीकृपें ॥ ३५ ॥ कथाभाग तेराव्याचा । महारोग गोसाव्याचा । हरण गंगाभारतीचा । केला असे गजाननें ॥ ३६ ॥ बंडुतात्यासी भाग्य आलें । भूमींत धन सांपडलें । कर्जापासून मुक्त केले समर्थानें निजकृपें ॥ ३७ ॥ नर्मदेच्या स्नानास । सोमवती अमावस्यास । नौका फुटतां छिद्रास । हात लाविला नर्मदेनीं ॥ ३८ ॥ विडा माधवनाथाला । शिष्याहातीं पाठविला । या कथा चवदाव्याला । वर्णिल्या असती साफल्यें ॥ ३९ ॥ अध्याय तो पंधरावा । शिवजयंतीचा आहे बरवा । आलें अकोलें नामक गांवा । टिळक बाळ गंगाधर ॥ १४० ॥ भाकरी प्रसाद पाठविला । कोल्हटकराचे हस्तें भला । मुंबईत लोकमान्याला । ग्रहण कराया कारणें ॥ ४१ ॥ श्रीधर गोविंद काळ्यास । करिते झाले उपदेश । नको जाऊं विलायतेस । येथेंच आहे सर्व कांहीं ॥ ४२ ॥ कथा ऐशा सोळाव्यासी । पुंडलिक अंजनगांवासी । जातां निवारिले त्यासी । येऊनिया स्वप्नांत ॥ ४३ ॥ पादुकांचा प्रसाद त्याला । श्यामसिंगहस्तें पाठविला । कवराच्या भाजीभाकरीला । ग्रहण केलें आनंदें ॥ ४४ ॥ छरा तुकारामाचा । कानामधून पडला साचा । ह्या अशा कथांचा । समावेश



सोळाव्यांत ॥ ४५ ॥ सतराव्यांत कथा सुरस । विष्णूसाच्या घरास । जाया मलकापुरास । समर्थ निघाले गाडींतून ॥ ४६ ॥ नग्न फिरती म्हणूनी । खटला भरला पोलिसांनीं । केवळ अहंपणानीं । सत्पुरुषासी त्रास द्याया ॥ ४७ ॥ महताबशा साईला । पाठवून दिलें पंजाबाला । हिंदुयवनांविषयीं केला । कळकळीचा बोध त्यासी ॥ ४८ ॥ बापुरावाच्या कांतेसी । भानामती न मानी साची । भेट गंगाभागीरथींसी । झाली अकोटीं विहिरींत ॥ ४९ ॥ कथा बायजा माळणीची । अठराव्यामाजीं साची । कवर डॉक्टराच्या फोडाची । कथा यांत ग्रथित असे ॥ १५० ॥ महाराज गेले पंढरीला । घेऊन अवघ्या लोकांला । तेथें बापुना काळ्याला । दर्शन हरीचें करविलें ॥ ५१ ॥ कवठे बहादुरचा वारकरी । मरीनें झाला आजारी । त्यास घटकेमाझारीं । समर्थांनें बरें केलें ॥ ५२ ॥ एक्या कर्मठ ब्राह्मणाला । श्वान उठून मेलेला । दावून त्याचा गलित केला । कर्माभिमान श्रोते हो ॥ ५३ ॥ कथा एकोणविसाव्यासी । दिला काशीनाथपंतासी । आशीर्वाद तो अतिहर्षी । तो येतां दर्शना ॥ ५४ ॥ गोपाळ मुकुंद बुटी भला । नागपुरासी घेऊन गेला । श्रीगजाननस्वामीला । आपुल्या गेहाकारणें ॥ ५५ ॥ त्याच्या मनीं ऐसा हेत । महाराज ठेवावे नागपुरांत । परी हरि पाटलांनीं परत । आणिले समर्थ शेगांवीं ॥ ५६ ॥ धार कल्याणचे रंगनाथ । साधु आले भेटण्याप्रत । समर्थांसी शेगांवांत । ऐसें आणि कितीतरी ॥ ५७ ॥ श्रीवासुदेवानंद सरस्वती । जो कर्ममार्गाची प्रत्यक्ष मूर्ति । दृष्टादृष्ट होतां नुसती । आनंद झाला उभयतांतें ॥ ५८ ॥ तेव्हां बाळाभाऊला । जो कां होता संशय आला । तो समर्थांनी निवटिला । करूनिया

उपदेश ॥ ५९ ॥ केलें खळ्याचें संरक्षण । गाढवांचें पाखून । समर्था मारितां आलें मरण । नारायणासी
बाळापुरी ॥ १६० ॥ गजाननाचे कृपे भलें । जाखड्याचे लग्न झालें । कपीलधारेसी दिधलें ।
दर्शन निमोणकराला ॥ ६१ ॥ तुकारामें आपुला । पुत्र समर्था वाहिला । नारायण नामें भला ।
सेवा करावयाकारणें ॥ ६२ ॥ पंढरीतें जाऊन । विठ्ठलातें विचारुन । महाराज आले परतून ।
शेगांवाकारणें ॥ ६३ ॥ पुढें भाद्रपद मासासी । ऋषि-पंचमीच्या पुण्य दिवशीं । आधुनिक कालाचा
हा ऋषि । समाधिस्थ जाहला ॥ ६४ ॥ विसाव्यामाजीं इतर । श्रींची समाधि झाल्यावर ।
जे का घडले चमत्कार । त्यांचें वर्णन केलें असे ॥ ६५ ॥ जे जे भाविक भक्त कोणी । त्यांना त्यांना
अजुनी । दर्शन देती कैवल्यदानी । त्यांच्या इच्छा पुरवून ॥ ६६ ॥ आतां हा एकविसावा ।
अवघ्या कथेचा कळस बरवा । हा अवघ्यांचा लेखावा । तुम्ही, सार श्रोते हो ॥ ६७ ॥ प्रत्यक्षापरी
प्रकार । येथे होती वरच्यावर । म्हणून म्हणणें आहे सार । अवघ्यांचें या अध्याया ॥६८॥ वर्गणीच्या
जोरें भलें । समाधीचे काम झालें । मनापासून भक्त झटले । वर्गणी गोळा कराया ॥ ६९ ॥ ऐसें
भव्य सुंदर । काम कोठें न भूमीवर । धर्मशाळा चौफेर । चहूं बाजूंनीं बांधिल्या ॥ १७० ॥ या भव्य
कामाला । बहुतांनी हात लाविला । त्यांचीं नांवें तुम्हांला । सांगतां ग्रंथ वाढेल ॥ ७१ ॥ मुख्य जे
होते त्यांतून । त्यांचीं नांवें करितों कथन । कुकाजीचा नंदन । हरी पाटील नाम ज्याचें ॥ ७२ ॥
सांगवी गांवचा बनाजी । उमरीचा तो गणाजी । बटवाडीचा मेसाजी । लाडेगांवचा गंगाराम
॥ ७३ ॥ भागू, नंदू, गुजाबाई । अकोल्याची बनाबाई । सुकदेव पाटलाची ती आई ।



यांनीं हजारों रुपये दिले ॥ ७४ ॥ पाटील रामचंद्र कृष्णाजी । दुसरा दत्तु भिकाजी ।
पळसखेडच्या सुखदेवजी । मार्तंड गणपती शेगांवचा ॥ ७५ ॥ बालचंदाचा रतनलाल ।
पंचगव्हाणचा दत्तूलाल । त्याच गावींचा बिसनलाल । अंबरासिंग टाकळीचा ॥ ७६ ॥ किसन
बेलमंडळेकर । विठोबा पाटील चावरेकर । हसनापूरचा राहणार । गंगाराम नाम ज्याचें ॥ ७७ ॥
या दानशुरांनीं । मोठमोठ्या रकमा देऊनि । केली मठाची उभारणी । भक्तिस्तव समर्थांच्या ॥ ७८ ॥
कोठ्या कचेरी स्वयंपाकघरें । सोपे उत्तम प्रकारें । बांधिले असती साजिरे । समाधीच्या चौफेर
॥ ७९ ॥ लोकांनीं ज्या देणग्या दिल्या । त्या बांधकामीं जिरूर गेल्या । परी पुष्कळ गोष्टी
राहिल्या । बांधण्याच्या अवशेष ॥ १८० ॥ त्यासाठीं युक्ति केली । वर्गणी जमवण्यासाठीं भली ।
योजना ती ऐशी झाली । ती ऐका विबुध हो ॥ ८१ ॥ बसविला शेतसाऱ्यावर । समर्थांचा
धार्मिक कर । कोणासी न करतां जोर । रुपयामागें एक आणा ॥ ८२ ॥ तैशीच बाजारपेठेशीं ।
धान्य अथवा कपाशी । जी येईल विकायासी । पट्टी बसविली त्यावर ॥ ८३ ॥ गाडीमागें अर्धा
आणा । हर्ष वाटे देतांना । कां कीं समर्थांच्या चरणां । निष्ठा होती सर्वांची ॥ ८४ ॥ समाधीपुढें
स्वाहाकार । होऊन गेले अपार । परी त्यांतून मोठे चार । सर्वश्रुत जाहले ॥ ८५ ॥ शतचंडीचें
अनुष्ठान । ब्राह्मणांच्या करवीं जाण । केलें आदरें करून । किसनलाल शेठजीनें ॥ ८६ ॥ अनुष्ठान
शतचंडीचें । करणें अति अवघड साचें । अधिकन्यून ना खपायाचें । जगदंबे कालिकेस ॥ ८७ ॥
कांहीं चुकतां विधानांत । तात्काळ होतें विपरीत । काम्य अनुष्ठानाप्रत । भीति चहूं बाजूंनीं ॥ ८८ ॥

वडील किसनलालचा । बंकटलाल नांवाचा । भक्त होता समर्थांचा । एकनिष्ठ पहिल्यापून ॥ ८९ ॥
पूर्ण आहुतीच्या दिवशीं । त्या बंकटलाल भक्तासी । व्याधि उद्भवली शरीरासी । प्राणान्ताचा
समय आला ॥ १९० ॥ लोक गेले घाबरून । म्हणती हे काय आलें विघ्न । शतचंडीचें अनुष्ठान ।
करतां विपरीत व्हावें कां ? ॥ ९१ ॥ बंकटलाल म्हणे पुत्रासी । भिऊं नकोस मानसी । माझा
तारिता पुण्यरासी । समाधीसी बसलासे ॥ ९२ ॥ तो अवघें करील बरें । नका होऊं बावरें ।
पूर्ण आहुतीचें काम सारें । घ्यावें सशास्त्र उरकून ॥ ९३ ॥ माझा स्वामी गजानन । येऊं न देई
कदा विघ्न । भक्तांचें करण्या संरक्षण । मुळींच बसला येथें तो ॥ ९४ ॥ तेंच पुढें सत्य झालें ।
व्याधीचें स्वरूप मावळलें । एका बाईचें निमालें । भूत शतचंडींत या ॥ ९५ ॥ बनाजी तिडके
सांगवीकर । यांनी केला स्वाहाकार । कसुऱ्याची राहणार । गुजाबाई नाम जिचें ॥ ९६ ॥
चापडगांवींचा वामन । शामरावाचा नंदन । यांनींही एक यज्ञ । केला समाधीच्या पुढें ॥ ९७ ॥
ऐसी धर्मकृत्यें किती तरी । झालीं समर्थांसमोरी । खरे खरेच साक्षात्कारी । श्रीगजाननमहाराज
॥ ९८ ॥ यावत् कालपर्यंत । लोक होते निष्ठावंत । तावत् कालपर्यंत । वऱ्हाड होता सुखी बहु
॥ ९९ ॥ जसजशी निष्ठा कमी झाली । तों तों विपन्न दशा आली । अवदसेनें घातली । माळ
कंठीं वऱ्हाडाच्या ॥ २०० ॥ विपुल पिकणें टाकिलें । काश्यपीनें पहा भले । नवे वाहूं लागले । वारे
सर्व वऱ्हाडांत ॥ १ ॥ वऱ्हाडाची ऐसी दैना । समर्थांसी पाहवेना । म्हणून घेतलें आपणां ।
कोंडोनीं त्यांनीं जलांत ॥ २ ॥ तीस फुटांपासून । पाया आणिला भरून । तेथेंच कां हें जीवन ।



निर्माण व्हावें श्रोते हो ॥ ३ ॥ म्हणून ऐसें वाटते । राग आला समर्थांतें । म्हणून त्यांनी जलातें ।
भोंवतीं केलें निर्माण ॥ ४ ॥ सुखसंपन्न पहिल्यापरी । वऱ्हाड व्हावा निर्धारी । ऐसें चित्तांत असल्या
जरीं । या वऱ्हाडी जनांच्या ॥ ५ ॥ तरी त्या अवघ्या जनांनीं । श्रीगजाननाच्या चरणीं । पूर्ववत्
निष्ठा ठेवूनी । सुखालागीं अनुभवावें ॥ ६ ॥ ऐसे न जरी करतील । तरी याहींपेक्षां येईल ।
वऱ्हाडासी बिकट काळ । याचा विचार करा हो ॥ ७ ॥ गजाननपदीं निष्ठा ठेवा । सुख-अनुभव
सर्वदा घ्यावा । कुतर्कासी मुळीं न द्यावा । ठाव आपुल्या मानसीं ॥ ८ ॥ या गजाननरूप जमिनींत ।
जें जें कांहीं पेराल सत्य । तें तें मिळणार आहे परत । बहुत होऊन तुम्हांला ॥ ९ ॥ दाणे टाकिल्या
खडकावरी । त्यांचीं न रोपें होतीं खरीं । याचा विचार अंतरीं । सर्व काळ करा हो ॥ २१० ॥
कंटाळा संतसेवेचा । ज्या ज्या प्रांता येत साचा । त्या त्या प्रांतीं दुष्काळाचा । प्रादुर्भाव होतसे
॥ ११ ॥ धर्मश्रद्धा ही वाघीण । गेल्या मनरूपी दरींतून । दुर्वासनेचे कोल्हे जाण । येऊन बसतील
ते ठायां ॥ १२ ॥ भक्ति शुचिर्भूत अंगना । अभक्ति ही वारांगना । तिच्या नादीं लागल्या जाणा ।
विटंबनाच सर्वत्र ॥ १३ ॥ सन्नीतीला सोडूं नका । धर्मवासना टाकूं नका । शत्रु ना माना एकमेकां ।
तरीच शक्ति वाढेल ॥ १४ ॥ ऐसें तुम्ही वागल्यास । येतील चांगले दिवस । या वऱ्हाड प्रांतास ।
हें कधींही विसरूं नका ॥ १५ ॥ एकदां तरी वर्षांतून । घ्यावें गजाननाचें दर्शन । एकदां तरी
पारायण । करा गजाननचरित्राचें ॥ १६ ॥ हा एकवीस अध्यायांचा । श्रीगजाननविजय नांवाचा ।
नैवेद्य एकवीस मोदकांचा । गजाननासी अर्पा हो ॥ १७ ॥ वा हे अध्याय साचार । माना एकवीस

वडील किसनलालचा । बंकटलाल नांवाचा । भक्त होता समर्थांचा । एकनिष्ठ पहिल्यापून ॥ ८९ ॥
पूर्ण आहुतीच्या दिवशीं । त्या बंकटलाल भक्तासी । व्याधि उद्भवली शरीरासी । प्राणान्ताचा
समय आला ॥ १९० ॥ लोक गेले घाबरून । म्हणती हे काय आलें विघ्न । शतचंडीचें अनुष्ठान ।
करतां विपरीत व्हावें कां ? ॥ ९१ ॥ बंकटलाल म्हणे पुत्रासी । भिऊं नकोस मानसी । माझा
तारिता पुण्यरासी । समाधीसी बसलासे ॥ ९२ ॥ तो अवघें करील बरें । नका होऊं बावरें ।
पूर्ण आहुतीचें काम सारें । घ्यावें सशास्त्र उरकून ॥ ९३ ॥ माझा स्वामी गजानन । येऊं न देई
कदा विघ्न । भक्तांचें करण्या संरक्षण । मुळींच बसला येथें तो ॥ ९४ ॥ तेंच पुढें सत्य झालें ।
व्याधीचें स्वरूप मावळलें । एका बाईचें निमालें । भूत शतचंडींत या ॥ ९५ ॥ बनाजी तिडके
सांगवीकर । यांनी केला स्वाहाकार । कसुऱ्याची राहणार । गुजाबाई नाम जिचें ॥ ९६ ॥
चापडगांवींचा वामन । शामरावाचा नंदन । यांनींही एक यज्ञ । केला समाधीच्या पुढें ॥ ९७ ॥
ऐसी धर्मकृत्यें किती तरी । झालीं समर्थासमोरी । खरे खरेच साक्षात्कारी । श्रीगजाननमहाराज
॥ ९८ ॥ यावत् कालपर्यंत । लोक होते निष्ठावंत । तावत् कालपर्यंत । वऱ्हाड होता सुखी बहु
॥ ९९ ॥ जसजशी निष्ठा कमी झाली । तों तों विपन्न दशा आली । अवदसेनें घातली । माळ
कंठीं वऱ्हाडाच्या ॥ २०० ॥ विपुल पिकणें टाकिलें । काश्यपीनें पहा भले । नवे वाहूं लागले । वारे
सर्व वऱ्हाडांत ॥ १ ॥ वऱ्हाडाची ऐसी दैना । समर्थांसी पाहवेना । म्हणून घेतलें आपणां ।
कोंडोनीं त्यांनीं जलांत ॥ २ ॥ तीस फुटांपासून । पाया आणिला भरून । तेथेंच कां हें जीवन ।



निर्माण व्हावें श्रोते हो ॥ ३ ॥ म्हणून ऐसें वाटते । राग आला समर्थांतें । म्हणून त्यांनी जलातें ।
भोंवतीं केलें निर्माण ॥ ४ ॥ सुखसंपन्न पहिल्यापरी । वऱ्हाड व्हावा निर्धारी । ऐसें चित्तांत असल्या
जरीं । या वऱ्हाडी जनांच्या ॥ ५ ॥ तरी त्या अवघ्या जनांनीं । श्रीगजाननाच्या चरणीं । पूर्ववत्
निष्ठा ठेवूनी । सुखालागीं अनुभवावें ॥ ६ ॥ ऐसे न जरी करतील । तरी याहींपेक्षां येईल ।
वऱ्हाडासी बिकट काळ । याचा विचार करा हो ॥ ७ ॥ गजाननपदीं निष्ठा ठेवा । सुख-अनुभव
सर्वदा घ्यावा । कुतर्कासी मुळीं न द्यावा । ठाव आपुल्या मानसीं ॥ ८ ॥ या गजाननरूप जमिनींत ।
जें जें कांहीं पेराल सत्य । तें तें मिळणार आहे परत । बहुत होऊन तुम्हांला ॥ ९ ॥ दाणे टाकिल्या
खडकावरी । त्यांचीं न रोपें होतीं खरीं । याचा विचार अंतरीं । सर्व काळ करा हो ॥ २१० ॥
कंटाळा संतसेवेचा । ज्या ज्या प्रांता येत साचा । त्या त्या प्रांतीं दुष्काळाचा । प्रादुर्भाव होतसे
॥ ११ ॥ धर्मश्रद्धा ही वाघीण । गेल्या मनरूपी दरींतून । दुर्वासनेचे कोल्हे जाण । येऊन बसतील
ते ठायां ॥ १२ ॥ भक्ति शुचिर्भूत अंगना । अभक्ति ही वारांगना । तिच्या नादीं लागल्या जाणा ।
विटंबनाच सर्वत्र ॥ १३ ॥ सन्नीतीला सोडूं नका । धर्मवासना टाकूं नका । शत्रु ना माना एकमेकां ।
तरीच शक्ति वाढेल ॥ १४ ॥ ऐसें तुम्ही वागल्यास । येतील चांगले दिवस । या वऱ्हाड प्रांतास ।
हें कधींही विसरूं नका ॥ १५ ॥ एकदां तरी वर्षांतून । घ्यावें गजाननाचें दर्शन । एकदां तरी
पारायण । करा गजाननचरित्राचें ॥ १६ ॥ हा एकवीस अध्यायांचा । श्रीगजाननविजय नांवाचा ।
नैवेद्य एकवीस मोदकांचा । गजाननासी अर्पा हो ॥ १७ ॥ वा हे अध्याय साचार । माना एकवीस

दुर्वांकुर । पारायणरूपें निरंतर । वाहाव्या गजाननासी ॥ १८ ॥ सद्भाव जो मानवाचा । तोच दिवस चतुर्थीचा । प्रेमरूपी चंद्राचा । उदय झाला पाहिजे ॥ १९ ॥ मग या ग्रंथाचें अक्षर । एकेक हें दुर्वांकुर । अर्थ शब्दांचा साचार । मोदक समजा विबुध हो ॥ २२० ॥ ती अर्पून गजानना । पारायणरूपी पारणा । साधून घ्यावा करा ना । वेळ आतां थोडकाही ॥ २१ ॥ हा ग्रंथ ना कादंबरी । ती गजाननाची लीला खरी । येथें जो अविश्वास धरी । तो बुडेल निःसंशय ॥ २२ ॥ श्रीगजाननस्वामी–चरित्र । जो नियमें वाचील सत्य । त्याचे पुरतील मनोरथ । गजाननकृपेनें ॥ २३ ॥ हें गजाननचरित्र भागीरथी । कथा या तोय निश्चिती । महाराष्ट्र ओव्या तयावरती । लहरी समजा विबुध हो ॥ २४ ॥ वा कल्पवृक्ष हें स्वामीचरित्र । शाखा अध्याय तयाप्रत । पद्यरचना हीच सत्य । पालवी या वृक्षाची ॥ २५ ॥ जो या ग्रंथीं ठेवील भाव । त्यासी पावेल स्वामीराव । संकटीं त्याच्या घेईल धांव । रक्षण त्याचें करावया ॥ २६ ॥ हा ग्रंथ केवळ चिंतामणी । चिंतलें फळ देईल जाणी । दृढतर विश्वास असल्या मनीं । हें मात्र विसरूं नका ॥ २७ ॥ जेथें गजानन चरित्राचा । पाठ होईल नित्य साचा । तेथें वास लक्ष्मीचा । चिरकाल होईल हो ॥ २८ ॥ दरिद्र्यासी मिळेल धन । रोगीयासी आरोग्य जाण । साध्वी स्त्रीचें वांझपण । फिटेल याच्या वाचनें ॥ २९ ॥ निपुत्रिकासी होईल पुत्र । निष्कपटी मिळेल मित्र । चिंता न राहील अणुमात्र । या ग्रंथाच्या वाचका ॥ २३० ॥ दशमी एकादशी द्वादशीला । हा ग्रंथ जो वाची भला । अनुपम येईल भाग्य त्याला । श्रीगजाननकृपेनें ॥ ३१ ॥ गुरुपुष्य योगावरी । जो याचें पारायण करी । बसून एक्या आसनावरी । राहूनिया शुचिर्भूत ॥ ३२ ॥ त्याच्या अवघ्या





मनकामना । खचित होतील पूर्ण जाणा । कसल्याही असोत यातना । त्या त्याच्या निरसतील ॥ ३३ ॥ जेथें हा राहील ग्रंथ । तेथें न कदा येई भूत । लाग न साधे यत्किंचित् । तेथें ब्रह्म-समंधाचा ॥ ३४ ॥ ऐसें याचें महत्त्व । ये भाविकाला प्रचीत । कुटिल दुष्टदुर्जनांप्रत । याचा अनुभव येणें नसे ॥ ३५ ॥ मानसाची योजना । राजहंसासाठीं जाणा । तैसें हें संतसज्जनां । मानस स्वामीचरित ॥ ३६ ॥ पूर्वकालीं ज्ञानेश्वर । मीरा मेहता कबीर । नामा सावता चोखा महार । गोरा बोधला दामाजी ॥ ३७ ॥ उंबरखेडी एकनाथ । सखाराम अमळनेरांत । वा देव मामलेदार यशवंत । वा हुमणाबादी माणिकप्रभू ॥ ३८ ॥ तेवींच हा वऱ्हाडांत । गजाननस्वामी सद्गुरुनाथ । फरक नाहीं यत्किंचित । त्यांच्या यांच्या मधीं हो ॥ ३९ ॥ आतां हीच विनंती । तुम्हां अवघ्या भाविकांप्रती । अत्यंत असूं द्यावी प्रीति । श्रीगजाननांचे चरणीं ॥ २४० ॥ म्हणजे तुमची येरझार । जन्ममृत्यूची साचार । होऊनिया व्हाल पार । दुस्तर भवाम्बुधीं ॥ ४१ ॥ आतां स्वामी दयाघना ! । तुला येवो माझी करुणा । दासगणूच्या यातना । सकल निवारी कृपेनें ॥ ४२ ॥ मी तुझा झालों भाट । मार्ग दावी मला नीट । दुर्वासनेचा येवो वीट । चित्तामाजीं दयाळा ! ॥ ४३ ॥ आमरण वारी घडो । संतचरणीं प्रेमा जडो । अक्षयीचा वास घडो । श्रीगोदेच्या तीराला ॥ ४४ ॥ प्रसंग याचना करण्याचा । मशी नको आणूंस साचा । समर्था दासगणूचा । अभिमान वाहवा मानसीं ! ॥ ४५ ॥ मी सकल संतांचा चरणरज । माझी राखा तुम्ही लाज । हेंचि मागणें आहे आज । पदर पसरून तुम्हांतें ॥ ४६ ॥ जैसी केलीस प्रेरणा । तैसेंच मी वदलों जाणा । हे स्वामी श्रीगजानना ! । तुझें चरित्र

लिहितां कीं ॥ ४७ ॥ शेगांवचे मठांत । कांहीं होते कागदपत्र । ते रतनसानें मजप्रत । आणूनिया दाखविले ॥ ४८ ॥ त्यांच्या आधारें ग्रंथ लिहिला । कल्पनेचा ना उपयोग केला । म्हणून अधिक न्यूनाला । मी नाहीं कारण ॥ ४९ ॥ झालें असल्या अधिक न्यून । त्याची क्षमा गजानन । करो सर्वदा मजलागून । हीच आहे विनंती ॥ २५० ॥ शके अठराशें एकसष्टांत । प्रमाथिनाम संवत्सरांत । चैत्रमासीं शुद्धांत । वर्षप्रतिपदेला ॥५१॥ हा ग्रंथ कळसा गेला । शेगांव-ग्रामीं भला । तो गजाननांनीं पूर्ण केला । प्रथम प्रहरी बुधवारीं ॥ ५२ ॥ स्वस्ति श्रीदासगणूविरचित । हा श्रीगजाननविजय नामें ग्रंथ । नौका होवो भाविकांप्रत । भवसिंधु तारावया ॥ २५३ ॥ शुभं भवतु ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥

॥ इति एकविंशोऽध्यायः समाप्त ॥

॥ पुंडलीक वरदा हरीविठ्ठल ॥

॥ सीताकांतस्मरण जयजय राम ॥

॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥

॥ समाप्त ॥





ह. भ. प. संतकवि दासगणूमहाराज विरचित श्रीगजाननविजय ग्रंथाची ओवीसंख्या एकंदर ३६६८

| अध्याय | ओवीसंख्या | अध्याय | ओवीसंख्या |
|---|---|---|---|
| १ | १४६ | १२ | १५१ |
| २ | १४८ | १३ | १७९ |
| ३ | १५२ | १४ | १५२ |
| ४ | १५५ | १५ | १४१ |
| ५ | १५४ | १६ | १५० |
| ६ | १४५ | १७ | १५९ |
| ७ | १५१ | १८ | २०२ |
| ८ | १५५ | १९ | ३४९ |
| ९ | १५४ | २० | २०९ |
| १० | १७१ | २१ | २५३ |
| ११ | १९२ | | एकंदर ३६६८ |

॥ भूपाळी ॥

उठा उठा हो सद्‌गुरुराया सरली ती राती ॥ दयाळा ॥
उषःकालचा आहे वारा कुक्कुट ओरडती ॥ ध्रु० ॥
सूर्य सारथी अरुणा पाहून प्राची निजचित्तीं ॥
गेली होउन अति आनंदित तें मी वानुं किती ॥ १ ॥
उलुक पिंगळे झालें भयाभित पाहुन अरुणाला ।
प्राचि प्रांत तो सद्‌गुरुराया लालिलाल झाला ॥ २ ॥
चक्रवाक चंडोल पक्षि ते प्रभात कालाला ।
सूर्या बघण्या आतुर होउनि घालिती घिरट्याला ॥ ३ ॥
तेवीं बघण्या तुला पातले भक्त तुझे द्वारीं ।
दर्शन देउनि तयास तारा गणू म्हणे संसारीं ॥ ४ ॥



* * * *

॥ काकडा ॥

सद्‌गुरुराया गजानना तव काकडा करितों ॥ आर्ता ॥
उद्धारास्तव बहु आदरानें चरणद्वया धरितों ॥ ध्रु० ॥
अज्ञानाची निशा मावळो कृपाकटाक्षांनीं ।
आशा सटवी टी टी करूनी नाचविते अवनी ॥ १ ॥
त्या सटवीला आहे आसरा मायामोहाचा ।
त्याचा टिकाव कधीं न लागे तुजपुढती साचा ॥ २ ॥
षड्रिपु बेटे खट्याळ मोठे करिती निर्माण ।
भ्रम भोंवरा जो त्यामध्यें देतो आम्हांस टाकून ॥ ३ ॥
त्या भोंवऱ्याला तरून जाया पाय तुझे नौका ।
त्या नावेमध्यें भक्त बैसती तयास टाकुं नका ॥ ४ ॥
दासगणूची हीच विनंति तुज वारंवार ।
सुखें करावें भक्ता आपुल्या लोटुं नका दूर ॥ ५ ॥

* * * *

## आरती

जय जय सत्‌चित्‌स्वरुपा स्वामी गणराया । अवतरलासी भूवर जड-मुढ ताराया ॥ जयदेव जयदेव० ॥ध्रु०॥
निर्गुण ब्रह्म सनातन अव्यय अविनाशी । स्थिरचर व्यापुन उरलें जें या जगतासी ।
तें तूं तत्त्व खरोखर निःसंशय असती । लीलामात्रें धरिलें मानवदेहासी ॥ जयदेव जयदेव० ॥ १ ॥
होउं न देशी त्याची जाणिव तूं कवणा । करुनी ' गणि गण गणांत बोते ' या भजना ।
धाता हरिहर गुरुवर तूंचि सुखसदना । जिकडे पहावें तिकडे तूं दिससी नयना ॥ जयदेव जयदेव० ॥ २ ॥
लीला अनंत केल्या बंकटसदनास । पेटविलें त्या अग्नीवांचूनि चिलमेस ।
क्षणांत आणिलें जीवन निर्जल वापीस । केला ब्रह्मगिरीच्या गर्वाचा नाश ॥ जयदेव जयदेव० ॥ ३ ॥
व्याधी वारुन केलें कैकां संपन्न । करविलें भक्तांलागीं विठ्ठल-दर्शन ।
भवासिंधु हा तरण्या नौका तव चरण । स्वामी दासगणूचे मान्य करा कवन ॥ जयदेव जयदेव० ॥ ४ ॥



* * * *

## ॥ श्रीगजानन महाराजाष्टक ॥

( पृथ्वी-वृत्त )

गजानना गुणागरा परम मंगला पावना । अशीच अवघें हरी दुरित तेंवि दुर्वासना ।
नसे त्रिभुवनामधें तुजविणें आम्हां आसरा । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ १ ॥
निरालसपणें नसे घडलि अल्प सेवा करीं । तुझी पतितपावना भटकलों वृथा भूवरी ।
विसंबत न गाय ती आपुलिया कधीं वासरा । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ २ ॥
अलास जगिं लावण्या परतुनी सु-वाटे जन । समर्थ गुरुराज ज्या भुषवि नाम नारायण ।
म्हणून तुज प्रार्थना सतत जोडुनिया करा । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ ३ ॥
क्षणांत जल आणिलें नसुन थेंब त्या वापिला । क्षणांत गमनाप्रती करिसी इच्छिलेल्या स्थला ।
क्षणांत स्वरूपे किती विविध धारिसी धीवरा । करि पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ ४ ॥
अगाध करणी तुझी गुरुवरा ! न लोकां कळे । तुला त्यजुन व्यर्थ ते आचरितात नाना खुळे ।
कृपा उदक मागती त्यजुन गौतमीच्या तिरा । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ ५ ॥
समर्थस्वरूपाप्रती धरून साच बाळापुरी । तुम्ही प्रकट जाहलां सुशिल बाळकृष्णा घरीं ।
हरिस्वरुप घेउन दिधली भेट भीमातिरी । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ ६ ॥
सच्छिद्र नौकेप्रती त्वदिय पाय हे लागतां । जलांत बुडतां तरी तिजासि नर्मदा दे हाता ।
अशा तुजासि वाणण्या नच समर्थ माझी गिरा । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥ ७ ॥
अतां न बहु बोलतां तव पदांबुजा वंदितों । पडो विसर ना कदा मदिय हेंच मी मागतों ।
तुम्ही वरद आपुला कर धरा गणूच्या शिरा । करी पदनतावरी बहु दया न रोषा धरा ॥८॥

# ॥ नमस्काराष्टकम् ॥

लोकान्भवोपहतसर्वविचारशक्तीन् । अन्धान् च मोहतमसामरणाभिभूतान् ।
उद्धर्तुमेव धृतमानवविग्रहं तं । श्रीमद्गजाननगुरुं शिरसा नमामि ॥१॥
शास्त्रैरनाकलितमास्ति महोयदीयं । संबोधितं श्रुतिगणैर्वचनेन नेति ।
आविर्बभूव सगुणान्विह तत् परं तं । श्रीमद्गजाननगुरुं शिरसा नमामि ॥२॥
यद्दर्शनात् भवति फुल्लतरं हृदाब्जम् । अन्तर्दधात्युडुगणं मुदमोहरूपं ।
अज्ञानघोरातिमिरस्य दिवाकरं तं । श्रीमद्गजाननगुरुं शिरसा नमामि ॥३॥
कुण्ठं मनो भवति यद्विषये विचारे । मूकायते च रसना स्तवने प्रवृत्ता ।
तं भक्तिगम्यममृतं त्रिगुणैरतीतं । श्रीमद्गजाननगुरुं शिरसा नमामि ॥४॥
सच्चित्सुखं परममंगलमात्मरूपं । जागृत्सुषुप्तिरहितं सततं तुरीयं ।
ध्यानस्थितं पदनतार्तिविनाशिनं तं । श्रीमद्गजाननगुरुं शिरसा नमामि ॥५॥
पादोदकेन खलु येन सुधामयेन । श्रीजानरावमरणं कृपया निरस्तं ।
मार्कंडसूनुवरदं शिवरूपिणं तं । श्रीमद्गजाननगुरुं शिरसा नमामि ॥ ६ ॥



वापी जलेन रहितापि चकार पूर्णा । यो वारिणा सुमधुरेण निजप्रभावात् ॥
भक्त्या च शुष्कहृदयं सजलं करोति । श्रीगजाननगुरुं शिरसा नमामि ॥ ७ ॥
भक्तिर्दृढास्तु सततं हृदये मदीये । मा मे मनो भवतु मोहमयं कदापि ॥
श्लोकैरतो वसुमितैर्गणुदासशिष्यः । तं श्रीमद्गजाननगुरुं सदयं स्तुनोति ॥ ८ ॥

। इति शम् ।

संतचरणरज
अ. दा. आठवले

* * * *

ह. भ. प. संतकवि श्रीदासगणूमहाराजकृत

## " गण गण गणांत बोते " या स्तोत्राचा स्तवराज ( अभंग )

'गण गण गणांत बोते' । हें भजन प्रिय सद्गुरुतें ॥
या श्रेष्ठ गजानन गुरुतें । तुम्हि आठवित रहा यातें ।
हें स्तोत्र नसे अमृत तें । मंत्राचि योग्यता यातें ॥
हें संजीवनि आहे नुसते । व्यावहारिक अर्थ न यातें ।
मंत्राचि योग्यता कळते । जो खराच मांत्रिक त्यातें ॥
या पाठें दुःख तें हरतें । पाठका अती सुख होतें ।
हा खाचित अनुग्रह केला । श्रीगजाननानें तुम्हांला ॥
घ्या साधुन अवघे याला । मनि धरून भाव-भक्तीला ।
कल्याण निरंतर होई । दुःख तें मुळीं नच राही ॥
असल्यास रोग तो जाई । वासना सर्व पुरतिलही ।
आहे याचा अनुभव आला । म्हणुनियां कथित तुम्हांला ॥
तुम्ही बसुन क्षेत्र शेगांवीं । स्तोत्राचीं प्रचिती पहावी ।
ही दंतकथा ना लवही । या गजाननाची ग्वाही ॥

॥ इति शम् ॥







